मनोहर ग्रंथमाला प्रकाशन ६१ वें

# क्रांतिकाल

लेखक : व. ह. पिटके

विजयादशमी
शके १८७२



२० ऑक्टोबर
सन १९५०

किंमत चार रुपये

मनोहर

प्र का

## शिल्लक आहेत

(३) फ्रेंच राज्यक्रांति : न. चिं. केळकर २॥
(९) राका : सौ संजीवनी मराठे १।
(१०) प्रतारणा : प्रा. दांडेकर २
(११) संसारसोपान : सौ. गिरिजाबाई केळकर १।
(२२) संस्कृतिसंगम : प्रा. केळकर ६
(२३) चंपी आणि मोत्या १॥
(२५) वेदप्रकाश : पाठकशास्त्री १०
(३०) जीवनविहार : कालेलकर २
(३१) स्मरणसांखळी : देशपाडे ६
(३२) रानोमाळ : रा. वि. फडतरे २॥
(३३) साहित्यविहार : प्रा. केळकर ३
(३५) गांवरान गीता : न. चिं. केळकर २
(३६) काव्यालोचन : प्रा. केळकर ५
(३७) हंसरा निर्माल्य व चिमण्या : कमलाबाई देशपांडे २
(४०) 'नरसिंह' केळकर : वि. उ. वैद्य १॥
(४१) ज्ञानेश्वरी-सर्वस्व : न. चिं. केळकर ५
(४२) ठेंगणें अस्मान : श्री. देशपांडे ४
(४३) मानसचित्रें : गंगाधर गाडगीळ २॥
(४४) उपायन : म. म. केळकर २॥
(४६) संस्कृत काव्याचे पंचप्राण : डॉ. के. ना. वाटवे ६
(४७) काव्यविहार : मा. पटवर्धन ४
(४८) Location of Lanka : Sardar Kibe २
(४९) तिसऱ्या महायुद्धाच्या छायेंत : य. न केळकर ५
(५०) हिंदी हीच आमची राष्ट्रभाषा : शं. दा. चितळे ३
(५१) हिंदी क्रिकेट : र. गो. सरदेसाई ५
(५२) स्त्रीगीते : कमलाबाई देशपांडे ३
(५३) मा थेन् थेन् : कथासंकलन ३
(५४) रक्षाकार : द. पां. खांबेटे २
(५५) गोकुळच्या गौळणी : पं. महादेवशास्त्री जोशी २
(५७) पाऊलवाट : श्री. देशपांडे ४
(५८) आमच्यापुढील प्रश्न ?? २॥
(५९) कमलाक्षीची कहाणी : चंद्रमा यत्नशील ॥
(६०) टालडुप्पो वाँगिमाडूऽऽ : अ. वा. वर्टी ३

ग्रंथमाला

श नें

## शिल्लक नाहींत

(१) तिरंगी नवमतवाद : न. चिं. केळकर
(२) विस्तवाशी खेळ : वा. म. जोशी
(४) हास्य-विनोद-मीमांसा : न. चिं. केळकर
(५) सहारा : श्रीधर देशपांडे
(६) बलिदान : न. चिं. केळकर
(७) 'समग्र केळकर' वाङ्मय : खंड १२
(८) चंद्रगुप्त : न. चिं. केळकर
(१२) न्याहारी : वि. म. कुलकर्णी
(१३) वादळी वारे (आ. दु.) : प्रा. केळकर
(१४) इब्सेन : गं. भा. निरंतर
(१५) उन्माद : प्रा. फडके
(१६) बीजांकुर : शांताराम आठवले
(१७) दुसरी सांवली : श्री. बोकील
(१८) कागदी विमानें : र. गो. सरदेसाई
(१९) बोकिलांच्या गोष्टी:
(२०) गुप्त प्रायश्चित्त : प्रा. फडके
(२१) प्रदक्षिणा : (वाङ्मयीन समालोचन)
(२४) सायंतारा : श्रीधर देशपांडे
(२६) लयलूट : कथासंग्रह
(२७) Hindu-Pad-Padashahi: Savarkar
(२८) पालापाचोळा : न. चिं. केळकर
(२९) विसर्जन : वि. म. कुलकर्णी
(३४) ससेमिरा : सरदेशमुख
(३८) साहित्याचा ध्रुवतारा : प्रा. वाळिंबे : किं. ३ रुपये.
(मिळण्याचें ठिकाण : बळवंत पुस्तक भांडार, मुंबई ४.)
(३९) From Quit India to split India : Bhide Guruji.
(मिळण्याचें ठिकाण : श्री. अ. स. भिडे, ८७ शिवाजी पार्क, दादर)
(४५) नेताजीचें सहवासांत : पु. ना. ओक
(५६) सुलभ पाकशास्त्र : सौ. गिरिजाबाई केळकर : किं. २ रुपये.
(मिळण्याचें ठिकाण : बापट आणि कंपनी ठाकूरद्वार, मुंबई २.)

# रसिकेषु निवेदनम् –

माझी हा पहिलीच कादंबरी. पहिलंच पुस्तक.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या काळांतील जीवनाचं चित्रण करण्याचा अल्पसा प्रयत्न लेखकानं आपल्या मगदुराप्रमाणं केला आहे. त्यामुळं या काळांतील जनतेच्या वाढलेल्या अपेक्षा, त्यांचा झालेला भंग; भांडवलदारांनीं दाखविलेली अतिरिक्त नफेबाजीची अराष्ट्रीय वृत्ति, त्यामुळं सामान्य जनतेची अधिकच वाढलेली कुचंबणा, इ. गोष्टींचं विवेचन तिच्यांत कमी अधिक प्रमाणांत येणं स्वाभाविकच आहे. राजकारण व इतर विषयांवर आलेले वाद–संवाद हेहि जनतेंतील या काळांतील उलट–सुलट विचारसरणींचं दर्शन घडविण्याच्या हेतूनंच घातलेले आहेत. अर्थात् पात्रांचा स्वभावपरिपोष सुसंगत होण्यासाठीं त्यांच्या तोंडीं घातलेलीं मतं लेखकाला चिकटविणं रास्त होणार नाहीं. लेखकाचं काम म्हणजे त्या त्या पात्राला आपापल्या विचारप्रणालीनिशीं वाढूं देणं हेंच. त्यांत त्यानं कोणत्या मतांचा अभिनिवेश धरावयाचा ?

प्रस्तुत कथानक एका साखर कारखान्याच्या वसाहतीवर घडतं, असं कल्पिलं आहे. गेलीं कांहीं वर्षं ज्या वातावरणांत मी वावरतों आहे, त्याबद्दल व त्यांतील व्यक्तींच्या आशा–आकांक्षांबद्दल, त्यांच्या स्वभाववैशिष्ट्याबद्दल आपणांला अधिक नेटकेपणानं लिहितां येईल–या भावनेनंच हें वातावरण मीं निवडलं. अर्थात् याबाबतींत माझ्या पदरांत कितपत यश पडलं आहे याबद्दल मी साशंक आहें. आणि लिहितांना जरी मी समरसून लिहीत होतों, तरी अलिप्तपणें राहून वाचणाराला त्याचा प्रत्यय कितपत येईल हेंहि सांगवत नाहीं ! शिवाय, हा माझा पहिलाच प्रयत्न आहे ही गोष्टहि माझ्या अपयशाचं किंवा ( अल्प–स्वल्प ) यशाचं मोजमाप करतांना रसिकांनीं नजरेआड करूं नये अशी विनंति आहे.

आणखी एक गोष्ट. या कादंबरींतील पात्रें व घटना साखर कार-खान्याच्या परिसरांतील असलीं तरी तीं पात्रें व घटना सर्वस्वीं कल्पनेनं निर्माण केलेलीं आहेत ही महत्त्वाची गोष्ट ध्यानांत ठेवावी, म्हणजे प्रत्यक्षांतील कोणत्याहि घटनेशीं वा व्यक्तीशीं संबंध जोडण्याचा विफल प्रयत्न करण्याचा मोह वाचकांना होणार नाहीं.

अशा रीतीनं मी कादंबरी लिहिली खरी; पण मनोहर ग्रंथमालेच्या चालकांनीं ती प्रकाशित करण्याची तयारी दर्शविल्यामुळंच ती आज वाचकांच्या पुढं येत आहे. त्यासाठीं त्या मालेचे चालक श्री. म. म. केळकर व व्यवस्थापक श्री. बा. शा. इनामदार यांचे जेवढे आभार मानावेत तेवढे थोडेच ! तसेंच माझ्या मूळच्या कथेंत नसला तरी लोक-कवि मनमोहनांच्या काव्य–कस्तुरीचा सुगंध तिला प्रकरण २ मध्यें लागल्यानें तेवढ्यापुरती तरी ती सुगंधित झाली आहे असें हमखास म्हणण्याची मला संधि दिल्याबद्दल त्यांचे आभार कसे मानावेत ! या-शिवाय ज्यांच्याकडून अनेक प्रकारचें सहाय्य लाभलें, प्रोत्साहन मिळालें—पण ज्यांना आभार मानणें रुचणार नाहीं—त्यांचेंहि मनांतल्या मनांत कां होईना, आभारपूर्वक स्मरण करणें उचित नव्हे काय ?

१८–९–५०
यत्ते वाडा, मंगळवार,
कोल्हापूर.

व. ह. पिटके

# अनुक्रम


| | |
|---|---|
| १. 'आज हे असते तर–' | १ |
| २. या चंद्रकांताला एखादी चंद्रमुखी भेटूं द्या ! | १० |
| ३. अकल्पित भेट ! | १८ |
| ४. मजूर वसाहतींत ?–छे नंदनवनांत ! | २६ |
| ५. साथी प्रकाश | ३७ |
| ६. कडवट चर्चा | ४५ |
| ७. सुरेश आणि बबनराव | ५५ |
| ८. प्रीति–विश्व | ६३ |
| ९. शंकरचें घरकुल | ७० |
| १०. कवि अन् शिवाय प्रेमिक ! | ७९ |
| ११. राजकारणाचें 'वेड' | ८६ |
| १२. वहिणीच्या मायेचें ऊबदार पांघरूण | ९३ |
| १३. मूकस्पर्श–संगीत | १०३ |
| १४. मर्मभेद करणारा बाण ! | ११० |
| १५. चंद्रकांत दूर जाईल ? | ११८ |
| १६. तो चंद्रकांत आणि हा चंद्रकांत ! | १२६ |
| १७. उन्हाळ्यांतील ती भयंकर दुपार ! | १३५ |
| १८. चंद्रकांत दूर गेला ! | १४५ |
| १९. हेमा अमेरिकेला जाणार ? | १५३ |
| २०. अरेरे ! यंत्रानें घात केला ! | १६२ |
| २१. किरणबाबू | १६७ |
| २२. जीवन–प्रवासांतील मुशाफिर ! | १७४ |
| शुद्धिपत्र | १७८ |

# १

# ' आज हे असते तर— '

ठण्–ठण्–ठण्

भिंतीवरील घड्याळांत तीनचे ठोके पडले. आज शनिवार होता, आणि लक्ष्मी शुगर मिल्स्‌चें ऑफिस शनिवारीं तीन वाजतांच बंद होत असे.

पुढ्यांत असलेलें 'लक्ष्मी शुगर मिल्स्'चें लठ्ठ लेजर-बुक चन्द्रकान्तानें पटकन मिटलें. लेखन–साहित्य झटकन टेबलाच्या खणांत टाकलें. खुर्चीच्या पाठीवर टाकलेला कोट अंगांत घातला आणि इतर सहकारी अद्याप इकडे तिकडे रेंगाळत असलेले किंवा सामानाची आवरसावर करीत असलेले पाहून तो एकटाच चटकन ऑफिसच्या बाहेर पडला.

चन्द्रकान्ताच्या चालींत उतावीळपणा व चर्येवर आनंद ओसंडत होता. त्याचे मूळचेच पाणीदार, टपोरे डोळे आनंदानें अधिकच प्रफुल्लित दिसत होते. कारखान्याच्या 'लक्ष्मीनगर' वसाहतींतील आपल्या चाळीच्या रोखानें त्याचीं पावलें द्रुतगतीनें पडत होतीं.

त्याच्या ह्या उताविळीला अन् आनंदाला तसेंच कारण होतें.

' प्रतिमे 'सारख्या अभिजात मासिकाकडून त्याच्या कवितेला पहिलें पारितोषिक मिळाल्याचें आज जाहीर झालें होतें. ' प्रतिभा ' म्हणजे मरा-

ठींतील श्रेष्ठ दर्जाचें व अभिजात म्हणून प्रसिद्ध असलेलें मासिक. सुमारें चार महिन्यांपूर्वी त्या मासिकाच्या संपादकांनीं उत्कृष्ट कवितांबद्दल एक स्पर्धा जाहीर केली आणि त्या स्पर्धेत उत्कृष्ट ठरणाऱ्या पहिल्या दोन क्रमांकाच्या कवितांना अनुक्रमें शंभर व पन्नास रुपयांची दोन पारितोषिकें देऊं केलीं होतीं. त्यांपैकींच शंभर रुपयांचें पहिलें पारितोषिक चन्द्रकान्ताला मिळाल्याचें आज समजलें होतें.

चन्द्रकान्त हा काव्य क्षितिजावरील एक नवोदित तारा होता. गेल्या वर्षा–दीड वर्षापासूनच त्याच्या कविता 'प्रतिभे'तून व इतर मासिकांतून झळकूं लागल्या होत्या. त्या कवितांचें तें अभिनव व आकर्षक असें सौंदर्य पाहून मधेंच वाङ्मयाकाशांत चमकणाऱ्या अन् मधेंच लुप्त होणाऱ्या शेंकडों सामान्य ताऱ्यांप्रमाणें हा नसून हा शुक्राचा तारा आहे हें रसिकांनीं मनोमन जाणलें होतें. आणि आज जाहीर झालेला निर्णय हा त्या साऱ्या रसिकांचा जणूं एकमुखी अभिप्रायच होता !

मग अशा वेळीं चन्द्रकान्तासारख्या जातिवंत कवीचें हृदय भरून आल्याशिवाय, भावना उचंबळून आल्याशिवाय राहतील काय ?

उंबरठ्यांतून आंत गेल्याबरोबर सर्कन् चपलांतून पाय काढून घेऊन तो थेट आंत स्वैंपाक घरांत गेला. तेथें चुलीजवळ बसलेल्या आईला–सत्यभामाबाईंना–पाहून तो उद्‌गारला—

' आई, मला बक्षीस मिळालं. कवितेला बक्षिसं लावलीं आहेत अन् मी त्यांत भाग घेतलाय् म्हणून म्हणालों होतों ना तुला ! त्यांतलं शंभर रुपयांचं पहिलं बक्षीस मला मिळालं. आजच कळलं. हा पहा अंक. संपादकांचं निराळं अभिनंदनपर पत्रहि आलंय्. हें बघ ! '

त्याच्या बोलण्याच्या घाईवरूनच त्याला झालेला आनंद व्यक्त होत होता.

आपल्या लेकाचा हा पराक्रम व गौरव ऐकून त्या माउलीच्या तोंडून 'खरंच !' हा एकच शब्द बाहेर पडला व तिच्या डोळ्यांत पाणी दाटलें.

' आज हे असते तर त्यांना किती आनंद वाटला असता–' सत्यभामाबाई पुटपुटल्या. पण लगेच त्यांनीं आपलें मन व त्याबरोबरच

डोळ्यांत दाटूं लागलेले अश्रु आंवरले. पदरानें डोळे टिपीत त्या म्हणाल्या 'असंच आपल्या घराचं नांव उजळ बाबा. आणखी असेच मोठमोठे जय मिळूं देत माझ्या राजाला. देवी अंबाबाई—'

नंतर किंचित्काल थांबून त्या म्हणाल्या,

'चन्द्रा, थोडा थांबतोस का म्हणजे चहाबरोबर तुझ्या आवडीचा थोडासा सांजा करून देतें तुला; का आधीं नुसता चहाच करून देऊं दे ?'

'नको, होऊं दे कीं. मी थांबतों.' असें म्हणून चद्रकान्त बाहेरच्या बैठकीच्या खोलींत आला. त्यानें आपली कवितांची वही काढली व आरामखुर्चीत पडून तो ती चाळूं लागला.

× × ×

चुलीजवळ बसून सत्यभामाबाई पातेल्यांतील रवा परतीत होत्या. त्याचवेळीं मनांतल्या मनांत भूतकाळांतील आठवणी परतण्याचेंहि त्यांचें काम चाललें होतें.

चन्द्रकान्ताच्या यशाची हकीकत कळतांच त्यांना आपल्या पतीची—कृष्णाजीपंतांची—आठवण तीव्रतेनें झाली आणि 'हे आज असते तर—' असे उद्गार त्यांच्या मुखावाटें बाहेर पडले. आणि तें अगदीं साहजिकच होतें.

कृष्णाजीपंतांना चन्द्रकान्ताच्या हुषारीचें केवढें कौतुक वाटायचें! किती अभिमान वाटायचा! चन्द्रकान्ताला आपण खूपखूप शिकविणार, त्याच्या इच्छेप्रमाणें त्याला अगदीं प्रोफेसर करणार असें आपलें मनोगत ते बोलून दाखवीत.

तसें पाहिलें तर पिंपळगांवासारख्या खेड्यांत राहात असले तरी कृष्णाजीपंतांची प्राप्तीहि बेताबाताचीच होती--

आपल्या पूर्वायुष्याचा चित्रपट सत्यभामाबाईच्या डोळ्यांपुढून झरझर सरकूं लागला—

कृष्णाजीपंतांना पिंपळगांवच्या इनामदारांच्याकडे कारकुनाची—दिवाणजीची नोकरी होती. दादासाहेब इनामदारांची वतनवाडी बरीच मोठी होती. त्या साऱ्या वतनवाडीकडे जातीनें लक्ष पुरविणें दादासाहेबांसारख्या

मुखांत बाढलेल्या इनामदारांना शक्य नव्हतें आणि शोभून दिसणारेंहि नव्हतें. त्यामुळें त्यांनीं कृष्णाजीपंतांस आपले दिवाणजी नेमलें. त्याबद्दल कृष्णाजीपंतांना वर्षाकाठीं सहाशें रुपये मिळत. कृष्णाजीपंत जरी पिंपळवाडीचेच राहणारे, तरी गांवांत त्यांचें पडीक असें वाडवडिलार्जित घर अन बिघाभर जमीन ह्याशिवाय कांहीं नव्हतें. कृष्णाजीपंतांच्या आजोबाच्या वेळीं त्याच्या मालकीची बरीच जमीन त्यांच्या भाऊबंदांनीं त्या भोळ्या–भाबडया म्हाताऱ्याला फसवून आपल्या घशांत घातली, असें लोक बोलत असत. कृष्णाजीपंतांचे वडील तिशीच्या घरांत असतांनाच वारले. त्यामुळें कृष्णाजीपंतांचा प्रतिपाळ आजोबांनींच केला. आजोबा म्हातारे झालेले, थकलेले, तर कृष्णाजीपंतांचें सात-आठ वर्षांचें पोरवय. साहजिकच त्यांच्या भाऊबंदांना फावल्यास नवल नाहीं. आज ते सारे भाऊबंद कुणी मोठे वकील, कुणी मामलेदार–अशा हुद्याच्या अन् पगाराच्या जागांवर होते. मागे पडलें होतें तें फक्त कृष्णाजीपंतांचेंच घर! कृष्णाजीपंतांचा स्वभाव सालस, गरीब होता. अन् वृत्ति अशी कीं, कधीं कुणाच्या वाळल्या पाचोळयावर पाय पडायचा नाहीं! शिक्षण मराठी फायनलपर्यंत झालेलें. एवढ्या शिक्षणावर त्यावेळीं त्यांना प्राथमिक शिक्षकाची नोकरी सहज मिळून गेली असती. पण त्यावेळीं प्राथमिक शिक्षकास प्रारंभीं मिळणाऱ्या पांच–सात रुपयांकरिता आपलें राहतें गांव सोडून वणवण हिंडत बसणें हें आजोबांना पटण्यासारखें नव्हतेंच. शिवाय आपण नोकरीवर हिंडायचें म्हणजे आपल्या गलितगात्र आजोबांची काठी काढून घ्यायची–या विचारानें कृष्णाजीपंतांनींहि तो नाद सोडून दिला व ते आजोबांच्या जवळ राहिले. त्याचवेळीं दादासाहेब इनामदारांना एखादा तरतरीत दिवाणजी ठेवायचा आहे असें समजतांच आजोबांनीं कृष्णाजीपंतांबद्दल त्यांच्याकडे शब्द टाकला. इनामदारांनीं मान्यता दिली. आणि अशा रीतीनें कृष्णाजीपंतांचा आयुष्यक्रम पिंपळगांवासच दुसऱ्याच्या वतनवाडीसाठीं खस्ता खाण्यांत वेंचला जाऊं लागला.

वास्तविक ह्या आयुष्यक्रमांतहि कृष्णाजीपंतांच्या जागीं दुसरा एखादा

थोडा व्यवहारी किंवा धूर्त इसम असता तर त्यानें स्वतःचें उखळ पांढरें करून घ्यायला विलंब लावला नसता! दादासाहेबांसारख्या व्यवहारांत फारसें लक्ष न घालणाऱ्या जमीनदाराचें कारभारीपण. असलें कारभारीपण म्हणजे मालकानें आपल्याला चरायला दिलेलें हिरवेंगार कुरणच अशीच वृत्ति बहुतेक कारभाऱ्यांची असते. पण वर सांगितलेला कृष्णाजीपंतांचा सालस, निर्लोभी स्वभाव म्हणा, किंवा त्यांच्यावर झालेले वडिलोपार्जित संस्कार म्हणून म्हणा—कृष्णाजीपंतांनीं कधीं इनामदारांच्याकडून मिळणाऱ्या वार्षिक तनख्याशिवाय एका तनसडीचीहि अपेक्षा धरली नाहीं. त्यांना देखरेखीसाठीं इनामदारांच्या मळ्यांत वगैरे बरचेवर जावें लागे. मग येते वेळीं तिथला वांटेकरी त्यांच्या पदरांत कधली तरी भाजी म्हणा, केळफूल म्हणा, बांधून देई. पण कृष्णाजीपंत ती भाजी इनामदारांच्या वाड्यांत पोंचती करायचे अन् मग त्यांनीं फारच आग्रह केला तर त्यांतली थोडी स्वतःकरितां घरीं आणायचे!

त्यांचें लग्न झालें. संसाराचा पसारा वाढूं लागला. तरी त्यांची ही वृत्ति कायमच राहिली.

अर्थात् अशा नेकीनें राहणाऱ्या माणसाच्या घरीं लक्ष्मीनें वास करण्याचें नाकारलें तर नवल नव्हतें!

कृष्णाजीपंतांना कधीं कधीं या परिस्थितीची खंत वाटे, नाहीं असें नाहीं. विशेषतः दिवसमान बदलत गेल्यावर व संसार वाढूं लागल्यावर मनाला अस्वस्थ करणारे प्रसंग वरचेवर येऊं लागले.

त्यांना एकंदर आठ मुलें झालीं. त्यांत मुलगे दोनच. बाकीच्या साऱ्या मुली. दोन मुली व चंद्रकांताच्या आधींचा मुलगा वर्ष सहा महिन्यांचे असतांनाच काळानें त्यांना सत्यभामाबाईच्या अंगावरून ओढून नेलें. दुसऱ्या दोन मुली—यमुना बारा तेरा वर्षांची होऊन देवी येण्याचें निमित्त होऊन गेली, तर चार वर्षांची कमळी नारळासारखें टम् पोट फुगून वारली. पिंपळगांवापासून कऱ्हाड सात-आठ मैलांच्या टप्प्यांत असलें तरी डॉक्टर, वैद्य करण्यापेक्षां शक्यतोंवर घरगुती उपचारांवरच भागविण्याची खेडेगांवांतील लोकांची प्रवृत्ति आणि डॉक्टरांना बोलावण्याची

कल्पना, निघाली तरी उशीर झालेला असायचा किंवा त्यावेळीं जवळ पैसा नसायचा !

चंद्रकांत त्यांचा तिसरा मुलगा आणि गोदावरी न् शांता त्याच्या पाठच्या. अगदीं बाळपणापासूनच चंद्रकांत चुणचुणीत अन् तल्लख बुद्धीचा म्हणून सर्वांना हवाहवासा वाटायचा. शिक्षकवर्गहि त्याच्यावर अगदीं निहायत खूष. तो मराठी; चौथ्या इयत्तेंत असतांना त्याच्या वर्गावरील दंडवते मास्तरांनीं मोठ्या हिरीरीनें न् उत्साहानें त्याला स्कॉलरशिप परिक्षेला बसविण्याची तयारी त्याच्याकडून करून घेतली. हुषार विद्यार्थी आणि उत्साही शिक्षक असा सुयोग जुळून आल्यावर काय होणार नाहीं ! दंडवत्यांनीं जितक्या उत्साहानें चंद्रकांताला हाताशी धरून त्याच्याकडून अभ्यास करवून घेतला होता, तितक्याच प्रमाणांत चंद्रकांतानेंहि सबंध जिल्ह्यांत पहिला नंबर पटकावून त्यांच्या श्रमाचें चीज केलें. त्यांना मोठें समाधान वाटलें. त्यावेळीं वाटलेल्या पेढ्यांनीं दंडवते मास्तरांची कुचेष्टा करणाऱ्या शिक्षक मंडळींचीं तोंडें आपोआपच बंद पडलीं व एखादा खारट तुरट पदार्थ जिभेला चाखायला मिळावा तशीं दिसूं लागलीं !

मात्र चंद्रकांतानें मिळविलेल्या या यशामुळें त्याला इंग्रजी शिक्षणासाठीं कुठें तरी शहरांत पाठवणें कृष्णाजीपंतांना भाग पडलें. कऱ्हाड जवळ आठ मैलांवर. अर्थात् तेंच ठरलें, पण दहा-अकरा वर्षाच्या एकुलत्या एका मुलाला दूर कसें ठेवायचें ? तो तरी कसा राहील ? पण काणे मास्तरांच्यामुळें तो प्रश्न सुटला. तिथल्या हायस्कुलांत काणे आडनांवाचे एक गणिताचे शिक्षक होते. त्यांना मूल बाळ कांहीं नव्हतें. नवरा-बायको दोघेच घरांत. ते दयाळू होते, आणि होतकरू पण गरीब मुलांना ते जेवणाचा वार किंवा द्रव्यद्वारें मदत करण्याबद्दल प्रसिद्ध होते. त्यांनीं चंद्रकांताला मोठ्या आनंदानें आपणांकडे ठेवून घेतलें. त्या प्रेमळ जोडप्याचा चंद्रकांतावर किती लवकर लोभ जडला पण ! चंद्रकांताचेंहि चित्त त्या घरांत तसेंच रमलें. परीक्षा, अभ्यास, अन् बक्षिसें यांत तो गुंगून जाऊं लागला. बाजारासाठीं वगैरे जा, ये करणाऱ्या गाड्यांतून त्याची महिन्यांतून एखाद, दुसरी खेप पिंपळगांवाला होई. घरीं आल्यावर त्या जोडप्याच्या

प्रेमळ स्वभावाच्या कितीतरी गोष्टी तो आईवडिलांजवळ सांगे. चंद्र-कांताचा गौरवर्ण अन् त्याच्या तोंडावळयाची ठेवण साधारणपणें मास्तरीण-बाईच्या तोंडावळ्यासारखीच असल्यामुळें कुणी परकी माणसें घरीं आल्यास चंद्रकांत आपला धाकटा भाऊ असल्याचें त्या त्यांना दसें सांगतात आणि त्यांच्या प्रेमळ वागणुकीमुळें त्यांनाहि तें खोटें कसें वाटत नाहीं, हें चन्द्रकान्त सांगूं लागला कीं, सत्यभामाबाईना गहिंवरल्या-सारखें होई.

वर्षामागून वर्षे जात होतीं. चन्द्रकान्त दरवर्षी परिक्षेंत पहिला नंबर व बाक्षिसें पटकावीत होता. नुसती अभ्यासांतच नव्हेत तर निबंध-लेख-नाच्या चढाओढींत, वक्तृत्वाच्या स्पर्धेतहि ! आणि सुटींत घरीं आल्या-वर पुस्तकें–पदकें, आई-वडिलांना दाखवीत होता. गोदू–शांताच्या पोल-क्यांना लटकावून देत होता ! हें सारें पाहून दोघांहि माय-पित्यांचे ऊर आनंदानें भरून येत होते. आपल्या मार्गे पडलेल्या घराचें नांव आपला चन्द्रा उजळ करणार अशीं गोड आशास्वप्नें त्यांना दिसत होतीं. पण—

एकसारखे उत्कर्षाचे दिवस कधीं कुणाला लाभले आहेत ?

ह्याचाच प्रत्यय त्या कुटुंबालाहि आला.

चन्द्रकान्त मॅट्रिकचे वर्गात होता. यंदाचें त्याचें कसोटीचें वर्ष होतें. त्याचा अभ्यास जोरांत चालू होता. आतां तो सुटींतहि फारसा पिंपळ-गांवाला येईनासा झाला. क्वचित् आला तरी पुस्तकांतून डोकें वर काढीत नसे.

जानेवारींतील थंडीचे दिवस होते ते. एके दिवशीं संध्याकाळीं कृष्णाजीपंत दोन मैलांवरच्या बेलवाडीच्या मळयांतून आले व अंगावर किंचितसा कांटा येतो न् अंग कसकसल्यासारखें वाटतें म्हणून न जेवतां-सवरतां तसेच अंथरुणावर जाऊन पडले. शाळूचा हंगाम होता. दमल्या-भागल्यानें असेल म्हणून तिकडे कुणी विशेष लक्ष दिलें नाहीं. दुसरें दिवशीं सकाळीं बरें वाटतंय् असें पाहिल्यावर दुसऱ्या एका शेतावर शाळूची कापणी सुरू व्हायची होती तिकडे सत्यभामाबाई ‘ नको नको ’

म्हणत असतां ते गेले. अंगावर ताप काढला गेला, झालें. दोन दिव-सांनीं पुन्हां त्यांनीं अंथरूण धरलें. ताप कमी होईना. चिन्हं कांहीं वेगळेंच दिसूं लागलें. सत्यभामाबाई घाबऱ्या झाल्या. दादासाहेबांनीं स्वतःचा ब्रेक ( ' भिरकं '–त्याचें प्रचारांतील गांवठी नांव ) पाठवून कऱ्हाडाहून डॉक्टर आणवला. चन्द्रकान्तहि आला. डॉक्टरांनीं आपल्या-कडून शिकस्त केली. पण—

नवव्या दिवशीं रात्रीं दहा–साडेदहा वाजण्याचा सुमार. कृष्णाजी-पंतांच्या घरांत रडण्याचा एकच कल्लोळ उडाला. मृत्यूनें आपलें काम केलें होतें. चन्द्रकान्तानें धाडकन् आईच्या कुशींत अंग टाकून ओक्सा-बोक्शी रडण्यास सुरुवात केली. गोदू–शांता किंचाळून आईकडे धावल्या. सत्यभामाबाईच्या दुःखाचें वर्णन कसें करणार ?

या दुर्दैवी घटनेनंतर सत्यभामाबाईच्या संसाराचें–कीं ग्रहदशेचें ?–नवें पर्व सुरू झालें. गोदू त्यावेळीं अगदीं गळ्याला लागलेली. तिला लवकर उजविणें भाग होतें. कृष्णाजीपंतांचे निधनानंतर चन्द्रकान्त बरेच दिवस आईजवळ पिंपळगांवास राहिला. त्याचें अभ्यासाकडे चित्त लागेना. एकीकडे पित्याचें छत्र हरपल्याचें दुःख तर दुसरीकडे घरांतील कर्ता पुरुष गेल्यानें घराची जबाबदारी शिरावर घेण्याची जरूरी ! चन्द्र-कान्त पहावा तर अवघा अठरा वर्षांचा. अद्याप शाळेबाहेरचें जग न पाहिलेला तरुण ! बरें, घरची आर्थिक परिस्थिति पाहायची म्हटली तर काय होतें घरांत पाहायला ? नाहीं म्हणायला, गोदूच्या लग्नासाठीं म्हणून दोनशें रुपये अलीकडेच बाजूला काढून ठेवले होते कृष्णाजीपंतांनीं. तेवढ्यांत कसेंबसें गोदूचें लग्न उरकून टाकलें. तिचा नवरा लक्ष्मी शुगर मिल्सच्या ऑफिसांतच टायपिस्ट होता त्यावेळीं.

चन्द्रकान्तानेंहि आतां कुठेंतरी नोकरी करण्याशिवाय गत्यंतर नव्हतें. आपलीं सारीं उच्च ध्येयें, साऱ्या महत्त्वाकांक्षा, सारे उच्च विचार दूर करावीं लागलीं त्याला ! त्या साऱ्या गोष्टींचा त्यानें मोठ्या कष्टानें पण निग्रहानें त्याग केला–अगदीं स्वतःचीं कवचकुंडलें देणाऱ्या उदारधि कर्णाप्रमाणें ! या मनस्तापांत त्याला मॅट्रिकच्या परिक्षेंतहि चांगलें यश

मिळणें शक्य नव्हतें. पहिल्या वर्गांत यायलाहि त्याला थोडे मार्क कमीच पडले.

केवळ एक वर्षापूर्वी कॉलेजांत जाण्याचे बेत करणारा चन्द्रकान्त जून महिन्यांतच आपल्या नव्या मेहुण्याच्या ओळखीनें लक्ष्मी शुगर मिलस् मधील ऑफिसांत नोकरीवर रुजू झाला. आपल्या मेहुण्याच्या बिऱ्हाडा-शेजारींच सत्यभामाबाई व बारा–तेरा वर्षांची शांता ह्यांच्यासह दोन खणांच्या दोन खोल्यांत त्यानें आपलें बिऱ्हाड मांडलें! पुढें त्याचे मेहुणे दुसरीकडे नोकरीला गेले. नवीन दगडी चाळ बांधून झाल्यावर चन्द्रकान्तालाहि त्या चाळींत जागा मिळाली. तीच त्याची सध्यांची राहण्याची जागा.

पण हिरा उकिरड्यावर पडला तरी तिथूनहि तो लोकांचे डोळे दिपव-ल्याशिवाय राहात नाहीं म्हणतातना? चन्द्रकान्ताचें बाबतींत त्याचा प्रत्यय येऊं लागला. लौकरच तो आपल्या हुषारीमुळें अधिकारी वर्गांत प्रिय झाला. विद्यार्थीदशेपासून असलेल्या काव्यलेखनाच्या छंदाला व्यासं-गाची जोड देऊन त्या कलागुणाचेंहि त्यानें चांगलें संवर्धन केलें. गेल्या वर्षांपासून त्याच्या कविता चांगल्या चांगल्या मासिकांतून प्रकाशित होऊं लागल्या. आज तर त्याला पहिलें पारितोषिक मिळालें. सत्यभामाबाईच्या निस्तेज मुखावर पुन्हां आशेचा तजेला चढला. आणि त्यांच्या मुखांतून 'असंच आपल्या घराचं नांव उजळ, बाबा–' असे उद्गार बाहेर पडले.

हे त्यांचे उद्गार म्हणजे मागील साऱ्या आठवणींचें सारच होतें जणूं कांहीं!



२

# 'ह्या चंद्रकांताला एखादी चंद्रमुखी भेटूं द्या'

चंद्रकांतानें आपली कवितांची वही मिटली आणि आपल्या लेखन साहित्यांतून दुसरें एक लहान आकाराचें व सुबक, काळया बांधणीचें नोटबुक उचललें. तें उघडतांच आंत पहिल्या पानावर सुंदर अक्षरांत लिहिलेल्या ' माझी लेखन तपश्चर्या ' ह्या शब्दांवर त्याची दृष्टि किंचित्काल ठरून राहिली. लेखन ही एक कला आहे व कला ही तपश्चर्येशिवाय साध्य होत नाहीं अशी त्याची प्रामाणिक समजूत असल्यामुळें काव्य लेखनाला प्रारंभ केल्यापासून स्वतःला आलेले कडू, गोड अनुभव, वाचन मननाच्या मंथनांतून जमा झालेलीं विचाररत्नें, आपल्या आशा आकांक्षा, प्रगतीच्या मार्गावर आपली झालेली वाटचाल ह्या साऱ्या गोष्टींची नोंद त्यानें या डायरींत ठेवली होती. ही नोंद तो कसला आडपडदा न ठेवतां निस्संकोचपणें करीत असे. माणसाच्या हृदयाच्या अगदीं आंतल्या गाभ्यांत असे कांहीं विचार असतात कीं, ते दुसऱ्या कुणाला सांगायला तर त्याला संकोच वाटतो, पण त्याचवेळीं ते कुणाला तरी सांगावेत, आपल्या विचारांत कुणाला तरी सहभागी करून घ्यावें अशीहि एक प्रकारची हुरहूर त्याला लागलेली असते. तेव्हां आपल्या डायरीलाच तो आपली जिवलग सहचरी समजून तिच्याजवळ आपलें. सारें मनोगत व्यक्त करतो. त्यांत त्याला एक तऱ्हेचें समाधान लाभतें.

निदान चन्द्रकान्ताची तरी तशी कल्पना होती.

आणि आज ह्यावेळीं त्याची नजर ' माझी-लेखन तपश्चर्या ' ह्या शब्दांवर खिळून राहिली, ती ते शब्द त्याला अपरिचित होते किंवा ते त्याला तेथें पूर्वी लिहिलेले दिसले नव्हतें; म्हणून बिलकुलच नव्हे तर आज त्याला त्या शब्दांचा खराखुरा अर्थ प्रतीत झाला होता. त्याचें यथार्थत्व आज त्याच्या अंतःकरणाला बरोबर पटलें होतें. आज त्याच्या दृष्टीनें ते

तीन साधे शब्द नव्हते. तें एक मोठें सत्य होतें. गोड शेवट असलेला तो एक अनुभव होता !

नोट बुकाचीं पानें उलटतां उलटतां त्याची दृष्टि त्यांतील मजकुरावरून फिरूं लागली. एखाद्या उंच अशा डोंगर-शिखराची चढण चढत असतांना माणसानें मधून मधून किंचित्काल थांबून आपण चालून आलेल्या मार्गाकडे दूरवर नजर खेंचीत नेण्यांत एक प्रकारचें सुख असतें ना ? तसलेंच सुख तीं पानें उलटत असतांना चन्द्रकान्ताला होत होतें. एक दोन पानें उलटल्यावर तो थांबला. काव्य लेखनाच्या प्रारंभींच्या काळांतील एक आठवण होती ती:

" काल रात्रीं एक कविता लिहिली मीं. तिला निमित्त झालेला तो प्रसंग. खरोखरीच किती करुण दृश्य होतें तें ! काल संध्याकाळीं मी फिरून परत येत होतों. तेव्हां एका आठ दहा वर्षांच्या मुलाच्या दंडाला दोरखंडानें बांधून दोन शिपाई त्याला कचेरीकडे घेऊन जातांना दिसले. त्याच्या गालावरून ओघळलेले अश्रु सुकले होते. त्याची चर्या कमालीची दिनवाणी दिसत होती. अंगावर एकहि कपडा नव्हता. फक्त कमरेला जुनाट, मळकट कापडाची एक लंगोटी ! भिल्ल कातकऱ्याच्या मुलासारखा दिसत होता तो. आठ दहा वर्षांचा तो मुलगा. तो काय चोरणार ? आणि समजा त्यानें कांहीं चोरलें असलें तरी इतक्या बालवयांत त्याच्यावर ही पाळी कां यावी ? हें त्याचें शिकण्यासवरण्याचें वय. जगाच्या व्यवहाराची काळजी न करतां खिदळण्या—बागडण्याचे त्याचे दिवस ! हीं त्याचीं सुखें, हे हक्क कुणी हिरावून घेतले ? कां घेतले ? आणि वर ही शिक्षा ! मला चैन पडेना. रात्रीं अंथरुणावर पडलों तरी डोळा लागेना. अखेर माझ्या हातून ती कविता लिहून झाल्यावर मनाला थोडेसें हलकें वाटलें. कवितेचा शेवट असा केला आहे:

गुलाब गौरवि श्रीमंतां । नी गरिबांना टोचे काटा
कस्तुरि भाळीं राजाच्या । गरिबा हातीं तीर-कामठा
आणि देवता न्यायाची । असे आंधळी धरीं पांगळीं
श्रीमंताची देवदिवाळी । नी दलितांच्या मुखीं काजळी

चन्द्रकान्तानें आणखी कांहीं पानें उलटलीं. नंतर एका पानावर थांबून तो वाचूं लागला.

"चारपांच दिवसांपूर्वी ××× मासिकाकडे एक कविता पाठवली होती. एका घरगुती, साध्या दृश्याचें वर्णन होतें तिच्यांत. आपल्या तीन चार वर्षांच्या मुलीला जेवायला बसवून तिची आई कामधामा·निमित्त कुठें इकडे तिकडे जाते. जेवण झाल्यावर ती बालिका आपल्या आईच्या सारखें उष्टें काढून जमीन सारवून घेते. हें तिचें काम चालू असतांनाच तिची आई परत येऊन तें सारें दृश्य वात्सल्यभरानें पाहात राहाते, असें वर्णन तींत आहे. कविता लिहून झाल्यावर मीं ती आईला वाचून दाखवली. तिला ती आवडली. विशेषतः—

चारुशील ही हंसरी बाला
पहा लागली घरकामाला
भुई सारवी झरझर सारी
मनीं आइच्या ये सुखलहरी

हें त्या मुलीचें वर्णन तर आईला फारच आवडलें. पण गंमत अशी कीं, ही कविता त्या मासिकानें आज 'साभार परत' धाडली आहे ! सामान्य रसिकांची व संपादकांची अभिरुचि भिन्नभिन्न असते काय ?"

चन्द्रकान्तानें पुढलें पान उलटलें.

"काल इथल्या गणेशोत्सवांत माझें काव्य–गायन झालें. माझी इच्छा नसतांना उत्सव-चिटणीसांच्या आग्रहाला मी बळी पडलों. श्रोत्यांचें चित्त माझ्या कवितांनीं रिझावें तसें रिझेना. एखादी 'ढंगदार' कविता म्हणा, 'सागर उफाळला' सारखी एखादी होऊं द्या, असे आवाज उठले. तेव्हां मीं त्यांना सांगितलें—'माफ करा. तुम्हांला आवडतील अशा ढंगदार कविता माझ्याजवळ नाहींत. माझ्या ह्या कविता नको असतील, तर मी माझें काव्यगायन बंद करतों.' आणि मी तडक व्यास-पीठावरून खालीं उतरलों."

आज 'प्रतिभे'च्या अंकांत माझी कविता छापून आली. बरचेवर अंकांतील माझ्या कवितेचें पान उघडून माझी कविता व तिच्याखालील

माझें नांव मी न्याहाळून पाहात होतों. जणूं काय ती कविता आणि तिच्या खालील नांव माझेंच आहे काय, याचा मी संशयच फेडून घेत होतों! याच मासिकांत पूर्वी 'यशवन्त', 'कुसुमाग्रज' इत्यादींच्या कविता वाचतांना आपल्या कविता या मासिकांतून कधीं छापून येतील का असें वाटायचें! आज—"

पान उलटून चन्द्रकान्त वाचूं लागला—

"आतां माझ्या कविता निरनिराळ्या मासिकांतून छापून येत आहेत. रसिकांच्या व मासिकांच्या संपादकांच्या अधून मधून येणाऱ्या उत्तेजक पत्रांमुळें अधिकाधिक लिहायला धीर व उत्साह येत आहे. अद्याप मला कितीतरी प्रगति करावयाची आहे."

इतक्यांत—

'कविराज, अहोऽकविराऽज, काय चाललंय?' या हाकाटीनें तो भानावर आला. मान वर करून त्यानें दाराकडे पाहिलें. त्याच्या ऑफिसांतले दोघे तिघे सहकारी आलेले दिसत होते. 'याऽऽऽ' असा लांबलचक स्वागतपर उद्‌गार काढून चन्द्रकांतानें आपला लेखन पसारा आवरता घेतला त्यांच्यापैकीं, पोशाखावरून व चालण्यावरून कांहींशा सभ्य व धीरगंभीर दिसणाऱ्या, काण्या डोळ्याच्या गृहस्थाचा रोख आरामखुर्चीवर बसण्याचा दिसला. पण दुसऱ्या किडकिडीत नाकेल्या पण योड्याशा पोरकट वर्तनाच्या तरुणानें चलाखी करून तें स्थान पटकावलें. तेव्हां त्या गृहस्थांनीं—दर्शने त्यांचें आडनांव-चेहऱ्यावर उसनें हंसें दाखवून व आपला काणा डोळा मिचकावून कॉटवरील आपल्या दुसऱ्या मित्राचा शेजार पत्करला.

'काय महाशय, आज आमची वाट न पाहतां अगदीं तीनच्या ठोक्याबरोबर चोर पावलानें एकटेच निघून आलांत ते? बक्षिसाचा चहा बुडवायचा बेत होता वाटतं?—" आरामखुर्चीतल्या मित्रानें बोलतां बोलतां कोटाच्या खिशांतून एक विडी बाहेर काढली व पेटीवर काडी ओढल्याचा बोटानें आविर्भाव करून चंद्रकान्ताकडे पेटीची मागणी केली. पावगी त्याचें नांव. मोठी नमुनेदार व्यक्ति होती ती. विडीची तर त्याला भारी तल्लफ.

पण गंमत अशी कीं, त्याच्या स्वतःजवळ विडी क्वचितच असावयाची. ऑफिसांतदेखील एकाची विडी तर दुसऱ्याची काडी घेऊन स्वारी स्वतः-ची तल्लफ भागवायची! आणि त्याची मागण्याची तऱ्हासुद्धां अशी कीं, जणूं कांहीं हक्कानेंच आपण दुसऱ्याला विडी मागतों आहोंत! आणि त्याच्या विनोदी स्वभावाला तें खपूनहि जाई! बाकी, ह्यावेळीं त्याच्या खिशांत विडी निघावी हें नवलच!

'अरे, चहा बुडण्याची भीति कशाला? तुलाच चहांत बुडवून काढतों कीं मग तर झाल?–' त्याच्या बोलण्याला हंसत हंसत उत्तर देत काड्याची पेटी आणण्यासाठीं चन्द्रकान्त आंत गेला.

'अरे पावगी, चन्द्रकान्त कवि आहे. शब्दांच्या कसरतींत तो तुला ऐकायचा नाहीं. हे लेखक लोक कोट्यांनींच माणसाला गार करतात. आरामखुर्चीवर बसण्याच्या झटापटींत पराभूत झालेले दर्शने डोळा मिचकावीत बोलले.

'आधीं चहानं गरम करूं दे. मग कोट्यांनीं गार होण्याचं पाहूं–' चन्द्रकान्तानें आणलेली काड्याची पेटी घेत पावगी उत्तरले;

थोड्या वेळानें चहा तयार झाल्याचें आईनें आंतून सांगतांच चन्द्र-कान्तानें बाहेर आणून तो सर्वांना दिला. कांहीं वेळ गप्पांत खंड पडला. पावगीनें आपली अर्धी जळत आलेली विडी विझवून काड्याच्या पेटीवर ठेवली आणि पुढें आलेल्या चहाचा तत्परतेनें आधीं समाचार घेतला. त्याच्याजवळ बहुधा तेवढीच विडी शिल्लक असावी! कारण चहानंतर पुन्हां इकडच्या तिकडच्या गप्पा सुरू होतांच त्यानें पुन्हां तीच विडी शिलगावली.

नंतर तें मित्रमंडळ चन्द्रकान्तासह टेकडीकडे फिरायला जाण्यासाठीं बाहेर पडलें.

चन्द्रकान्त राहात असलेली चाळ कारखान्याहून कलापूरला जाणाऱ्या रस्त्यालगत त्याला समांतर अशी बांधलेली होती. चाळीचीं पिछाडीचीं दारें रस्त्याच्या बाजूला होतीं. परसदारीं लोकांनीं भाजीपाला, वेल वगैरे लावले होते. ते लवकरच मुख्य रस्त्याला मिळाले. त्या रस्त्यानें दोन

फर्लांग चालून गेले, कीं उजवीकडे टेकडीवर जाण्याची पाऊलवाट लागे. तिथून टेकडी सुमारें फर्लांगभर राही. रस्त्याच्या उजव्या बाजूला ' लक्ष्मी-नगर ', नंतर टेकडीच्या पायथ्यापर्यंत थोडेसें माळरान, तर रस्त्याच्या डाव्या अंगाला उंसाचीं हिरवीगार पिकें लांबवर पसरलेलीं होतीं. चालतांना उंसावरून आलेली गार वाऱ्याची झुळुक त्यांच्या अंगावरून गेली. ऑक्टोबर महिन्यांतील उष्णतेचा उपशम करणारी ती झुळुक त्यांना आल्हादकारक वाटली.

टेकडीवर आले कीं, कारखान्याच्या गजबजाटांतून, धडधडाटापासून दूर आल्यासारखें वाटे. चन्द्रकान्ताचें फिरायला येण्याचें आवडीचें ठिकाण हेंच होतें. तो एकटाच येई तेव्हां कितीतरी वेळ सभोंवतालच्या दृश्याकडे तो पाहात राही. अनंत विचार त्याच्या मनांत घोळूं लागत. अनेक कल्पना त्याला सुचत. त्याच्या कांहीं कविता त्याला इथेंच स्फुरल्या होत्या.

आजहि टेकडीवर आल्यावर बसतां बसतां त्यानें सभोंवार नजर टाकली. समोर दृष्टीच्या टप्प्यापर्यंत उंसाचीं कमी अधिक उंचीचीं पिकें दिसत होतीं. पूर्ण वाढलेलें व तुरा आलेलें जें पीक होतें तें मंद वाऱ्याच्या झुळुकेबरोबर तुरे वाकवतांना पाहिल्यावर एखाद्या प्रचंड सभेंत वक्त्याच्या भाषणाला मधून मधून संमतिदर्शक मान डोलावणाऱ्या सभ्य श्रोतृसमुदायाची आठवण होई. तर जें अद्याप हिरवें कमी उंचीचें पीक होतें, तें त्याच झुळुकेनें आपलीं हिरवींगार पातीचीं अंगें अवखळपणें घुसळून काढी, तेव्हां सायंकाळीं क्रीडांगणावर हुंदाडणाऱ्या अवखळ मुलांसारखी त्याची कृति वाटे. मानवी सृष्टीप्रमाणें वनस्पति सृष्टींतहि प्रौढांच्या अंगीं सभ्यपणा व बालांच्या अंगीं अवखळपणा ह्या प्रवृत्ति असतात काय अशी कल्पना मनांत येऊन चन्द्रकान्ताच्या चर्येवर किंचित् स्मित उमटलें.

' आजच्या ह्या गोड कार्यक्रमाचा शेवट तुमच्या एखाद्या फर्मास कवितेनं होऊं द्या बुवा ' पावगीनें चन्द्रकान्ताच्या एकतानतेचा भंग करींत सूचना केली.

' तुझं हें ' फर्मास ' विशेषण तुझ्या आवडत्या विडीपुरतंच राहूं दे, पावगी. दर्शन्यांनीं डोळा मिचकावीत शेरा मारला.

'फर्मास राहिली, भाव-मधुर म्हणा, रसाळ म्हणा, दिलखेचक म्हणा,' पावगीनें दुरुस्ती केली.

'खरंच चन्द्रकान्त, तुझी ती 'प्रतिभे' कडून बक्षीस मिळालेली कविता म्हण कीं. 'कविता मुखेंच काविच्या' ऐकूं दे तरी एकदां. दर्शन्यांनीं पुस्ती जोडली.

चन्द्रकान्तानें विशेष आढेवेढे न घेतां कविता म्हणण्यास सुरुवात केली. त्याचा आवाज मधुर नसला किंवा गायनांतली त्याला विशेष माहिती नसली तरी त्याची कविता म्हणण्याची पद्धत सकंप व भावनानुसारी होती. एखादा चांगला चरण तो एकदोनदां घोळून म्हणे. कविता ऐकतांना पावगीचे हातवारे करणें किंवा एखादी चांगली कल्पना आढळली कीं, एखाद्या दर्दी माणसाप्रमाणें 'वा, वा' 'बहोत अच्छा' असे उद्गार काढणें चालूच होतें.

कविता संपल्यावर किंचित्काल सर्वजण स्तब्ध बसले. काळोख पडूं लागला होता. चन्द्रकान्तानें लक्ष्मीनगरकडे नजर टाकली. विजेचे दिवे लागले होते. आकाशांतील तारकासमूहाशीं स्पर्धा करणारा दुसरा एखादा तारका समूहच कुणीतरी निर्माण केल्याचा त्याला भास झाला.

'चला' असें म्हणून दर्शने उठून उभे राहिले. इतरांनींहि त्यांचें अनुकरण केलें.

'बाकी कांहीं म्हणा, चन्द्रकान्त तुमं कौतुक करावंसं वाटतं.' आतांपर्यंतच्या एकंदर खेळकर वातावरणाला भावनात्मक कलाटणी देत दर्शने बोलूं लागले.

'आमच्या बरोबर खर्डेघाशी करणाऱ्या कारकुनांतून एक चांगला कवि निघावा ही खरंच किती अपूर्व गोष्ट आहे, निदान आमच्या दृष्टीनं तरी. नाहींतर आम्ही घांसतोंच आहोंत खर्डे–कंठतोंच आहोंत लाजिरवाणं जिणं! ना त्यांत उमेद, ना उत्साह. संध्याकाळीं हाश्श् हुश्श् करीत घरीं यायचं–पुन्हा दुसरे दिवशीं सकाळीं कसेबसे दोन घांस पोटांत ढकलून ऑफिसांत जायचं. त्याच त्या फायली चाळायच्या न् तींच तीं

लेजर बुकं काळीं करीत बसायचं ! जीवनांत कांहींतरी नावीन्य पाहिजे, ध्येय पाहिजे. माणसाला कांहींतरी छंद हवा, आवड हवी.'

'अहो, कसला छंद न् कसली आवड घेऊन बसलांत ? छंद न् आवड असली तरी ते पुरे करायला सवड पाहिजे का नको' ? पावगी बोलूं लागले. 'कलापूरला हायस्कुलांत शिकत असतांना मला गाण्याचा नाद होता न् तिथल्या गायन शिक्षकाच्या आग्रहानं मीं संगीत-विद्यालयांत नांवादेखील घातलं होतं. पण पुढं लग्न झालं न् ह्या कारखान्यावर नोकरीला आल्यावर—हें आणा, तें संपलंय. बगी कालपासनं जास्तच किरकिरतीय. पोरांच्या दंगा मस्तींत रामूच्या डोक्याला खोक पडली—असं रडगाणं रोज सुरू झालं. मग कसलं गाणं सुचतंय ? बाकी चन्द्रकान्ताच्या बाबतींत तसं व्हायचं नाहीं बहुधा—'

'चन्द्रकान्ताची लेखनाची आवड न् व्यासंग फार वेगळीं आहेत, पावगी.' दर्शने.

'तें तर झालंच. शिवाय कवि म्हणजे प्रेमाचा भोक्ता; प्रीति देवतेचा उपासक. विवाह होऊन गोड माणूस घरांत आल्यावर त्या गोड वातावरणांत गृह-संसार न् काव्य-संसार एकदमच बहरायला काय उशीर !'

'चन्द्रकान्ताच्या काव्याला केव्हां बहर यायचा तेव्हां येईल. पण चन्द्रकान्ताकडे चहाला आल्यापासून तुझ्या वाणीला मात्र चांगलाच बहर आल्यासारखा दिसतोय.'

'पुष्पसंगें मातीस वास लागे.' आतांपर्यंत जवळ जवळ मौन धरून श्रोत्याची भूमिका घेणाऱ्या तिसऱ्या मित्रानें आपलें काव्यज्ञान प्रगट केलें.

संभाषणावरून पाहिलें तर हा सहवास-गुण तिघांनाहि लागल्यासारखा दिसत होता !

'मी म्हणतों तें खोटं आहे कां ? तुम्हांला ती चन्द्रकान्त मण्याची गोष्ट माहीत आहे कीं नाहीं ? तो मणि म्हणे चन्द्रप्रकाशांत पाझरूं लागतो. आमच्या ह्या चन्द्रकान्तालाहि एखादी चन्द्रमुखी भेटूं द्या, मग पहा हा सुद्धां कसा पाझरेल तो. तेव्हां पटेल तुम्हांला माझं बोलणं.' पावगीच्या ह्या बोलण्याचें चन्द्रकान्ताच्या मित्रांनीं तर 'भले शाबास' ह्या

उद्‌गारांनीं स्वागत केलेंच, पण आपल्या स्तुतिपर चाललेल्या संभाषणांत इतका वेळ साधारणपणें तटस्थवृत्तीनें राहणाऱ्या चन्द्रकान्ताच्या मुखा-वरहि त्यामुळें किंचित् स्मित झळकल्याशिवाय राहिलें नाहीं. त्या कल्पनेनें त्याच्या अंगांतून एक गोड चमक उठून गेली.

पावगीचे ते उद्‌गार नंतर बराच वेळ त्याच्या मनांत घोळत राहिले.

कुणास ठाऊक, भवितव्यतेच्या उदरांत काय होतें तें !



# ३

# अकल्पित भेट !

लक्ष्मीनगरसारख्या मजूर वसाहतींत आपल्याला कसें काय गमेल याची पुणें सोडतांना हेमलतेला मोठी चिंताच वाटत होती. आपल्या कॉलेजमधील मैत्रिणींना जेव्हां तिनें आपला हा बेत सांगितला होता, तेव्हां त्यांनींहि तिची चेष्टाच केली होती.

एकजण म्हणाली, ' हेमलता अन् मजुरांच्या वसाहतींत राहणार ! मग सूर्य उद्यापासनं पश्चिमेकडे उगवणार आहे म्हणून का सांगत नाहीं त्यापेक्षां ! '

' अग, पण तिचे वडील तिथं फॅक्टरी मॅनेजर आहेत. त्यांना राहा-यला सुंदर बंगला आहे. ' दुसरीनें तिला आडवलें.

' एक राहायला बंगला असला म्हणजे झालं वाटतं सगळं ? तियला तो यंत्रांचा घडघडाट; काळे, तेलकट कपडे घातलेल्या मजु-रांच्या शिट्या न् धांवपळ; उंसाच्या गाड्यांनीं माजवलेली ती घाण; आणि त्या मळीची दुर्गंधि; श्शीः श्शीः—मी एकदां आमच्या बाबांच्या बरोबर गेलें होतें साखर-कारखाना पहायला. माझं तर तियल्या वातावर-

णानं डोकं भणभणायला लागलं! केव्हां एकदां या कारखान्याच्या आवारांतनं बाहेर पडतेंय असं झालं मला. अन् तिथं कायमचं राहायचं म्हणजे—नको गऽ बाई! आणि खरंच, त्या मजुरांच्या सान्निध्यांत कवयित्रीबाईचं काव्य तरी कुठलं शिल्लक रहायला मग? तिथं सगळा भरणा म्हणजे अडाणी, इंजिन पुसणाऱ्या आगडेबहाद्दर मजुरांचा! कॉलेजसाठीं रोज कलापूरला गेल्याबर येईल तेवढाच काव्याशीं संबंध. बघ बाई, नाहीं तर कवयित्रीऐवजी मजूर पुढारीण व्हायचीस एखाद्या वेळेला!'

'चल् चल्, पुरे झाला तुझा चहाटळपणा.' असें म्हणून त्यावेळीं हेमलतेनें आपल्या मैत्रिणीचें तोंड बंद केलें होतें.

हेमलता पुण्याला आपल्या चुलत्यांच्याकडे राहून कॉलेजला जात असे. यंदा ती फर्ग्युसनला ज्यूनिअर बी. ए. च्या वर्गांत होती. तिचे चुलते सिटी मॅजिस्ट्रेटच्या हुद्यावर होते. हेमलता नऊ-दहा वर्षांची असतांना तिची आई वारली. त्यावेळीं तिचे वडील—बाबासाहेब—हे कानपूरच्या साखरकारखान्यांत केमिस्ट होते. त्यांनीं पुन्हां लग्न केलें नाहीं. अशा परिस्थितींत हेमलतेला परमुलुखांत नेण्याऐवजीं तिला त्यांनीं आपल्या भावाकडे—भाऊसाहेबांकडे—ठेवण्याचें ठरविलें. भाऊसाहेबांच्या मुलांबरोबर खेळण्या सवरण्यांत ती मातृनिधनाचें दुःख लवकर विसरली व त्यांच्यांत ती रमून जाऊं लागली. तिचें शिक्षणहि त्यांच्याबरोबर होऊं लागलें. मधून मधून रजेवर येऊन बाबासाहेब तिला भेटून जात. गतवर्षींच बाबासाहेब आपली कानपूरची नोकरी सोडून महाराष्ट्रांत लक्ष्मीनगरला आले होते. थोड्या दिवसांपूर्वी भाऊसाहेबांची पुण्याहून दूर तालुक्याच्या गांवीं बदली झाल्यामुळें त्यांनी पुण्याचें बिऱ्हाड हलविण्याचें ठरविलें. भाऊसाहेबांच्या बदलीची वार्ता समजतांच बाबासाहेबांनीं त्यांना पत्र लिहून हेमलतेला आपणाकडे पाठवून देण्याबद्दल कळविलें. लक्ष्मीनगरपासून सहा सात मैलांवर असलेल्या कलापूरच्या कॉलेजांत तिनें आपल्या मोटारींतून जावें असा त्यांचा मनोदय होता. आतां त्यांचें वय पन्नाशीच्या पुढें झुकलें होतें. तेव्हां या वयांत तरी आपली एकुलती एक मुलगी विवाह

होऊन परघरीं जाईपर्यंत आपल्याजवळ असावी अशी कल्पनाहि या योजनेच्या मुळाशीं नसेल असें कसें म्हणावें ?

आणि ठरल्याप्रमाणें पहिली टर्म संपल्यावर हेमलता लक्ष्मीनगरला आली खरी. पण तिला त्या वातावरणांत खरोखरच बुजल्यासारखें झालें. ती पूर्वी सुटींत फेरफटका करण्याच्या निमित्तानें वडिलांच्याकडे साखर-कारखान्यावर येत असे. पण चार दिवस मजेनें राहायला येणें निराळें अन् कायमचें राहायला येणें निराळें ! आतां ती आली त्यावेळीं कारखान्याचा गळिताचा हंगाम नुकताच सुरू झाला होता. कारखाना अष्टौप्रहर चालू असे. त्यामुळें रात्रंदिवस त्याच्या आसमंतातला भाग गजबजलेला दिसे. अनेक प्रकारचे आवाज सारखे कर्णपथावर येत. ऊंस टाकून लगबगीनें परत जाणाऱ्या मोकळ्या गाड्यांच्या चाकांचे व बैलांच्या गळ्यांतील घुंगरांचे आवाज, गाडीवानांचे बैलांना खड्या सुरांतील इशारे, पाळीवरून सुटलेल्या मजुरांच्या घोळक्या घोळक्यानें परत जातांना चालणाऱ्या गप्पागोष्टी, फाळक्यांत ( Cane Carrier ) उंसाच्या मोळ्या टाकणाऱ्या मजुरांच्या आरोळ्या, यंत्रांचा खडखडाट, न् आठ आठ तासांनीं मजुरांच्या पाळ्या बदलतांना होणारे कर्णकर्कश भोंगे—हे सारे आवाज, हा सारा गोंधळ पाहिल्यावर तिला वाटे—शांतिदेवतेकडून मिळालेल्या एखाद्या शापामुळें तर ह्या स्थानीं बाजार भरल्याप्रमाणें सदोदित ही गडबड, हा गोंधळ चालू नाहीं ? या असल्या वातावरणांत आपलें चित्त कसें रमणार ! अभ्यासाकडे लक्ष कसें लागणार ? अन् आपल्याला नव्यानेंच जडलेल्या काव्यलेखनाच्या छंदाचें संवर्धन तरी कसें होणार ?....

त्यांचा बंगला खूप मोठा व अद्ययावत् फर्निचरनें सजविलेला होता. ऐसपैस दिवाणखान्याला लागून दरवाज्याच्या बाजूला व्हरांडा होता व कमरेपर्यंत विटांचें बांधकाम करून तो बंदिस्त केला होता. हेतु हा कीं, संध्याकाळच्या वेळीं वेताच्या खुर्च्या टाकून तेथें गप्पा-गोष्टी करीत, वाचीत, किंवा दिवाणखान्यांत चालू केलेल्या रेडियोवरील संगीत ऐकत मोकळेपणानें बसलें तरी रस्त्यावरून जाणाऱ्या येणाऱ्यांचें लक्ष तिकडे

बेघलें जाऊं नये. बंगल्याच्या पुढल्या बाजूला छोटीशी फुलबाग करून तींत देशी व विदेशी फुलझाडें व वेल लावले होते.

या एवढ्या बंगल्यांत माणसें मात्र इन-मिन तीनच! हेमलता, बाबासाहेब अन् माई. माई ह्या साधारणपणें पंचेचाळीस वर्षांच्या सकेशा विधवा बाई. त्या आपल्या कुणी लांबच्या नातेवाईक असल्याचें हेमलतेला माहीत होतें. तिची आई वारल्यानंतर त्या होऊन बाबासाहेबांच्याकडे आल्या, कीं बाबासाहेबांनीं त्यांना बोलावून घेतलें, हें तिला तितकेंसें माहीत नव्हतें. घरांतलें सारें त्याच पाहात असत.

हेमलता आल्याबरोबर बाबासाहेबांनीं तिला दोन खोल्या मोकळया करून दिल्या. एकींत तिनें पुस्तकें, टेबल-खुर्ची ठेवून तिची अभ्यासिका बनवली, तर दुसरींत पलंग, सौंदर्य–प्रसाधनें यांची मांडणी केली.

तिची ही सगळी व्यवस्था मनपसंत झाली. पण आपलें मन इथें कसें रमावें ही तिची चिंता कायमच राहिली.

घरांत तिच्या बरोबरीचे कुणी नाहीं. वसाहतीवरहि तिच्या बरोबरीच्या कुणी मुली नसल्याचें तिला माईकडून समजलें. त्यामुळें समवयस्क मित्र-मैत्रिणींबरोबर हास्य विनोद करण्याची जी लज्जत असते, तीहि तिला अनुभवावयास मिळण्याचें चिन्ह दिसेना.

गळिताचा हंगाम नुकताच सुरू झालेला असल्यामुळें बाबासाहेबांना सकाळ-दुपार, तर कधीं रात्रीं-अपरात्रींहि कारखान्यांत फेरी मारावी लागे. शिवाय ते घरीं असले तरी त्यांच्याबरोबर गप्पा मारायला, किंवा कांहीं विचारा-सवरायला कारखान्यांतील इतर अधिकाऱ्यांची आवक जावक सारखी चालू असे. त्यामुळें ती बाबासाहेबांच्याबरोबर मोकळेपणानें गप्पागोष्टी करीत बसलेली असावी आणि त्याचवेळीं 'साहेब आहेत का?' अशी चौकशी करीत कारखान्यांतून कुणी नोकर यावा, किंवा 'काय बाबासाहेब, काय चाललंय!' अशा व्हरांड्याच्या पायऱ्या चढतचढतच शेजारच्या बंगल्यांतील जोशी चीफ एंजिनिअरांनीं आगमनदर्शक ठोकलेल्या आरोळीनें त्यांच्या गप्पांत खंड पडावा, असें नेहमीं घडे.

माईबरोबर गप्पा मारीत बसण्यांइतकें रहस्य दोघींत निर्माण होणें अशक्य दिसलें.

अखेर कादंबऱ्यांचें वाचन करणें किंवा रेडियोवरील कार्यक्रम ऐकत बसणें हा सुट्टीपुरता तरी बेत हेमलतेनें मनाशी ठरवला. आणि कलापूरला कॉलेजांत जाऊं लागल्याबर पुढचें पुढें पाहू म्हणून ती स्वस्थ राहिली.

आणि त्या दिवशीं ती अशीच रेडियोचा कार्यक्रम लावीत बसली होती. सायंकाळीं पांचसहाचा सुमार असावा. बाबासाहेब कारखान्यांत गेले होते.

' किर्रर्रर्र ' असा दारावरील घंटेचा आवाज झाल्याचा तिला भास झाला. पण रेडियोवरील गाण्याच्या नादांत तिला तो स्पष्ट ऐकूं आला नाहीं. लक्ष देऊन ऐकतांच तो तिनें ओळखला व खुर्चीवरून उठून ती लगबगीनें दाराकडे गेली. ' बाबाच आले असतील कारखान्यांतून ' असा तिनें तर्क केला अन् दार उघडलें. तों–

बाबासाहेबांच्या ऐवजीं एका स्मितमुखी तरुणास पाहतांच तिचा क्षणमात्र गोंधळ उडाला. त्या तरुणाचा विशाल भाल प्रदेश, दुसऱ्याच्या अंतरंगाचा ठाव घेणारी त्याची तेजस्वी दृष्टि, लांबसडक नासिका व पाणीदार मुद्रा पाहतांच दुसऱ्याच क्षणीं सावध होऊन तिनें पाठीवर रुळणारा पदर सांवरल्यासारखा केला व त्या तरुणास ' कोण पाहिजे ' असें ती विचारणार इतक्यांत त्या तरुणानेंच तिला प्रश्न केला, ' बाबा-साहेब आहेत ? '

' नाहींत. कारखान्यांत गेलेत. ' त्या तरुणाकडे एक चोरटा दृष्टिक्षेप टाकून बाहेर बागेकडे पाहात तिनें उत्तर दिलें.

' यायला वेळ लागेल त्यांना ? ' तिच्या गौरवर्ण मुखमंडळावर विशेषतः तिच्या भुंग्यासारख्या काळ्याभोर, टपोऱ्या डोळ्यांवर आपली सौंदर्यसमीक्षक दृष्टि स्थिर करीत त्यानें विचारलें.

ह्या अकल्पित भेटीनें तो मुग्ध झाला. ते आकर्षक नेत्र, रेखीव कमानदार भुवया, शेंड्याला मनोहर बांक घेतलेली सरळ नासिका व अरुंद जिवणी पहातांच त्याच्या मनांत कल्पना चमकली–असा एखादा

मुखचन्द्रमा पाहूनच तर नसेल ना कवीला 'कोणता मानूं चन्द्रमा' सारखी कविता लिहिण्याची स्फूर्ति झाली!

'तसं कांहीं सांगितलं नाहीं त्यांनीं पण'—ह्या उत्तरानें त्याची तंद्री भंग पावली.

'बर, मग मी उद्यां सकाळीं येईन–' वाऱ्यानें कपाळावर भुरभुरणारे केस सांवरणाऱ्या तिच्या गौरवर्ण, लांबसडक, निमुळत्या बोटांवर नजर टाकीत तो बोलला.

'कोण आलं होतं म्हणून सांगूं बाबांना?'

'चन्द्रकान्त शहाणे. साक्षरता प्रसार वर्गाच्या वाढदिवसासंबंधीं विचारायला आलों होतों म्हणून सांगा. बरं...' असें म्हणून तो तरुण झप्झप् पावलें टाकीत निघून गेला. त्याच्या त्या पाठमोऱ्या आकृतीकडे पाहात हेमलता कांहीं क्षण थांबली. त्याची ती चालण्यांतील ऐट, अंगांतील पांढराशुभ्र नेहरू शर्ट, पायांतील कोल्हापुरी वहाणा आणि साध्या पद्धतीनें नेसलेलें धोतर! त्याची दृष्टि तर किती पाणीदार होती! वळणाजवळ वळण्यापूर्वी त्या तरुणानें सहज मागें पाहिलें तों त्याची अन् हेमलतेची अभावितपणें नजरानजर झाली. आपली दृष्टि दुसरीकडे वळवीत ती पुटपुटली—हे चंद्रकान्त शहाणे!

फाटकांतून आंत येणाऱ्या पारूला-घरकामाच्या बाईला-वाटलें कीं, ती आपल्यालाच कांहीं म्हणते आहे. म्हणून तिनें हेमलतेला विचारलें, 'मला काई म्हणालासा, ताईसाब!' हेमलतेनें नकारदर्शक किंचित् मान हालवली व ती आंत गेली.

ती आंत जाऊन रेडिओपुढील खुर्चीवर बसली. तिचें लक्ष रेडियोच्या कार्यक्रमाकडे नव्हतें. तिला डोळ्यांसमोर त्या तरुणाची तडफदार मूर्ति दिसत होती. पांच मिनिटांपूर्वी घडलेल्या प्रसंगाची पुनरावृत्ति ती आपल्या मनोभूमीवर करीत होती.

त्या तरुणानें आपलें नांव चन्द्रकान्त शहाणे असें सांगितलें. त्या नांवामुळें तिच्या मनांत विलक्षण खळबळ उडवून दिली. म्हणजे प्रसिद्ध कवि चन्द्रकान्त शहाणे हेच काय? ज्यांच्या कविता आपण मासिकांतून

आवडीनें वाचतों, एकदोन तर आपल्या वहींतहि आपण उतरून घेतल्या आहेत, ते हेच ? पुण्याच्या कॉलेजांतील मराठीच्या प्राध्यापकांनीं वर्गात बोलतांना ज्यांच्या कवितेचा गौरवपूर्वक उल्लेख केला होता, ते हेच असतील !

ते हेच असतील तर—

तिच्या हृदयांत हर्षाची लहर उसळली.

पण लगेच दुसऱ्या मनानें शंका काढली.

हे चन्द्रकान्त शहाणे असले तरी कवि ते हेच असतील कशावरून ? एकाच नांवाचीं दोन माणसं नसतात वाटतं ? लगेच तिला मॅट्रिक परिक्षेच्या निकालांतील नांवें आठवलीं. ती मॅट्रिक झाली त्या वर्षीचीच गोष्ट. करमरकर का अशाच कांहींतरी आडनांवाच्या दोन विद्यार्थ्यांचीं नांवें अगदीं एक होतीं. तेव्हां निकालपत्रकांत त्यांच्या नांवांपुढें हायस्कूलचीं नांवें छापलीं होतीं, ही आठवण तिला झाली.

शिवाय त्याच मनानें आणखी एक शंका काढली. असा प्रतिभावान् कवि अशा कारखान्यांत कशाला येतोय् नोकरीला ! अन् या यंत्रांचें अहोरात्र चाललेलें हें बेसूर संगीत कानीं पडत राहिल्यावर त्याच्या प्रतिभेतून सुंदर, मधुर काव्य स्फुरत राहील ?

तिला स्वतःचेंच उदाहरण आठवलें. आपण अगदीं होतकरू का होईना पण कवयित्री आहोंत. तरी इथें आल्यापासून आपल्या मनांतून काव्य, काव्यमय विचार कसे पसार झाले आहेत ! मग—

पुन्हां त्या तरुणाची मूर्ति तिच्या मनश्चक्षूंसमोर आली. त्याचे चमकदार डोळे आठवले. लगेच तिचें पहिलें मन म्हणालें, 'असेल, कवि चन्द्रकान्त शहाणे हेच असूं शकतील.'

अशा उलट सुलट विचारांनीं ती अगदीं बेचैन झाली. अखेर तिला एक कल्पना सुचली. पारूची व त्या तरुणाची फाटकाबाहेर गांठ पड-ल्याचें व त्या दोघांनीं एकमेकांकडे पाहून स्मित केल्याचें तिनें पाहिलें होतें. तेव्हां पारूला असेलच त्या तरुणाची माहिती. तिलाच विचारूं या. —हीच ती कल्पना. पण यांतहि ती उगीच कांहीं शंका-कुशंका घ्यायची

...छे ! यांत शंका घ्यायचें काय कारण ? आपल्याकडे कुणी आले तर त्याची माहिती घ्यायला नको वाटतं काहीं ?

तिनें चेष्टा करण्याचा प्रयत्न केला तर असेंच सांगूं तिला आपण, असें मनाशीं पक्कें ठरवून तिनें पार्वतीला हांक मारली.

पार्वती समोर येऊन उभी राहतांच इतका निश्चय करूनहि तिच्या मनानें क्षणभर कच खाल्लीच.

' आतां आपल्याकडे कोण आले होते ग ? त्यांचं नांव बिव माहिती आहे तुला ? '

' अव, ते चन्द्रकान्त शहाणे न्हवत का ? तुम्हास्नी ठावं नाहीं ? ते इथल्याच इपिसांत हाईती कीं. लई चांगलं हैती ते. '

' तुला बरीच माहिती दिसतेय् त्यांची. ' स्वतःला काहीं सांगावी म्हणून तर नाहीं हेमलतेनें तिला असें म्हटलें ?

' अब ते तर आमच्याच गांवचं. तर माहिती नसल ? आव् त्येंच्या वळखीनंच तर घरधन्यास्नी इथली चाकरी लागलीया. त्येंची आई बी पन अशीच हाये, लई सोबावानं निर्मळ. दोघांचा बी आमच्यावर लोभ हाये. '

' आपल्याकडे येतात तसल्या मासिकांतनं लेख छापायला देतात ते?' ते कवि आहेत काय असें विचारलें तर तिला कदाचित् समजणार नाहीं म्हणून अशा तऱ्हेनें हेमलतेनें विचारलें.

' हां. हां. तें सांगायचं इसरलंच कीं. त्या माशिकांतनं छापून येतें कीं ते लिहितात त्ये. त्येंच्या घरीं कंदी बी जाऊनशान् बगा, सदोनित त्येंच्या हातांत कसलं तरी बुक न्हाईतर कागद पेन्सल दिसल. आम्हांला काय कळायचंय् त्यातलं म्हना—पन त्येंच्या आई दावतात काई छापून-शान आलं म्हंजे. लई दयाळू सोबाब हाये दादांचा. रातची साळा बी काडलीया त्यांनीं कारखान्यांतल्या लोकांपायीं. कशाला आल हुत आत्ता ते ? '

' अग, मला तरी काय माहिती तें ! ते आले बाबांची चौकशी करीत, अन् ते नाहींत म्हणतांच उद्यां येतों म्हणून सांगून परत गेले. बाबांनीं

विचारलं तर सांगायला तर हवं, कोण आलं होतं ते. म्हणून तर विचारलं तुला.'

हेमलतेनें आपल्या चौकशीचा हेतु किती उघडपणें सांगितला पण !

मात्र नंतर रात्रीं बिछान्यावर पडेपर्यंत राहून राहून तिला नजरेसमोर चन्द्रकान्त व तिच्या वहींतील त्याच्या दोन कविता ह्याशिवाय दुसरें कांहीं दिसत नव्हतें !



# ४

## मजूर वसाहतींत ?– छे नंदनवनांत !

सूर्यविकासी कमळांत रात्री अडकून पडलेल्या भ्रमराच्या आतुरतेनें चन्द्रकान्त दुसरा दिवस उजाडण्याची वाट पाहात होता. सकाळ केव्हां होते आणि आपण बाबासाहेबांच्या बंगल्यावर केव्हां जातों असें त्याला झालें होतें. वास्तविक तो बाबासाहेबांच्या बंगल्यावर गेला तें साक्षरता–प्रसार वर्गाच्या वाढदिवसाचा कार्यक्रम ठरविण्यासाठीं. पण तेथें त्याची बाबासाहेबांच्या ऐवजीं एका सुंदर, अपरिचित तरुणीशीं अवचित भेट झाल्यावर त्याला बाबासाहेबांच्याकडील आपल्या कामाचेंहि कांहीं वेळ विस्मरण झालें. दृष्टीपुढें वरचेवर त्या सुंदर तरुणीचा मुखचंद्रमा तेवढा दिसूं लागला. चन्द्रकान्त कवि होता आणि सौंदर्यदर्शनानें ज्याच्या वृत्ति उचंबळून येत नाहींत तो कवि कसला !

बाबासाहेबांच्या बंगल्यावर आपल्याला भेटलेली तरुणी कोण आहे, हें त्याला ठाऊक नव्हतें. त्याचें बाबासाहेबांच्याकडे कामानिमित्तच कधींमधीं जाणें घडे. ह्याच्या आधीं तो जेव्हां त्यांच्याकडे गेला होता तेव्हां ती त्याला तेथें दिसली नव्हती. बाबासाहेबांना एक मुलगी आहे व ती पुण्याच्या

कॉलेजांत शिकते आहे एवढें त्याला माहीत होतें. त्या माहितीवरून व तिच्या चेहऱ्यामोहऱ्यावरून–विशेषतः तिच्या नासिकेची बाबासाहेबांच्या नासिकेप्रमाणेंच असलेली ठेवण पाहून–त्यांची पुण्याला असणारी मुलगी बहुधा हीच असावी असा त्यानें तर्क केला असल्यास नवल नाहीं

पण अशा तर्कानें अन् अनुमानानें माणसाचें समाधान झाल्यावर आणखी काय हवें होतें ? आपल्या तर्काला न् अनुमानाला सत्याचें अधिष्ठान लाभण्यासाठीं पुरावे हुडकत राहण्याची त्याची धडपड सुरू होते. चन्द्रकान्ताच्या मनाचीहि धडपड सुरू झाली. पण दुसऱ्या दिवसाशिवाय ती सफल होण्याचें चिन्ह दिसेना. तो अगदीं निराश होण्याच्या बेतांत आला. आणि त्याच वेळीं 'इच्छा आहे-तेथें मार्ग आहेच' ह्या उक्तीचा त्याला प्रत्यय आला.

रात्रीं जेवण झाल्यावर साक्षरता प्रसार वर्गाकडे जाण्यासाठीं तो शंकरच्या खोलीवर आला. शंकरची खोली रस्त्यावरच असल्यामुळें तो नेहमीं जातांजातां त्याच्या खोलींत डोकावून जात असे व शंकरलाहि त्याच्या शिकवणीचा वार असल्यास बरोबर घेऊन जाई.

मनांत विशिष्ट हेतु बाळगूनच आज तो शंकरच्या खोलीवर आला होता. शंकरची बायको पार्वती ही बाबासाहेबांच्या बंगल्यावर कामाला जात असे. तेव्हां त्यानें अटकळ बांधली होती कीं, बोलण्याच्या ओघांत पार्वतीकडून आपणाला हवी असलेली माहिती मिळेल.

दुपारीं बारा ते आटपर्यंत दिवसपाळीचें काम करून येऊन शंकर नुकताच एक जीर्ण कांबळें अंथरून त्यावर आडवा झाला होता. तो चन्द्रकान्त दारांत दिसल्यावर 'याऽ, दाऽदाऽऽ' असें म्हणून उठून बसला. कांबळें नीट पसरून त्याच्यावर चन्द्रकान्ताला बसण्यासाठीं त्यानें जागा करून दिली. चन्द्रकान्त भिंतीला ( अर्थात्, पत्र्याला ) टेकून बसला. त्या चाळीच्या बाजू, भिंती, दारें, छपर, सारें कांहीं पत्र्याचें होतें. शंकरचा सारा संसार पत्र्याच्या एका खोलींत मांडला होता. सुदैवानें म्हणा, अगर दुर्दैवानें म्हणा, त्या खोलींत पसाराहि फारसा दिसत नव्हता. भिंतीच्या एका कोपऱ्यांत एक लाकडी पेटी असून तिच्यावर पांघरायची वाकळ

व इतर कपड्यांच्या घड्या टाकलेल्या होत्या. दुसऱ्या कोपऱ्यांत गाडग्या-मडक्यांची उतरंड असून जवळच तवा, पितळी अशीं स्वैंपाकाचीं भांडीं उभीं करून ठेवलीं होतीं. जवळच चूल पेटलेली असून खोडक्यांचा (उंसाच्या बुडख्यांचा) धडधडा जाळ लागलेला होता. चुलीवरील ॲल्युमिनियमच्या पातेल्यांतील पाणी आधण येऊन सळसळत होतें. चुलीवर पाणी ठेवून पार्वती नुकतीच कुठें तरी गेली असावी, असा चन्द्रकान्तानें तर्क केला.

'काय शंकर इतक्यांतच पडला होतास ? अन् पारुवैनी कुठं दिसत नाहीं ती ?'

'कामावरनं आलं कीं असं दमल्यागत होतं बगा. दोन सालांमागं हाच शंकर तांबडं फुटल्यापासनं दिवस बुडस्तवर मोटेवर नाहींतर दारा-बर खडा राह्यला तरी कधीं हाशहुश्श करायचा नाहीं, असं सांगितलं तर एखाद्याला खरं दिखुन वाटायचं नाहीं. बैलांसंग न् हिरव्यागार जित्राबा-संगं वेळ कसा हां हां म्हणतां निघून जायचा. त्या कामांत कस होता न् अंगांत दिखुन. नाहींतर हें काय, यंत्रापुढं आठ–आठ घंटं खड टाका-यचं न् घंट्या-अर्ध्या घंट्यांनं त्याला तेल सोडायचं !'

चन्द्रकान्तानें त्याच्याकडे पाहिलें. खरोखरच दोन वर्षांत त्याच्या शरिरांत किती फरक पडला होता ! त्याच्या डोक्यावरलें पूर्वींचें तें मुंडासें अन् अंगांतली पैरण जाऊन त्याच्याजागीं जटा वाढवल्यासारखे राकट केस अन् निळी शर्ट पॅंट आली होतीं. पूर्वी तजेलदार दिसणारा त्याचा चेहरा मलूल दिसत होता व त्याच्या पूर्वीच्या दणकट, राकट मनगटावरील व हातावरील शिरा आतां उठून दिसत होत्या !

चन्द्रकान्त कांहीं म्हणणार इतक्यांत दारांत पावलें वाजलीं. पार्वतीच आली होती. तिच्या हातांत कसली तरी लहान पुडी होती.

'काय भावजी, तुम्हास्नी आज बनलं जनुं गरिबाकडं यायला ?' असें चन्द्रकान्तास उद्देशून आणि नंतर कांहींसें आपल्या नवऱ्यास व कांहींसें स्वगत अशा रीतीनें ती म्हणाली, 'भावजींच्या वळखी आतां

बंगल्यातल्या माणसांसंगं झाल्यावर खोपटांतल्या गरिबांची सय त्यांना कशानं व्हावी ?'

साक्षरता-प्रसार वर्गाच्या कामानिमित्तानें गेले दोन-तीन दिवस चन्द्रकान्ताला शंकरकडे यायला फुरसत मिळाली नव्हती. त्या गैरहजेरीचा संबंध पार्वतीनें अशा प्रकारें दाखविला होता.

चन्द्रकान्ताच्या लक्षांत तें आल्यावांचून राहिलें नाहीं. पण शंकरला तिचें बोलणें कांहींच समजलें नाहीं. म्हणून त्यानें विचारलें, 'तूं म्हणतेस काय, मला तर कांहींच कळत नाहीं. बंगल्यांतलीं मानसं कोन, काय !'

चिमटीच्या अंदाजानें चुलीवरील पातेल्यांत साखर टाकतां टाकतां ती बोलूं लागली, 'अव, ती बाबासाहेबांची लेक. हेमलता बाई. आतां-पावतर त्या पुन्याला शिकायला होत्या जनुं. आतां त्या हतंच आल्याती नव्ह का. इतनंच आता त्या कलापूरच्या कालिजांत जानार हैती म्हनं.'

'बरं, मग ?' ह्या हकीकतींत चन्द्रकान्ताचा काय संबंध असेंच जणूं काय शंकरला म्हणावयाचें होतें.

'आज सांजच्या वक्ताला मी बाबासाहेबांच्या बंगल्यावर गेल्यें हुतें तवा भावजी बंगल्यांतनं भाईर पडतांना दिसलं. म्हनुनशान म्हनलं असल्या माणसांच्या संगतींत आम्हां गरिबांची कुटली सय व्हायची भावजींना ?'

'पारू वैनीनं कशाचा संबंध कशाला जोडला बघ शंकर. मी संध्या-काळीं बाबासाहेबांच्या बंगल्यावर गेलों होतों तें बाबासाहेबांच्याकडे, आणि तेंसुद्धां आपल्या वर्गाच्या वाढदिवसासंबंधीं कांहीं विचारायला. कारणाशिवाय ह्या बड्या लोकांच्याकडे जाणं मला आवडत नाहीं हें तुला माहीत आहे शंकर. यंदाचा वाढदिवस चांगला साजरा करावा असा माझा विचार आहे. साथी प्रकाश त्याच सुमारास कलापूरला येणार आहेत. तेव्हां त्यांनाच आणावं म्हणतो त्या समारंभाला जमलं तर. आपल्या कार्यालाहि जोर येईल त्यामुळे !'

शंकरजवळ इतकें आपुलकीनें सांगण्याचें कारण चन्द्रकान्त त्याला आपला दोस्त मानी हें तर झालेंच, शिवाय शंकर हा त्याच्या साक्षरताप्रसार

बर्गांचा पहिला विद्यार्थी होता, हेंहि होतें. त्याला शिकवायला सुरुवात केल्यावरच एकएकजण वाढून शेवटीं वर्गाचें शाळेंत रूपांतर झालें होतें.

पारूचा भिस्किल व चाणाक्ष स्वभाव चन्द्रकान्ताला माहीत होता. शंकर त्याचा बालपणापासूनचा दोस्त. चन्द्रकान्ताच्या घराला लागून असलेल्या एका झोपडीवजा घरांत शंकरच्या बापाचें बिऱ्हाड होतें. पार्वतीचा व त्याचा परिचय इथें आल्यापासून विशेष झाला असला तरी तिचा स्वभाव बोलका असल्यामुळें शंकरपेक्षां तीच त्याच्याशीं अधिक बोलत राही. चन्द्रकान्त पार्वतीला आपल्या गोदू-शांता ह्या बहिणीसारखा मानी. आणि त्या दोघींहि आतां सासरीं निघून गेलेल्या असल्यामुळेंच कीं काय त्याचें भागिनीप्रेमासाठीं आसुसलेलें मन पार्वतीवर त्या प्रेमाचा वर्षाव करी. गेल्या दिवाळीला भाऊबिजेच्या दिवशीं पार्वती-कडून ओवाळून घेऊन तिला पांच रुपयांची ओवाळणीहि त्यानें घातली होती. ज्या हलाखीच्या स्थितींतून तें कुटुंब सध्यां जात होते, तीबद्दल अपार सहानुभूतीहि चन्द्रकान्ताच्या या वागणुकीच्या मुळाशीं होती.

अशा परिस्थितींत पारूचें तें थट्टेखोर बोलणें चन्द्रकान्ताला आवडलें असल्यास नवल नाहीं. विशेषतः तें त्याच्या इच्छित विषयावर झाल्या-मुळें तर त्याला फारच रुचलें.

'गरिबाकडला चहा तरी आवडतोय का बगा.' चन्द्रकान्तापुढें फुटक्या कानाचा एक कप व बशी आणून ठेवीत पारूनें म्हटलें.

थट्टेच्या क्षेत्राच्याहि मर्यादा असतात. आतांचें पारूचें बोलणें ऐकल्या-वर ज्या करुण मुद्रेनें चन्द्रकान्तानें तिच्याकडे पाहिलें, ती मुद्रा कितीतरी बोलकी होती! शंकरच्या तें ध्यानांत येऊनच कीं काय, तो तिला म्हणाला 'काय अशी थट्टा करतीस उगी दादांची? त्यांचा स्वभाव माहीत नाहीं व्हय तुला? अग ते आपल्यांतलेच आहेत. आन् बंगल्यांतल्या हेमलता-बाईची झाली बळख म्हणून कुठं बिघडलं? हां हां, आतां दिवाळी आलीय तवा ह्या भाऊबिजेला दादा आपल्या खोल्याला येतील कीं नाहीं अशी भीति पडलीय व्हय तुला?'

'अब, त्या वळखीचा अन् भाऊबीजेचा काय संबंद ?'... एवढें बोलून आपण आणखी कांहीं थट्टा केली तर ती चन्द्रकान्ताला कितपत रुचेल ह्याचा अंदाज घेण्यासाठीं तिनें त्याच्याकडे पाहिलें.

चन्द्रकान्त म्हणाला, 'शाबलीस का ! बोल कीं वैनी. तूं केलेली थट्टा मला आवडत नाहीं असं झालंय कधीं ? उलट, तूं अशी थट्टा करूं लागलीस म्हणजे मी आमच्या गोदु शांताशीं बोलतों आहे असा मला भास होतो. मघां थट्टेत गरीब श्रीमंतीचा प्रश्न निघाला म्हणून मला थोडं वाईट वाटलं इतकंच.'

'बरं तर मग आणखी चहा घ्या. तुमच्या कपांत कमी हुता.' पार्वतीनें चन्द्रकान्ताच्या कपांत चहा ओतीत म्हटलें. त्याचें चहाचें वेड तिला माहीत होतें. केव्हांहि त्याच्यापुढें कप केला तरी तो नको म्हणत नसे.

नंतर तो साक्षरताप्रसार वर्गाकडे गेला.

ज्या हेतूनें तो शंकरकडे आला होता, तो त्याचा हेतु सफल झाला होता. त्यानें विचारण्यापूर्वींच त्याला हवी असलेली माहिती पार्वतीकडून मिळाली होती.

हेमलता ही आपल्या तर्काप्रमाणें बाबासाहेबांची मुलगीच असून ती आतां इथें राहून कॉलेजांत जाणार आहे. ही हकीकत कळल्यामुळें त्याला विशेषच आनंद झाल्यासारखा दिसत होता.

ती स्वभावानें कशी असेल, तिचा-आपला परिचय झाल्यावर तो वाढविण्याची ती इच्छा धरील काय, आपण कवि आहोंत हें तिला माहीत असेल काय, नसल्यास माहीत झाल्यावर तिला काय वाटेल, ती कॉलेज कन्यका असली तरी सगळ्याच कॉलेजांत जाणाऱ्या मुलींना काव्याची आवड असते असें नाहीं ! पोशाख, पावडर, नटणें-मुरडणें हेच कितीतरी मुलींचे आवडते विषय असतात ! तसेंच तिचें असलें तर—

ह्या विचारानें त्याच्या मनांत उगीचच अस्वस्थता निर्माण केली. माणसाला एकदां पाहिलें कीं, त्याच्या आवडी-निवडी, छंद, स्वभाव ह्यांची बिनचूक पारख करण्याचें एखादें शास्त्र आपल्याला अवगत असतें तर किती बहार झाली असती असाहि विचार त्याच्या मनांत चमकून

गेला. माणसाच्या चर्येवरून व बोलण्याचालण्यावरून त्याच्या स्वभावा-विषयीं कांहीं ठोकताळे बसविलेले मार्ग त्यानें कुठेंतरी वाचलें होतें. कदाचित् त्या शास्त्रांत अधिक प्रगति होत गेली तर—

अशा प्रकारें राहून राहून त्याचें मन तिच्याविषयींच विचार करीत होतें.

रात्रीं त्याला पडलेल्या एका स्वप्नांत त्यानें तिला विचारलें देखील—तुम्हांला काव्याची आवड आहे ?

पण त्यावर तिनें आपल्या गालाला गोड खळी पाडून फक्त मिस्किल हास्य केलें होतें !

आणि चन्द्रकान्त विशेषच बुचकळ्यांत पडला होता.

× × ×

दुसरे दिवशीं सकाळीं चन्द्रकान्त बाबासाहेबांच्या बंगल्यावर गेला. दिवाणखान्यांतील वर्तुळाकार टेबलाभोंवतीं एका खुर्चीवर बाबासाहेब व दुसरीवर हेमलता बसली होती. बाबासाहेबांच्या पोषाखावरून ते कारखा-न्यांत जायला निघण्याच्या तयारींत असावेत असें दिसत होतें. चन्द्र-कान्ताला पाहतांच 'याऽऽऽ' असें उद्गारून ते बोलूं लागले, ' तुम्ही काल येऊन गेल्याचं सांगितलं हेमानं अन् तुम्ही सकाळीं येणार असल्या-चा तुमचा निरोपहि तिनं सांगितला. तुम्ही आतां आलांत हें बरं झालं. नाहींतर पुन्हां तुमची माझी चुकामूक झाली असती. '

चन्द्रकान्त येऊन बसतांच हेमलतेनें खुर्चीवरून उठण्याचा अभिनय केला. मग तिच्या मनांतून खरेंच तिथून उठायचें होतें, कीं बाबासाहेबां-च्याकडून ' बस ' म्हणवून घेण्याच्या अपेक्षेनें तिनें तसें केलें, हें कळावयास मार्ग नाहीं. बाबासाहेबांचें तिच्या चुळबुळीकडे लक्ष जातांच ते म्हणाले, ' बस कीं. तसं कांहीं यांचं विशेष खाजगी काम नाहीं. अन् हो खरंच, तुलाहि यांचा परिचय करून द्यायला हवा. तुला तो आवडेल. '

किंचित् स्मित करीत हेमलता आतां खुर्चीत व्यवस्थित बसली. तिची चन्द्रकान्ताकडे सहज नजर गेली. आजहि त्यानें कालच्याप्रमाणेंच पोषाख केला होता. पण तो अधिक काळजीपूर्वक केल्यासारखा दिसत होता. सकाळीं आंघोळ उरकून लगेच इकडे आल्यामुळें त्याच्या चर्येवरील

टवटवीतपणांत अधिकच भर पडली होती. न विंचरलेल्या केसांच्या एक दोन बटा तशाच मधूनमधून कपाळावर खेळत होत्या.

‘ ही आमची हेमा–हेमलता. ही इतके दिवस पुण्याला फर्ग्युसन्‌मध्यें होती. यंदा ज्यूनिअरला आहे. आतां ती इथंच राहून कलापूरच्या कॉले-जांत जाणार आहे. बी. ए. ला मराठी घेतलंय तिनं. ’

यांतली बरीचशी माहिती चन्द्रकान्ताला कळलेली होती, नव्हे ? तथापि जणूं काय आपणांला ती प्रथमच कळते आहे अशा आविर्भावांत ‘ असं का ? ’ ‘ होय ? ’ असा रुकार देत तो ती ऐकून घेत होता.

‘ अन् हे चन्द्रकान्त. इथल्या ऑफिसांत आहेत. मोठे ‘ स्मार्ट ’ आहेत आणि हे कवि दिखिल आहेत बरं का चांगले. यांच्या मासिकां-तून येणाऱ्या कविता वाचल्या असशील तूंहि ? मजुरांच्याकरितां रात्रींची शाळा पण चालवली आहे यांनीं ’

हेमलतेनेंहि ही सारी हकीकत पारुकडून काढून घेतलेलीच होती. तरीपण बाबासाहेबांचें बोलणें संपतांच डोळ्यांत अपूर्व पाणी खेळवीत ती म्हणाली, ‘ आपणच कवि चन्द्रकान्त ? किती आनंदाची गोष्ट ! मला कल्पनाहि नव्हती, तुम्ही इथल्या कारखान्यांत असाल म्हणून. ‘प्रतिभे’नं लावलेल्या चढाओढींत तुमच्या कवितेला पहिलं बक्षिस मिळालं ना ? ’

‘ हो खरंच. कारखान्यांत कुणीतरी सांगितलं खरं तुमच्या कवितेला बक्षीस मिळाल्याचं. Congratulations हं. अन् तुम्हांला आणखी एक सांगायचं राहिलंच चन्द्रकान्त. ’ हेमलतेकडे पहात बाबासाहेब म्हणाले, ‘ आमच्या हेमालासुद्धां कविता करायचा नाद आहे. परवां तिनं आपल्या कॉलेज मॅगेझिन् मधल्या कविता मला दाखवल्या होत्या. ’

‘काय, याहि कविता करतात ? पाहूं तरी, कांहीं हरकत नसली तर.’

‘ माझ्या कसल्या आल्याहेत कविता ? बाबांचं आपलं कांहींतरीच. नुकतांच कुठं मी कविता करायला सुरुवात केलीय्. अजून नीट मनासारख्या जमत नाहींत. कॉलेज मॅगेझिन्‌मध्यें आलेल्या कविता त्या काय असायच्या ? ’

' इतर कुठं प्रसिद्धीसाठीं नाहींत पाठवल्या अद्याप ? '

' इतर कुठं कुठलं ? माझ्या एका कवितेची आमच्या प्रोफेसरांनीं फार वाखाणणी केली, म्हणून मीं ती प्रतिभेकडे पाठवली, तर चार दिवसांत परत पाठवली ती संपादकांनीं. आमच्याच प्रोफेसरांनीं आम्हांला हरभऱ्याच्या झाडावर चढवायचं नाहीं तर कुणी ?

' नाहीं, चुकतंय् तुमचं. तुम्हीं प्रसिद्धीसाठीं इतकी घाई केली नाहीं पाहिजे. बरं. पाहूं तरी तुमच्या कविता..' चन्द्रकान्तानं पुन्हां आग्रह केला, तेव्हां हेमलता आपल्या कविता आणण्यासाठीं गेली.

तेवढ्यांत विषयांतर करून सिगारेटच्या धुराच्या वर्तुळाकडे संथपणें पाहात बसलेल्या बाबासाहेबांना उद्देशून चन्द्रकान्त म्हणाला, ' मी आपणांकडे अशाकरितां आलों होतों कीं, येत्या दिवाळीच्या पाडव्याला आमच्या साक्षरता प्रसार वर्गाचा वाढदिवस येतोय्. त्यासाठीं कुणी बाहेरचे पाहुणे बोलावून समारंभ साजरा करावा असा विचार आहे, अर्थात् तुमची त्याला संमति असली तर—'

'हो, हो, अशा गोष्टीला माझी संमति नसायला काय झालं ? आणि थोरल्या साहेबांचं तर नेहमीं म्हणणं असतं कीं, जेणेंकरून बाहेरच्या लोकांचं लक्ष आपल्याकडे वेधून घेतां येईल असे उत्सव-समारंभ अवश्य साजरे करीत चला म्हणून. अशा कामीं थोडाबहुत खर्च झाला तरी हरकत असणार नाहीं त्यांची. बरं, कोण येण्यासारखं आहे ? कलापूरचं कुणी......'

' त्याच सुमारास पुण्याचे सुप्रसिद्ध समाजवादी पुढारी प्रकाश हे कलापूरला येणार असल्याचं वर्तमानपत्रांत जाहीर झालं आहे, तर त्यांनाच बोलवावं म्हणतों आपली मान्यता असली तर. '

' प्रकाश येणार आहेत कलापूरला ? पण ते आपल्याकडे येतील का ? येऊं शकतील तर माझी कांहीं हरकत नाहीं. '

मी कलापूरला जाऊन चौकशी करून येतों. तेथील समाजवादी कचेरींत माझी ओळख आहे. तिच्यामुळं जमेलसं वाटतं. '

' पाहून कळवा मग ' असें म्हणून त्यांनीं मनगटावरील घड्याळाकडे पाहिलें आणि ते उठले.

नंतर कॉलेज मॅगेझिन्च्या अंकाचीं पानें चाळीत बसलेल्या हेमलतेला उद्देशून ते म्हणाले, 'बरं, हेमा–जातों मी. आणि चन्द्रकान्त, तुम्ही मदत करीत चला आमच्या हेमाला तिच्या वाङ्मयाच्या अभ्यासांत. तिलाहि आपलं नांव मासिकांतून झळकावसं वाटतं. काय असतं इतकं त्यांत कुणास ठाऊक! बाकी, आमचा व्यवसाय पडला असला केमिस्टचा–रसायनशाळेंत काम करणाराचा ! आम्ही आपलं प्रत्येक गोष्टीचं पृथक्करण करतों. आम्हांला ह्या तुमच्या काव्य-विषयांत गम्य नाहीं. बरं, तें असो. अन् हेमा, चन्द्रकान्तासाठी चहा ठेवायला सांग गणूला. '

गणू हा त्यांचा स्वैपाकी. वयानें पोरसवदाच, पण स्वैपाकांत मोठी कुशल होती गणबाची स्वारी. थोडेच दिवसांपूर्वी तो बाबासाहेबांच्याकडे आला व काम देण्याबद्दल गयावया करूं लागला. अखेर हेमलतेच्या मध्यस्थीनें त्यांनीं त्याला आपल्याकडे स्वैपाकी म्हणून ठेवून घेतलें.

' तुम्ही नाहीं का थांबत चहा होईपर्यंत ? '

' बरं. लौकर आणायला सांग गणूला. '

पण तेवढ्यांत 'साहेब,' 'साहेब' असें पुकारीत ऑफिसांतला शिपाई आला. थोरले साहेब कारखान्यांत आले होते म्हणून तो बाबासाहेबांस बोलवायला आला होता.

' काय, साहेब आलेत कारखान्यांत ? तर मला थांबून उपयोगी नाहीं. मी जातों, हेमा. अच्छा, चन्द्रकांत.'

असें म्हणून खाट्खाट् बूट वाजवीत ते निघूनहि गेले.

' बाबांचं हें सदाचंच असं आहे. ' हेमलता पुटपुटली.

' पाहूं तुमच्या कविता. ' असें म्हणून चन्द्रकान्तानें तिच्या जवळून कॉलेज मॅगेझिन्चे अंक घेतले. लौकरच चहाहि आला. मग दोन्हींचाहि आस्वाद घेण्याचें कार्य एकदमच सुरू झालें. कोणत्याहि नवशिक्या कवीच्या असाव्यात तशा तिच्या कविता होत्या. भावनेची सखोलता किंवा कल्पनेची उत्तुंगता तिच्यांत विशेषत्वानें प्रत्ययाला येत नव्हती,

अन् येणें शक्यहि नव्हतें. तरी कल्पनांची मांडणी व रचनेची सफाई चन्द्रकान्ताला बरी वाटली. कविता-वाचन चालू असतां चन्द्रकान्ताच्य चर्येवर दृग्गोचर होणारे सूक्ष्म बदल ती आतुरतेनें न्याहाळून पाहात होती. आपल्या काव्यावरचा त्याचा अभिप्राय ऐकण्यास ती उत्सुक झाली होती

'एक वर्षाच्या व्यासंगाच्या मानानं ठीकच आहेत. पण पद्धतशीर व्यासंग करायला हवा. आतांपर्यंत कोणकोणते कवि वाचलेत तुम्ही ?'

'तसं अभ्यासाच्या दृष्टीनं कांहीं वाचन केलं नाहींच म्हटलं तरी चालेल. परिक्षेसाठीं अभ्यासाच्या लागणाऱ्या कवितेशिवाय मुद्दाम अभ्यास असा केला नाहीं. तरीपण मराठीतलं रवि-किरण मंडळापासून अलीकडचं काव्य वाचलंय बरंच' त्याच्या बोलण्यानें उत्तेजित होऊन हेमलतेनें उत्तर दिलें.

'यापुढं तुम्ही नीट व्यासंग करा. तुम्ही चांगल्या कविता करूं शकाल.'

'तुम्ही मदत केलीत तर...कराल ?'

'हो. हो. करीन कीं.'

'मला असं कुणीतरी साह्य करायला हवंच होतं. तुम्ही आकस्मिक-पणें भेटलांत. कित्ती छान झालं. मला मोठीच काळजी पडली होती कीं, इथल्या वातावरणांत आपला वेळ कसा जाईल याची. तुम्ही भेट-ल्यानं ती देखील चिंता दूर झाली.' तिच्या बोलण्यांत आनंद, कृतज्ञता, इत्यादि संमिश्र भावना व्यक्त होत होत्या.

त्या प्रसंगानंतर तिला आपण आपल्या मैत्रिणींनीं कुचेष्टिलेल्या, आप-ल्यालाहि गोंधळून सोडणाऱ्या मजूर वसाहतींत नसून कविकल्पित तरुल-तांनीं बहरलेल्या नंदनवनांत आपण विहार करीत आहोंत, असाच वर-चेवर भास होत होता !

--- --- ---

## ५

# साथी प्रकाश

सौंदर्याविषयीं आकर्षण हा जसा चन्द्रकान्ताच्या वृत्तींतील एक विशेष होता, त्याचप्रमाणें दलित वर्गाविषयीं जिव्हाळा हाहि त्याच्या वृत्तींतील दुसरा एक विशेष होता. कांहीं अंशीं तो त्याच्या परिस्थितीं-तूनहि निर्माण झाला होता. तो स्वतः बुद्धिमान होता. गुणी होता. परंतु परिस्थितीच्या फटकाऱ्यामुळें त्याला स्वतःच्या आशा-आकांक्षा निमूटपणें सोडून द्याव्या लागल्या होत्या. कारकुनीचें लाजिरवाणें जिणें कंठावें लागत होतें. प्रचलित विषम समाजरचनेमध्यें गुणांची व श्रमांची योग्य ती कदर केली जात नाहीं हें त्याला स्वानुभवावरूनच पटत चाललें होतें. आणि त्याला नोकरीला क्षेत्रहि असें मिळालें होतें कीं, विषम समाजरचनेंतील दोष, अन्याय यांचें मूर्तिमंत दर्शन त्याला प्रत्यही तेथें घडत राहावें !

रात्रंदिन यंत्रांशेजारीं काम करणाऱ्या मजुरांचें तें यांत्रिक जीवन पाहिल्यावर त्याला भ्रम पडे-जीवन, जीवन तें हेंच काय ? स्वतःच्या नि पोराबाळांच्या पोटाला ओली कोरडी भाकरी आणि लाज राखण्या-पुरता कपडा मिळविण्यासाठीं बिचारे, ऊन, थंडी, पाऊस, दिवस वा रात्र कांहीं न पाहतां गुलामासारखे राबतात-आणि जरूर त्या गरजाहि पुरेशा भागवूं शकत नाहींत-याला जीवन म्हणतां येईल काय ? हें जीवन म्हणायचें कीं जीवनाचें विडंबन ?...अशा तऱ्हेचे अनंत विचार त्याच्या डोक्यांत काहूर माजवून सोडत.

त्याचा मजुरांकडे ओढा असल्यामुळें त्यांच्यांत मिसळायला, त्यांच्या सुखदुःखांशीं समरस व्हायला त्याला कमीपणा वाटत नसे विशेषतः शंकरचें बिऱ्हाड कारखान्याबर आल्यापासून तर तो त्या वर्गांत जास्तच मिळूं मिसळूं लागला. शंकर त्याच्या गांवचा म्हणून चन्द्रकान्ताचें त्याच्या

कडे जाणें येणें होऊं लागलें. त्यामुळें शंकरकडे येणाऱ्या इतर मजुरांशींहि त्याचा संबंध येऊं लागला. मजूरवर्ग कांहीं अंशीं अधिक भाविक असतो. त्यांच्यांतल्या कांहीं हौशी मंडळींनीं एक 'गुरुवारचें भजनी-मंडळ' स्थापन केलें, भजनापरी भजन झालें. करमणूकहि झाली. नाहींतरी कारखान्याच्या त्या ओसाड माळावर—लक्ष्मीनगर बसाहतीच्या जागेला तेथील रहिवाशांनीं दिलेलें नांव आहे हें—करमणुकीला दुसरें काय साधन होतें.? शंकरबरोबर कधीं कधीं गंमतीनें चन्द्रकांतहि त्यांच्या कार्यक्रमाला जात असे.

पुढें पुढें ह्या लोकांसाठीं आपण प्रत्यक्ष कांहींतरी केलें पाहिजे, नुसतें त्यांच्या परिस्थितीच्या अवलोकनानें न् सहानुभूतीनें काय होणार ? असे विचार चन्द्रकान्ताच्या मनांत घोळूं लागले. आपला त्यांच्याशीं नित्य संबंध येईल असा कांहींतरी उपक्रम सुरू करण्याबद्दल तो विचार करूं लागला. साक्षरता प्रसाराचा त्याच्या आटोक्यांतला कार्यक्रम त्याला सुचला व पटला. प्रारंभीं शंकरला एकट्यालाच शिकवायला सुरुवात केल्यावर एक एक जण वाढूं लागला. घरची जागा जशी अपुरी पडूं लागली, तशी मजूर वस्तींतीलच जुन्या ऑफिसची जागा त्यानें शाळेसाठीं मिळवली. गेल्या दिवाळीच्या पाडव्यापासून शाळेचें काम व्यवस्थित सुरू झालें. शाळेंत येणाऱ्या मजुरांचे त्यानें कामाच्या पाळीवर गट पाडले, व फक्त रविवारची सुटी ठेवली.

चन्द्रकान्त जसजसा त्यांच्यांत मिसळत चालला तसतसा त्यांचा त्याच्यावर विश्वास बसत चालला, त्याच्याबद्दल आपलेपणाची भावना निर्माण झाली. कुणाकडे कांही कार्य होवो, त्याला बोलावणें येऊं लागलें. कुणाकडे सत्यनारायण होवो, त्याला प्रसादाला निमंत्रण येऊं लागलें.

मजुरांचें जीवन त्याला अधिक जवळून न्याहाळतां आलें.

याचवेळीं त्यानें मार्क्सवादी वाङ्मय वाचण्यास सुरुवात केली होती. त्या विचारसरणीनें तो भारला गेला. भांडवलदारवर्गाकडून मजुरांची होणारी पिळणूक तो डोळ्यांनीं पाहात होता. तिच्यामुळें त्याचें चित्त व्यथित होत होतें. देश स्वतंत्र झाल्यावर ही स्थिति पालटेल अशी

इतरांप्रमाणें त्याचीहि समजूत होती. पण—पण काय ? देश स्वतंत्र झाला? ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या पकडीतून सुटला अन् हिंदी भांडवलदारांच्या पकडींत सांपडला. सामान्य जनतेची स्थिति अधिकच बिघडली. अगदीं पराकोटीला गेली. भांडवलदार वर्गाच्या नफ्याचें प्रमाण मात्र पारतंत्र्यांतील काळापेक्षां अनेक पटींनीं वाढलें. स्वातंत्र्याचा खरा फायदा उठवला त्यांनीं. ज्या नेत्यांना जनतेनें देवाप्रमाणें मानलें, त्यांची अवस्थाहि निष्क्रिय, अगतिक—अगदीं दगडी देवासारखीच झाली.

आपल्या सरकारच्या धोरणाची, त्याच्या दुर्बलतेची त्याला कींव येई. कधीं तो हताश होई, तर कधीं त्याचा त्वेष अनावर होई. त्याचे विचार भडकत. पण ती एकांतिक विचारसरणी त्याच्या मनांत दृढमूल होत नसे. तिच्यांतील दोष त्याच्या ध्यानांत येत. रक्तपात—रंजित क्रांतीचें रशियांतील सध्यांचें स्वरूप त्याला दिसूं लागे. त्याचे विचार लोकशाही समाजवादावर स्थिर होत. समाजवादी नेत्यांबद्दल त्याला पहिल्यापासूनच आदर होता. बेचाळीसच्या लढ्यांतील त्यांच्या कार्यामुळें तो द्विगुणित झाला होता.

तेव्हां त्या पक्षांतीलच साथी प्रकाश यांच्यासारखा पुढारी कलापूरला येणार आहे, असें त्यानें वृत्तपत्रांत वाचल्यावर त्यांनाच आपल्या समारंभासाठीं बोलवावें असें त्याच्या मनांत आलें आणि त्यासाठीं त्यानें बाबासाहेबांची संमति पण मिळविली.

साथी प्रकाशांच्याकडूनहि होकार आला. चन्द्रकान्ताचा आनंद गगनांत मावेना.

साथी प्रकाश यांचें जीवन मोठें उद्बोधक होतें. ते मुंबई विश्वविद्यालयाचे फर्स्ट क्लास एम्. ए असून अलाहाबाद विश्वविद्यालयांत त्यांनीं कांहीं वर्षें प्राध्यापकाचें काम केलें होतें. तीस सालच्या महात्माजींच्या कायदेभंगाच्या चळवळीनें ज्या अनेक युवकांना आपणांकडे आकृष्ट करून घेतलें, त्यांपैकीं साथी प्रकाश हे एक होत. देशामध्यें इतक्या महत्त्वाच्या, इतक्या स्फूर्तिदायक घडामोडी चालू असतांना आपण विद्यार्थ्यांपुढें नुसतीं व्याख्यानें देत बसावें ही गोष्ट त्यांच्या

मनाला रुचेना. आपल्या राष्ट्राचा नवा इतिहास आपल्या डोळ्यांसमोर रोज घडत असतांना रोमच्या न् ग्रीसच्या जुन्या वैभवांत स्वतः रममाण होणें व विद्यार्थ्यांनाहि गुंगवून सोडणें त्यांना कसें आवडावें ? तात्काळ त्यांनीं आपल्या प्राध्यापकपदाचा राजीनामा दिला आणि गांधीजींच्या चळवळींत ते सामील झाले. विद्यार्थ्यांचें त्यांच्यावर अतिशय प्रेम. किती तरी विद्यार्थ्यांनीं त्यांच्या मागोमाग कॉलेजें सोडलीं. पुढें नाशिकच्या तुरुंगांत ज्या थोड्या तरुणांनीं कॉंग्रेस समाजवादी पक्षाची स्थापना केली, त्यांत प्रकाश एक प्रमुख होते. त्यांचें मुख्य कार्यक्षेत्र महाराष्ट्र हेंच असलें तरी त्यांनीं अखिल हिंदुस्थान पायांखालीं घालून जनताजनार्द-नाचें अगदीं जवळून दर्शन घेतलें होतें. त्यांनीं बेचाळीसच्या चळवळींत केलेलें कार्य तर अपूर्व होतें. त्या काळीं सातारा जिल्ह्यांत ब्रिटिश सत्तेचें जूं फेकून देऊन ठिकाठिकाणीं ग्रामराज्यें स्थापन करण्यांत नि तीं सुरळीत चालू ठेवण्यांत त्यांचेंच प्रमुख अंग होतें. हें सारें कार्य त्यांनीं भूमिगत राहून केलें. सरकारनें त्यांना पकडण्यासाठीं जंगजंग पछाडले, पण ते कांहीं अखेरपर्यंत सरकारला मिळाले नाहींत. अन् विशेष हें कीं, कित्येकदा ते प्रकटपणें त्या भागांतून वावरत असत ! जनतेचीहि त्यांच्यावर किती भक्ति होती, त्याचेंच हें प्रत्यंतर होतें.

अशा प्रकारचा पुढारी आपलें कार्य पाहायला येणार म्हणून चन्द्र-कान्ताला आनंद होणें साहजिकच होतें. दोन दिवस अहोरात्र परिश्रम करून त्यानें नेत्यांच्या तसबिरींनीं, तिरंगी माळांनीं, नि घोष-वाक्यांनीं सर्व शाळा शृंगारली. मजुरांनींहि त्याला सर्व प्रकारचें साह्य केलें. प्रकाश-सारखा पुढारी आपल्या शाळेला भेट देणार म्हणून त्यांनाहि काय हुरूप आला होता पण !

अखेर, प्रकाशांच्या आगमनाचा दिवस उजाडला. ठरलेल्या वेळा पूर्वीच शाळेबाहेरील व्याख्यानाची जागा माणसांनीं नुसती फुलून गेली. पाहुण्यांच्या डाव्या-उजव्या बाजूला मांडलेल्या खुर्च्यांवर बाबासाहेब, हेमलता व कारखान्यांतील इतर अधिकारी मंडळी बसली होती. बाबा-साहेबांच्या उजव्या हाताला सुटाबुटांत असलेला तरुण चन्द्रकान्ताला

अगदीं नवखा, अपरिचित दिसला. एका पुढाऱ्याचे व्याख्यानाला जायचें म्हणूनच कीं काय, त्या तरुणानें पाश्चात्य पोषाखाला विसंगत अशी गांधी टोपी मोठ्या ऐटीनें किंचित् कलती अशी ठेवून दिली होती. व्रत म्हणून गांधी टोपी वापरण्याचा स्वातंत्र्य-प्राप्ती पूर्वीचा काळ जाऊन आतां अशा रीतीनें तिचा फॅशन् म्हणून सभा संमेलनांतून उपयोग होऊं लागला होता तर! समारंभस्थानीं तो तरुण बाबासाहेबांच्या बरोबरच आला असल्यामुळें त्याचा कुणी नातेवाईक वा पाहुणा असावा असा चन्द्रकान्तानें तर्क केला. तो स्वतः समारंभाच्या तयारींत गुंतलेला असल्यामुळें त्याची ओळख करून घेण्याची संधि त्याला मिळाली नाहीं.

नियोजित वेळीं प्रकाश आले व लगेच कार्यक्रमास सुरुवात झाली.

टाळयांच्या प्रचंड कडकडाटांत प्रकाश बोलण्यास उभे राहिले. श्रोतृ-वृंदावर चहुंबाजूंला सस्मित नजर फिरवून त्यांनीं प्रणाम केला. त्यांच्या बालसदृश निरागस मुखावरील स्मित जितकें आकर्षक, तितकाच त्यांच्या डोळयांतील स्नेहल व करुण भाव श्रोत्यांचीं अंतःकरणें कबजांत घेणारा होता. त्यांच्या संथ, अंतःकरणापासून निघालेल्या व आत्मप्रत्ययानें ओथंबलेल्या वाणीनें तर श्रोत्यांचें देहभान हरपलें. अगदीं संथपणें त्यांनीं बोलण्यास सुरुवात केली.

" आज आपला देश स्वतंत्र झाला आहे. पारतंत्र्याचं जोखड आपण मानेवरून फेकून दिलं आहे. पण त्यासाठीं आपणाला जबर किंमत द्यावी लागली. देशाची फाळणी झाली. लाखों लोक निराधार झाले. इकडे जनतेची कल्पना कीं, आपण स्वतंत्र झालों. आतां आपण सुखी होऊं. पण ब्रिटिशांनीं जातांना अनेक पेचप्रसंग निर्माण करून ठेवले होते. आपल्या पदरांत त्यांनीं निर्भेळ, बावनकशी स्वातंत्र्याचं सोनं टाकलं नव्हतं. त्यांत बरंचसं हीण होतं. तरीहि आपल्या नेत्यांनीं तें पत्करलं. त्यांची भावना होती, कीं देशप्रेमाची आंच लावून तें उजळून घेऊं. शुद्ध करून घेऊं. पण त्या आंचीची झळ सामान्य जनतेलाच लागूं लागली! स्वातंत्र्याचं सुवर्ण अधिकाधिक शुद्ध होण्याऐवजीं सामान्य जनतेचे संसार त्या झळीनं होरपळून जाऊं लागले. जनतेंत एक प्रकारचं नैराश्य पसरलं.

महात्माजींनींहि उद्‌गार काढले कीं—स्वातंत्र्य आलं, पण जनतेंत उत्साह दिसत नाहीं ! मी शहरांत हिंडलों, खेडयांत गेलों, कारखान्यांत गेलों, खाणींतील मजुरांबरोबर बोललों. जनतेची दुरवस्था पाहून माझ्या डोळ्यांत वरचेवर पाणी उभं राही. मी स्वतःलाच विचारूं लागलों— स्वातंत्र्य आलं. पण ह्या लोकांच्या स्थितींत काय बदल झाला आहे ? उलट सामान्य जनतेचं जीवन अधिकाधिक कष्टतर होत चाललं आहे. महागाई बेसुमार वाढली आहे. ”

अशी सुरुवात करून नंतर त्यांनीं ह्या महागाईच्या मुळाशीं सरकारचें निर्नियंत्रणाचें धोरणच कसें आहे व त्यामुळें भांडवलदारांनीं मात्र क्रोडो रुपयांचा नफा कसा उकळला हें दाखवून दिलें. आणि तरीसुद्धां त्यांची त्रकासुरी भूक अद्याप वाढतीच कशी आहे. ते सरकारकडून नवींनवीं आश्वासनें व सवलती कशा मिळवीत आहेत याचें विवेचन केलें. व उत्पादन वाढ करण्याला तेच नाखूष असून मजुरांच्या ऐवजी आज तेच खरोखर संपावर आहेत, असें विधान करून ते म्हणाले—

“ अशा परिस्थितींत मजुरांनीं संघटित होण्याची फार आवश्यकता आहे. ह्यावेळींच त्यांनी एकजूट करून चालू असलेल्या देशविरोधी कारवाया हाणून पाडल्या पाहिजेत. सरकारी धोरणाविरुद्ध प्रचंड आवाज उठवला पाहिजे. सध्यांच्या सरकारच्या हातून देशांत समाजवाद प्रस्थापित होणं अशक्य आहे. कुणीहि उठावं व स्वार्थासाठीं कॉंग्रेसची पांढरी टोपी घालावी असा प्रकार सुरू झाला आहे. सेवेपेक्षां सत्तेकडे कॉंग्रेस पुढाऱ्यांचं लक्ष लागलं आहे. लांचलुचपत, वशिलेबाजी यांना ऊत आला आहे. बहुजन समाजाच्या हितासाठीं झटण्याची पात्रता आज कॉंग्रेसमध्यें नाहीं. म्हणूनच मोठ्या दुःखानं आम्हीं तिच्यांतून बाहेर पडलों...शेवटीं मजुरांना माझं हेंच सांगणं आहे कीं, उठा—जागे व्हा. हीच वेळ तुमची आहे. हा क्रांतिकाल आहे. तुमच्या मनाजोगी क्रांति घडवून आणावयाची असेल तर संघटित व्हा...”

प्रकाश जवळ जवळ दीड तास बोलत होते. सारा श्रोतृवर्ग जिवाचे कान करून त्यांचें भाषण ऐकत होता. टिपकागदानें शाई टिपून घ्यावी

इतक्या तत्परतेनें त्यांचीं अंतःकरणें प्रकाशचे शब्द टिपून घेत होतीं.

ह्या कार्यक्रमानंतर सर्व चाळी हिंडून मजुरांच्या सुखसोयी पाहाण्याची प्रकाशांनीं इच्छा प्रदर्शित केली. चन्द्रकान्त त्याना बरोबर घेऊन निघाला. पक्क्या बांधणीच्या–दगडांच्या वा विटांच्या–अशा फक्त दोन तीनच चाळी तिथें होत्या. त्यांच्यामध्यें कारखान्यांतील इंजिनिअर, केमिस्ट असे दुय्यम दर्जाचे अधिकारी व ऑफिसांतले कारकून राहात असत. बाकी सर्वांची सोय पत्र्यांच्या चाळींतून करण्यांत आलेली होती! नोकर वर्गाची वरचेवर भरती होत राहिली तरी जागेच्या अभावीं आहे त्यांतच भागबाभागवी करण्याची मालकांची प्रवृत्ति असे. युद्धकालांत पत्र्यांच्या किंमती भरमसाट वाढल्या व सिमेंटबद्दल तर बोलण्याचेंच कारण उरलें नाहीं. ही एक मोठी सबब त्यांच्याजवळ होती. सडे नवरा बायकोच असतील तर त्यांना १०′×१०′ ची पत्र्याची एक खोली देण्यांत येई. जास्त पसारा असल्यास दोन खोल्या मिनतवारीनें मिळत. बंदिस्तपणा व पर्जन्यापासून निवारण ह्या दोन गोष्टींखेरीज तिसरी कोणतीहि गोष्ट ह्या खोल्यांपासून अपेक्षितां येत नव्हती! उन्हाळ्यांत तापून उकडहंडी होई, तर थंडींत त्यांची जणूं काय शीत–पेटीच बने! गटारांची सोय नसल्यामुळें सांडपाण्याचे वगैरे ओघळ जागजागीं वाहून शेवटीं तसेच उन्हानें सुकून जात! येथून तेथून सर्व पत्रा असल्यामुळें चाळीच्या एका टोंकाच्या खोलींत थोडें मोठ्यानें बोललें तरी दुसऱ्या टोंकाच्या खोलींत ऐकायला जाई. त्यामुळें खाजगीपणा असा कांहीं राहात नसे! 'वसुधैव कुटुम्बकम्' वृत्तीचे धडे मजूरवर्गाला द्यायला मालकांनीं ही सोय बाकी अप्रतिम केली होती!

हिंडतां हिंडतां खोल्या आंतून दाखविण्यासाठीं प्रकाशांना घेऊन चन्द्रकान्त एका खोलीच्या दाराशीं आला. आंत एक बाई चुलीजवळ भाकरी भाजत बसली होती. मिलोच्या दोन तांबड्या रंगाच्या भाकरी चुलीमागें उभ्या केलेल्या दिसत होत्या. तीन–चार महिन्यांचें मूल मांडीवर घेऊन मांडी आंदुळतांना दोन्ही हातांनीं भाकरी थापटण्याचें तिचें काम चालूं होतें. तरी त्या बिचाऱ्याची किरकिर कांहीं थांबत

नव्हती. एका कोपऱ्यांत लांकडाची पेटी, मडक्यांची उतरंड, चुलीभंवतीं पसरलेलीं स्वैंपाकाचीं थोडीं भांडीं—हींच काय तीं सारीं भांडीकुंडी! बाकळ व जुनी एक-दोन पांघरुणें काठीवर लोंबकळत होतीं. आढ्याला दोर बांधून जुन्या लुगड्याची खोळ करून तिचा पाळण्याऐवजीं उपयोग केलेला दिसत होता. हें सारें दृश्य पाहून प्रकाशांचे चर्येवर अतीव करुण-भाव दिसूं लागला. दारांत पाहुणे आलेले पाहून- आणि पोराची किर-किर थांबवण्यासाठीं त्याला प्यायला देण्यासाठी पदर सांवरतांना तिच्या लुगड्यानें दाखवलेलें दैन्य तर प्रकाशांना पाहवेना. ते झटकन् तेथून पुढें झाले व डोळ्यांवरून त्यांनीं चटकन् बोटें फिरवलीं!

सारें पाहून झाल्यावर परततांना प्रकाश चन्द्रकांताला म्हणाले, 'श्रीकृष्णानं दाखवलेलं विश्वरूप दर्शन पाहून अर्जुन भ्याला, असं गीतेंत बर्णन आहे, नाहीं चन्द्रकान्त? आतांपर्यंत आपण पाहिलेल्या भयंकर विश्वाचं दर्शन झाल्यावर एखादा नवखा माणूसहि तसाच भिऊन जाईल, नाहीं? भांडवलशाही म्हणतात ती ही. युद्ध सुरू झाल्यापासून तुमच्या मालकांनीं लाखांनीं नफा मिळवला असेल. साखरेवरचं नियंत्रण उठल्या-पासून तर त्यांच्या नफेबाजीला अंत नसेल. असं असलं तरी हे साखर तयार करणारे मजूर कसे राहात आहेत, तें पाहिलंत ना? त्यांचं उन्हा-थंडीपासून निवारण करणाऱ्या चाळींसुद्धां बांधून देण्याची मालकांना इच्छा होऊं नये ना? आणि मघांचं त्या खोलींतलं केविलवाणं दृश्य! कसलं हें जीवन! जीवनांतल्या साध्यासुध्या सुखांनासुद्धां यांना पारखं व्हावं लागावं? हे का कष्ट करीत नाहींत? हे समाजाच्या उपयोगी पडत नाहींत?...ह्याचं मूळ तुम्ही शोधा. मला तुमचं कार्य पाहून आनंद झाला. तुमची तळमळ खरीखुरी आहे. तुमच्यासारखे तरुण आज आम्हांला—आम्हांलाच नव्हे तर देशाला—हवे आहेत. पण केवळ मजुरांना साक्षर करण्यांतच समाधान मानून राहूं नका. त्यांना त्यांच्या हक्काची जाणीव करून द्या. त्यांना जागृत करा. तुमची कळकळ, तुमची तळमळ मला जाणवली, म्हणून मुद्दाम तुम्हांला मीं इतकं सांगि-तलं. तुमच्यासारखे तरुण आमचीं आशास्थानं आहेत...'

# ६

# कडवट चर्चा !

बाबासाहेबांच्या बरोबर समारंभास आलेला तो तरुण कोण असावा याविषयीं चन्द्रकान्ताच्या मनात कुतूहल निर्माण झालें होतें. पण समारंभाच्या गडबडींत तो तें तेवढ्यावरच विसरला. बाबासाहेबांच्या बंगल्यावर आपण गेलों म्हणजे होईलच सारा उलगडा, असें त्यानें आपल्या मनाचें समाधान करून घेतलें होतें.

बाबासाहेबांनीं त्याचा हेमलतेशीं परिचय करून दिल्यानंतर तो वरचेवर त्यांच्याकडे जाऊं लागला होता. एरवीं, कारणपरत्वेंच बाबासाहेबांच्याकडे जाणारा चन्द्रकान्त आतां त्यांच्या बंगल्यावर नित्य जाऊं लागला, त्याच्या मुळाशीं हेमलतेविषयीं त्याला वाटूं लागलेलें आकर्षण हें तर होतेंच, पण त्याशिवाय हेमलतेची काव्याबद्दलची आवड हा 'समानधर्म'हि होता. कोणत्याहि गोष्टीचा बेसुमार छंद म्हणजे व्यसनच तें ! व्यसनी माणसाला आपलें व्यसन पुरविल्याशिवाय जसें चैन पडत नाहीं, तशीच या वर्गातील लोकांचीहि स्थिति असते ! म्हणूनच कीं काय, दिवसभर निरनिराळ्या व्यवसायांत गुंतलेले लोक संध्याकाळीं बिनचुकपणें क्लबावर जमतात, किंवा एक वाङ्मयप्रेमी दुसऱ्याशीं काव्य–शास्त्र विनोदांत वेळ घालविण्यासाठीं दररोज तीन तीन मैलांची पायपिटी आनंदानें पत्करतो !

लक्ष्मीनगरला आल्यापासून चन्द्रकान्ताला अद्याप असा कुणीच भेटला नसल्यानें ही त्याची इच्छा अतृप्तच राहिली होती. तेव्हां हेमलतेला आपल्याप्रमाणेंच वाङ्मयाची व काव्यरचनेची आवड दिसून आल्यावर तो तिच्याकडे अधिकच आकर्षिला गेला असल्यास नवल नाहीं. त्याला रात्रीं साक्षरता प्रसार वर्गाचें काम असल्यामुळें तो बहुधा सकाळचे वेळींच त्यांच्याकडे जात असे. तेथें त्यांच्या निरनिराळ्या विषयांवर चर्चा

चालत. एरवीं विशेष न बोलणारा चन्द्रकान्त त्याच्या आवडीच्या विषयावर चर्चा सुरू झाली म्हणजे अगदीं तावातावानें बोलूं लागे. त्याच्या संभाषणाच्या ओघांत हेमलतेला बी. ए. ला लावलेले कवि व लेखक तर येतच; पण त्यांच्या अनुसंधानानें इतर लेखकहि येत. वाङ्मयांतील वास्तववाद, ध्येयवाद, नवीनच निघूं पाहणारा अति वास्तववाद यांची जशी चिकित्सा होई; तसाच काव्यांतील मानवता-संप्रदाय, अग्नि-संप्रदाय, स्थंडिल संप्रदाय अशा नव्यानव्या संप्रदायांचाहि तो परामर्ष घेई. कधीं मधीं चालू राजकारण, समाजकारणासारखेहि विषय निघत. अशावेळीं मग बाबासाहेबहि, हजर असले तर, त्यांत भाग घेत. वाङ्मयाशिवाय इतर विषय निघाला म्हणजे हेमलता बहुतेक श्रोत्याचें काम करीत असे. चन्द्रकान्ताचें वक्तृत्व मात्र अस्खलित चाले. त्याच्या चौफेर वाचनानें बाबासाहेबसुद्धां स्तिमित होत. तर हेमलता त्याच्याकडे प्रेमादर मिश्रित कौतुकानें पाहात राहिल्यास नवल नाहीं! त्याच्या तेजस्वी बुद्धिमत्तेबद्दलचा तिचा आदर द्विगुणित होऊन ती म्हणे—'खरंच चन्द्रकान्त तुम्ही कॉलेजांत जायला हवं होतं. तुम्ही खूप पुढं आला असतां.'

ती असें बोलली म्हणजे चन्द्रकान्ताच्या चर्येवर व तेजस्वी डोळ्यांत कारुण्याची छटा उमटे. व्याधाच्या बाणानें घायाळ झालेल्या पांखराची व्याकुळताच जणूं त्याच्या नजरेंतून प्रकट होई! तो सांगूं लागे—'माझी कॉलेजांत जायची फार इच्छा होती. मी लहानपणापासून आपण पुढं अमुक व्हायचं, तमुक व्हायचं असे बेतहि खूप करीत होतों. आपल्या बुद्धिमत्तेमुळं तें सारं शक्य होईल, अशीहि माझं मन ग्वाही देई. पण मी मॅट्रिक होण्याच्या सुमारास आमच्या घरची परिस्थिति एकदमच पार बिघडली. मोठ्या कष्टानं माझ्या विचारांना दाबून ठेवून सारी जबाबदारी शिरावर घ्यावी लागली. केवळ आपल्या बुद्धिमत्तेवर साऱ्या गोष्टी शक्य करूं हा त्यावेळचा विश्वास मात्र ढांसळला.'

एरवी कुणापुढेंहि आपली ही आंतरिक तळमळ एका शब्दानेंहि व्यक्त न करणारा चन्द्रकान्त हेमलतेजवळ उघड करी, तें तिनें त्याच्याविषयीं दाखविलेल्या जिव्हाळ्यामुळेंच ना?

त्याच्या ह्या हकीकतीमुळें तर तिला विशेषच हळहळ वाटे.

कामाच्या गर्दीत एक-दोन दिवस चन्द्रकान्ताला त्यांच्याकडे जायला झालें नाहीं म्हणजे तो आल्यावर हेमलतेचा पहिला प्रश्न असे—'का, दोन दिवसांत आला नाहींत ते ?'

× × ×

समारंभाचे दुसरे दिवशीं सकाळीं चन्द्रकान्त बाबासाहेबांच्या बंगल्यावर गेला तेव्हां त्यांचा चहा चालू असलेला त्याला दिसला. दिवाणखान्यांतील टेबलाभोंवतीं बाबासाहेब, हेमलता आणि आदले दिवशीं समारंभाच्या वेळीं त्याला दिसलेला तो नवखा तरुण हे तिघेजण बसले होते. चन्द्रकान्ताला पाहतांच त्याच्याकरितां चहा आणण्यासाठीं हेमलतेनें गड्याला सांगितलें. चन्द्रकान्त येऊन बसतांच तो तरुण बोलतां बोलतां क्षणमात्र थबकला. ही गोष्ट बाबासाहेबांच्या लक्षांत येऊन ते म्हणाले, 'अरे हो–तुमची यांची अद्याप ओळख नाहीं करून दिलेली नाही का ? हे चन्द्रकान्त. काल आपण ज्या शाळेच्या समारंभाला गेलों होतों, त्या शाळेचं सारं श्रेय यांना आहे. आपल्याच ऑफिसांत आहेत हे. शिवाय हे चांगले कवि पण आहेत. तुमच्या दृष्टीनं कुणास ठाऊक, पण आमच्या हेमाच्या दृष्टीनं तरी या गोष्टीला फार महत्त्व आहे. आणि हे—' त्या नवख्या तरुणाच्या बाजूला मान वळवून ते चन्द्रकान्ताला म्हणाले, 'सुरेश पाटणकर, आपल्या थोरल्या साहेबांचे भाचे. मुंबई युनिव्हर्सिटीचे एम्. एस्सी. आहेत. लौकरच ते शुगर टेक्नालॉजीच्या विशेष अभ्यासासाठीं अमेरिकेला जाणार आहेत. त्यापूर्वी Practical Experience साठीं चालू सीझन अखेर ते इथं राहणार आहेत.'

दोघांनींहि परस्परांना नमस्कार केले.

'तुम्ही कवि देखील आहांत तर.' सुरेश चन्द्रकान्ताला उद्देशून म्हणाला, 'बाकी तुमच्या काव्यवृत्तीला हें वातावरण कसं काय मानवतं कीं !'

'कां ! काय हरकत आहे ?'

‘ तसं नव्हे, पण इथं कसलं सौंदर्य तुमच्या दृष्टीस पडणार ? अन् तुमच्या काव्यवृत्तीचं पोषण काय होणार ? मला तर मुंबईहून इथं आल्यापासून कसं अगदीं पाण्यांतून मासळी बाहेर काढल्यासारखं वाटतंय. एकदम अगदीं भलत्या वातावरणांत येऊन पडल्यासारखं झालंय. मुंबईच्या त्या टोलेजंग इमारती, पादचारी माणसांनीं न् मोटारी ट्रॅम्सनीं गजबजलेले डामरी रस्ते, स्त्री–पुरुषांची संमिश्र रहदारी असलेलीं उपहारगृहं, चित्रपटगृहं न् बागा आणि समुद्रावरचं सायंकालचं तें दृश्य ! काय आहे इथं ? माझ्यासारख्यालासुद्धां इथं चुकल्या–चुकल्यासारखं वाटतं. तेव्हां म्हटलं, तुमच्यासारख्या काव्यवृत्तीच्या माणसाला हें वातावरण कसं काय आवडतं ? ’

‘ माणसाला जें आवडतं तें मिळतं, तर आणखी काय हवं होतं ! हें तर झालंच–शिवाय कवि केवळ सौंदर्यपूजकच असतो असं नाहीं. तें त्याचं फार तर एक अंग म्हणतां येईल तीव्र संवेदनक्षमता हें त्याचं वैशिष्ट्य. तिच्या साहाय्यानं स्वतःच्या अनुभवांतील वा अवलोकनांतील हृद्य प्रसंगाचं तो यथातथ्य व मार्मिक चित्रण करतो. मग तो प्रसंग सौंदर्यपूर्ण असेल किंवा उबग येण्याइतका कुरूप असेल, आनंदपूर्ण असेल किंवा दुःखपूर्ण असेल, तो प्रसंग उत्कटतेनं न् समरसतेनं रंगवणं हें त्याचं काम. ज्याला केवळ सौंदर्याचाच अनुभव आला असेल, तो त्याचंच वर्णन करील. दुसऱ्या एखाद्याला सबंध आयुष्यांत दुःख व निराशा यांच्याशिवाय दुसरं कांहींच पदरांत पडलं नसलं तर त्याची काव्य–वीणा त्यांचेच करुण सूर छेडील. मुख्य काय हवं असेल तर कोणत्याहि प्रसंगाशीं समरसणारं हृदय आणि त्याला व्यक्तता देण्याचं कौशल्य. तसंच सौंदर्याविषयीं. सौंदर्याची निश्चित व्याख्या सांगतां येईल का ? एकाला सुंदर वाटणारी गोष्ट दुसऱ्याला वाटेलच असं सांगतां येत नाहीं. तेव्हां सौंदर्य हें वस्तूंत नाहीं–दृष्टींत आहे असं म्हणायला काय हरकत आहे !’ त्याचें वक्तृत्वपूर्ण विवेचन चालू असतां त्याचे नेत्र चमकत होते.

हेमलतेला त्याचें हें विवेचन पटल्याचें तिच्या प्रफुल्लित चर्येवरून दिसत होतें. आपल्यालाहि तें पटल्यासारखें दाखवून सुरेश म्हणाला,

'तसंहि असेल. आपल्याला कांहीं गम्य नाहीं त्यांतलं. मासिकांतून वगैरे येणाऱ्या कवितांचीं पानं मी जाहिरातींच्या पानांप्रमाणंच उलटतों. बाकी काव्य वाचन आवडत नसलं तरी काव्य गायन मात्र आवडतं बरं का मला. ग्रामोफोनवरचीं भावगीतांचीं रेकॉर्ड्स् किंवा रेडियोवरले भावगीतांचे कार्यक्रम मी आवडीनं ऐकतों.'

'म्हणजे तुम्हाला गायन आवडतं म्हणा कीं—काव्य नाहीं.' चन्द्रकान्त हंसत हंसत म्हणाला.

'कसंहि म्हणा आणि आतांच्या या तुमच्या शुष्क चर्चेपेक्षां तुमच्या काव्यगायनांत माझं मन खास अधिक रमेल.'

'हो. खरंच, तुमचं काव्यगायन एकदां ऐकवा कीं आम्हांला. केव्हां ठरवूं या कार्यक्रम, सांगा ?' वाहत्या गंगेंत हेमलतेनें आपली नाव सोडली.

'कसला कार्यक्रम ठरवताय ! मला गायला येत नाहीं. साधं वाचल्यासारखं म्हणून दाखवलं तर चालेल ?'

'चालेल. चालेल. आधीं कबूल तर करा, मग पाहूं गायला येतं कीं नाहीं तें.'

'वाः वाः, हा उलटाच न्याय दिसतोय. आधीं एखाद्याचा कार्यक्रम ठरवायचा न् मग म्हणे त्याला कांहीं येतेय् की नाहीं पाहूं. सार्वजनिक कार्यक्रम तुम्ही चांगले ठरवाल—' चन्द्रकान्त हंसत हंसत म्हणाला.

'ज्या कलावन्तांना आपल्या जवळची कला लोकांपासून लपवून ठेवायची इच्छा असते त्यांच्याबाबतींत असा उलटा न्यायच उपयोगी पडतो. बरं तें असूं दे. मग कबूल ना ! उद्यां रात्रीं चालेल ? अनायासें रविवारच आहे. तुमच्या ऑफिसला व शाळेलाहि सुटी आहे. बाबांनाहि मोकळीक आहे. काय बाबा ?' बाबासाहेबांच्याकडे पाहात हेमलता म्हणाली.

बाबासाहेबांनीं संमतिदर्शक मान हालवली.

'बरं, पण कार्यक्रम मर्यादित असूं दे. विशेष कुणाला निमंत्रण करण्याच्या भानगडींत पडूं नका.' चन्द्रकान्त म्हणाला.

इतक्यांत कलापुराहून वर्तमानपत्रें आणणारा सायकलस्वार वर्तमानपत्रांचें पुडकें टेबलावर टाकून गेला. प्रत्येकानें एकेक उचललें. बाबासाहेबांच्या हाताला ' सुप्रभात ' लागला. त्यांनीं त्यांतील मजकुरावरून कांहीं वेळ नजर फिरविल्यावर ते चन्द्रकान्ताकडे पाहात म्हणाले, 'वाः, सुप्रभातनं आज अगदीं विक्रम केल्यासारखा दिसतोय. आपल्या कालच्या समारंभाचं वृत्त त्यानं अगदी व्यवस्थित दिलं आहे. प्रकाशांचं भाषणहि जसंच्या तसं आलंय. कशी काय जादू झाली बुवा ही ? '

' सुप्रभात ' हें कलापूरचें वर्तमानपत्र. वर्तमानपत्र म्हणण्यापेक्षां याला ' जाहिरातपत्र ' म्हणण्यानेंच त्याचें यथार्थ वर्णन होणार आहे ! हें पत्र हातांत घेतल्यावर प्रथम कांहीं नजरेंत भरत असेल, तर त्यांतील जाहिराती ! इतर वर्तमानपत्रें बातम्या देऊन उरलेल्या जागेंत जाहिराती घालीत असतील तर हे जाहिराती छापून उरलेल्या जागेंत बातम्या घालीत असावेत असाच कुणाचाहि समज व्हावा ! वर्तमानपत्रें जाहिरातीवर चालतात याचें मूर्तिमंत उदाहरण म्हणजे आमचें हें 'सुप्रभात'. बरें, ज्या बातम्या येत त्यांतीलहि बऱ्याचशा ' अरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टी'ला पुरवणी म्हणून सहज शोभून जाव्या अशा असत ! अशा परिस्थितींत व्याख्यानांचे अहवाल यथातथ्य छापून येण्याचें चांगल्या चांगल्या वृत्तपत्रांना कठिण असणारें दिव्य याच्या हातून पार पडणें कसें शक्य होतें ?

' ती बातमी सुप्रभातच्या बातमीदारानं दिलेली नाहीं. मी स्वतःच कालच्या समारंभाचा अहवाल तयार करून निरनिराळ्या वर्तमानपत्रांकडे धाडला होता.' चन्द्रकान्तानें स्पष्टीकरण केलें.

' तरीच. '

आतां संभाषणाचा ओघ सहजच कालच्या व्याख्यानावर वळला.

' कालचं प्रकाशांचं व्याख्यान सुंदर झालं, नाहीं ? ' चन्द्रकान्त.

' पण त्यांनीं भांडवलदारवर्ग व नेहरू सरकार यांच्यासंबंधीं केलेली विधानं सर्वांना पटतीलसं वाटत नाहीं. ' सुरेशनें अडविलें.

' वाः, माझी तर समजूत आहे कीं, त्यांचं भाषण म्हणजे संयमपूर्ण

टीकेचा एक उत्कृष्ट नमुना म्हणायला हरकत नाहीं. कॉंग्रेसवर व कॉंग्रेस पुढाऱ्यांवर टीका करतांना ते किती संयमानं बोलत होते ! इतर जहाल वक्ते कॉंग्रेसवर व पुढाऱ्यांवर व्याख्यानांतून किती कोरडे उडवतात—त्या दृष्टीनं प्रकाशांचं व्याख्यान म्हणजे राणा भीमदेवी थाटाचं प्रचारात्मक नसून तर्कशुद्धतेनं कॉंग्रेसच्या धोरणाचं विवेचन करणारं होतं. त्यांत कळकळ होती. कॉंग्रेसचा अधःपात पाहून होणारी मनाची तळमळ त्यांत दिसत होती.'

'चन्द्रकान्त कालच्या व्याख्यानानं फारच भारल्यासारखे दिसताहेत ' सुरेश.

'नाहीं, मी कांहीं केवळ त्यांच्या व्याख्यानानं न् व्यक्तिमत्वानं भारला गेलों, अशांतली गोष्ट नाहीं. मला त्यांची विचारसरणी फार पसंत पडली.'

'विचारसरणी काय, सध्यां कुणीहि उठावं न् आपल्या सरकारवर झोड उठवावी अशी फॅशनच पडत चालली आहे. तरी बरं, पं. नेहरू-सारखे नेते आपल्याला लाभले आहेत.'

'बहुसंख्य जनतेची टीका ही सुबुद्धपणें झालेली नसेल कदाचित्. पण त्या टीकेचा उगम मात्र तिच्या झालेल्या अपेक्षा-भंगांत आहे, हें निश्चित. पारतंत्र्याचं जोखड मानेवरून उतरल्यावर तरी आपण सुखी होऊं, अशी सामान्य जनतेनं अपेक्षा बाळगली असल्यास ती चुकीची म्हणतां येईल काय? महायुद्धाच्या झळींत आधींच सारे होरपळून निघालेले आहेत. तेव्हां आतां स्वातंत्र्यकालांत आपल्याला कांहीं सुख लाभेल अशी त्यांनीं अपेक्षा कां धरूं नये? पण उलट, स्वातंत्र्यकालांतच सरकारच्या निर्नियंत्रणाच्या न् भांडवलदारांना सवलती देण्याच्या धोरणामुळं महागाईची कमान युद्धकाळापेक्षां वाढतच गेली. तिकडे भांडवलदारांनीं मात्र, क्रोडो रुपयांचा नफा ह्याच काळांत मिळवला. ह्या गोष्टी धडधडीत दिसत असतां सरकारनं त्याबाबत कोणती परिणामकारक उपाय-योजना केली?'

'पण तुम्ही आपल्या सरकारपुढील बिकट प्रश्नांकडे लक्ष देत नाहीं.

आज तें क्रान्ति-कालांतून जात आहे. किती तरी प्रश्न त्याला सोडवायचे आहेत. कांहीं प्रश्न त्यांनी यशस्वीपणें हाताळलेहि आहेत. अशा परिस्थितींत काल स्वातंत्र्य आलं कीं आज सुखी झालों हें कसं शक्य आहे ? कांहीं धीर धरायला पाहिजे कीं नको ?'

'काल स्वातंत्र्य आलं कीं आज आपण सुखी होऊं—ही कल्पना पूर्णांशानं बरोबर नाहीं हें आम्हांलाहि पटतं. पण असं पहा. आपल्याला एखाद्या गांवाला जायचं असलं म्हणजे निघाल्याबरोबर आपण तिथं पोंचलों पाहिजे हें म्हणणं आततायीपणाचं असेल. पण आपण निघालेल्या दिशेवरून आपण त्या गांवींच पोंचणार, कीं भलतीकडेच कुठं जाणार हें कळायला वेळ लागत नाहीं. सरकारच्या सध्यांच्या धोरणाबद्दलहि असंच म्हणतां येईल. आपलं सरकार भलत्याच दिशेनं चालूं लागल्याचं दिसत आहे. कॉंग्रेसनं आपल्यापुढं जें ध्येय ठेवलं होतं त्याचा मार्ग सुटल्यासारखा झाला आहे. म्हणून लोक ओरडताहेत. सरकारला आज भांडवलदारांना दुखवणं जड जातं, पण जनतेला पूर्वी दिलेल्या वचनांना हरताळ फांसला गेला तरी त्याची दिक्कत वाटत नाहीं.'

'नेहरूंसारखे नेते ज्या सरकारचे अध्वर्यु आहेत, त्या सरकारबद्दल तुम्ही असे उद्गार काढावेत म्हणजे आश्चर्य आहे !'

'सरकारच्या टीकाकारांना उत्तर द्यायचं हें एक हत्यार बरं तुम्हां लोकांच्या हातांत सांपडलं आहे. पं. नेहरू पंतप्रधान आहेत. त्यांच्या ध्येयाबद्दल न् उच्च हेतूंबद्दल कुणाला संशय घेतां येणार नाहीं हें सारं मान्य. पण ते एकटे कांहीं करूं शकत नाहींत, किंवा शकले नाहींत, हीच आमची मुख्य तक्रार आहे. म्हणूनच सध्यांचं हें मंत्रीमंडळ बदलून—शक्य तितक्या लौकर बदलून—खरंखुरं जनतेचं प्रातिनिधिक मंत्रिमंडळ अस्तित्वांत आलं पाहिजे असं आमचं म्हणणं आहे. पं. नेहरूंच्याबद्दल व्यक्तिशः कुणीहि आदरोद्गारच काढील, पण ते ज्या स्थानीं आहेत तेथून कांहीं करूं शकत नाहींत, ही मोठी खेदाची गोष्ट आहे.'

'तुम्ही सरकारकडे दोषैकदृष्टीनं पाहतां. त्यानं काय केलं नाहीं तेवढंच तुम्हाला दिसतं. पण त्यानं काय केलं तें तुम्ही लक्षांत घेत नाहीं.

निर्वासितांचाच प्रश्न घ्या. खरोखर किती बिकट प्रश्न ! त्यापायीं सरकारच्या शक्तीची न् द्रव्याची किती हानि होते आहे ! तिकडे कुणी पाहतो ? तसाच संस्थानिकांचा प्रश्न. प्रारंभीं मोठा बिकट वाटणारा हा संस्थानांचा प्रश्न सरदार पटेलांनीं किती सहजतेनं, खुबीदारपणानं हाताळला न् निकालांत काढला. पण वाटतेय् तुम्हांला त्याबद्दल कधीं कृतज्ञता?'

' संस्थानांचा प्रश्न सरदार पटेलांनीं चतुराईनं सोडवला हें खरं. पण आमचं म्हणणं, संस्थानिकांना हीं लाखों रुपयांचीं वर्षासनं देण्याची तरी काय जरूर होती ? आतांपर्यंत त्यांनीं संस्थानांची अनिर्बंधपणें केलेली लूट पुरे नाहीं का झाली ?

' चन्द्रकान्तांचीं मतं एकांतिक दिसतात. पण सरकारला तीं एकदम स्वीकारतां येणं शक्य नाहीं. ' इतका वेळ शांतपणें सिगारेटचे झुरके घेत उभयतांचा वादविवाद ऐकत बसलेले बाबासाहेब म्हणाले.

' कां, शक्य नसायला काय झालं ? ' हा प्रश्न चन्द्रकान्ताच्या अगदीं ओठावर आला होता. पण इतक्यांत—

' पुरे झाला बाई हा तुमचा राजकारणाचा काथ्याकूट. काय निष्पन्न व्हायचंय शेवटी त्यांतनं ! ' हेमलता लाडिकपणें म्हणाली.

' कंठशोष. दुसरं काय ? ' किंचित् उपरोधाची छटा आणून चन्द्रकान्ताकडे पाहात सुरेश म्हणाला.

' हेमा, ह्यावर चहाचं औषध सांग गणूला लौकर आणायला. '

कडवटपणा धारण करूं पाहणाऱ्या चर्चेचा बाबासाहेबांनीं गोड शेवट केला.

× × ×

चन्द्रकान्त रात्रीं आपल्या दैनंदिनींत लिहीत होता—

" माझ्या जीवन-नाटकांतील एका नव्या अंकाला सुरुवात झाल्यासारखं अलिकडे वाटूं लागलं आहे. हेमलतेशीं परिचय वाढूं लागल्यापासून आयुष्यांतील एका नव्या काल-खंडांत पदार्पण केल्याचा भास होतो आहे. हेमलताहि माझ्याप्रमाणंच काव्य-वेडी आहे. रोज दोघे मिळून

वाचन करतों. चर्चा करतों. मोठा मजेंत जातो आमचा वेळ. सकाळीं मी जेव्हां त्यांच्या बंगल्यावर जातों, तेव्हां ती माझी अगदी वाटच पाहात बसलेली असते. मलासुद्धां ती वेळ चुकली कीं, कसं चुकल्या-चुकल्यासारखं वाटतं. काय म्हणावं या आकर्षणाला?

हेमलता सुंदर आहे. काव्य-वेडी आहे. पण तिची वृत्ति अजून एखाद्या मुग्ध बालिकेसारखी आहे. बाह्य जगाचा वारा तिच्या घरकुलाला अद्याप लागलेला नाहीं.

सध्यां माझे इतर कार्यक्रम—साक्षरता प्रसार वर्ग, वाचन लेखन-चालूं आहेतच. पण सकाळच्या एका तासा—दीडतासाकरितां रोज दिवस उग-वतो न् मावळतो, असं आजकाल वाटतं.

मी हेमलतेकडे आकर्षित झालों आहें हें माझ्या मनाशीं तरी कबूल करायला कांहींच हरकत नाहीं. सौंदर्यदर्शनानं रसिकवृत्ति उचंबळून येणं हें पूर्णचंद्राच्या दर्शनानं सागराला भरती येण्याइतकंच स्वाभाविक नाहीं काय?

असं असलं तरी त्यामुळं माझ्या कार्याकडे मी मुळींच दुर्लक्ष होऊं देत नाहीं. उलट प्रकाशांच्या भेटीपासून साक्षरता प्रसार वर्गाच्या कार्याला नवाच जोम आल्यासारखा झाला आहे.

एकंदरींत, आजवर संथ वाहणाऱ्या माझ्या जीवनप्रवाहाला आतां गति आल्यासारखी वाटते....

तो इष्टस्थळींच पोहोचेल ना?...

धावतां धावतां तो आवांक्याबाहेर जाऊन भलतीकडे तर जाणार नाहीं ना?...



## ७

# सुरेश आणि वचनराव

आरामखुर्चीवर पडल्या पडल्या स्वैरपणें सिगारेट ओढणें व त्यांतून निर्माण झालेल्या धूम्रवलयांकडे पाहात राहणें असें कितीतरी वेळ सुरेशचें चाललें होतें.

पलीकडच्या खोलींतून भर्रर्रर्र असें स्टोव्हचें संगीत सुरू होतें. चार–साडेचारचा तिसरे प्रहरचा सुमार होता.

त्याच्या मनांतील विचार–तरंगांचा आणि स्टोव्हच्या संगीताचा इतका लय लागला होता कीं–'साहेब, चहा आणलाय' असे शब्द कानांवर पडल्यावर भानावर येऊन त्यानें तिपाईकडे पाहिलें. तिच्यावर चहाचा कप ठेवून पार्वती जवळच उभी होती.

सुरेशनें हात लांबवून कपबशी घेतली आणि पार्वती आंत जाण्यासाठीं वळली. तिच्या कमनीय पाठमोऱ्या आकृतीवर त्याची लोभस दृष्टि किंचित्काल ठरून राहिली.

नंतर पार्वतीनें चहाची भांडीं विसळलीं व जागच्या जागीं ठेवलीं. झाडलोट, साफसफाईचीं किरकोळ कामें केलीं आणि 'जातें बरं का' असें सुरेशला सांगून बाहेर पडली.

तिनें सुरेशकडे वरकाम पत्करलें होतें आणि सकाळच्या चहाच्या वेळीं नसली तरी तिसऱ्या प्रहरच्या चहाच्या वेळीं ती हजर असे व मग तो तिला करावा लागे.

तिच्या विशेषसें मनांत नसतांहि बाबासाहेबांच्याखातर तिला हें काम पत्करावें लागलें होतें. त्याचें असें झालें....

सुरेश हा थोरल्या साहेबांचा भाचा असल्यामुळें बाबासाहेब त्याला पहिल्यापासूनच आदरानें वागवूं लागले. कंपनींतील मालकाच्या खास गाडीवरचा ड्रायव्हर सुद्धां जिथें आपण कुणी वेगळी असामी आहों

अशा रुबाबांत बावरतो आणि इतर लोकहि त्याच्याकडे त्या दृष्टीनें पाह-वात, तिथें सुरेशसारख्या त्यांच्या प्रत्यक्ष भाच्याशीं ते कसे वागतील, हें का सांगायला हवें ? सुरेशच्या सोयी-गैरसोयींत बाबासाहेब जातीनें लक्ष पुरवीत. प्रथम त्यांनीं त्याला आपल्याच बंगल्यावर राहण्याची सूचना केली. पण आतांपर्यंत कॉलेजच्या वसतिगृहांत स्वच्छंदानें राहण्याची संवय झालेल्या सुरेशला ही सूचना पसंत पडणें शक्य नव्हतें. तेव्हां त्यांच्या बंगल्याशेजारीं असलेल्या इंजिनिअर, केमिस्ट अशा दुय्यम दर्जाच्या अधि-काऱ्यांच्या चाळींतील एक ब्लॉक त्याला दिला. अशी राहण्याची व्यवस्था स्वतंत्र झाली तरी वसाहतीवरील खाणावळीची व्यवस्था कंपनीच्या दर्जाला शोभण्यासारखी नसल्यामुळें त्याला जेवणासाठीं मात्र आपणां-कडेच येण्यास बाबासाहेबांनीं सांगितलें. सुरेशनेंहि तें मान्य केलें. हेमलते-सारख्या सुस्वरूप कॉलेजकन्येच्या सहवासाचें आकर्षणहि कांहीं कमी नसल्यामुळें तो जेवणानंतरहि-विशेषतः रात्रींचा-बराच वेळ त्यांच्याकडे गप्पा मारीत बसे. असेच एकदां त्यांच्याकडे कामासाठीं असलेल्या पार्व-तीला पाहिल्यावर आपल्याकडेहि वरकामासाठीं येण्याबद्दल त्यानें तिला विचारलें. प्रथम नकार देण्याचें पार्वतीच्या मनांत होतें. पण ' यांचं एक-ट्याचं तें असं काय काम पडणार ! आमच्याकडेच ते असते तर नसतं का केलंस तूं तें ? ' असें बाबासाहेबांनीं म्हटल्यावर तिला संमति देणेंच भाग होतें. अर्थात् अधिक पैसे मिळण्याची आशा देखील त्या होकाराच्या मुळाशीं होतीच.

येथील एकंदर गोष्टींपैकीं सुरेशचें मन कुणी ओढून घेतलें असेल तर तें हेमलतेनें. प्रयोगशाळेंत तासन्तास बसून प्रयोग करीत राहण्याची संवय व चिकाटी त्याच्या अंगांत पहिल्यापासूनच होती. इथें ती त्याला नव्यानें अंगीं बाणण्याचें कांहीं कारण नव्हतें. पण प्रयोगशाळेंतून बाहेर पडल्यावर स्वछंदानें भटकायला, कांहीं खाण्याची इच्छा झाल्यास उत्कृष्ट उपाहारगृहांत शिरायला किंवा विशेषच कंटाळा आल्यासारखा वाटल्यास एखाद्या इंग्लिश चित्रपटाला जायला तो आतां मुंबईत नव्हता. दररोज तो दोनतीन तास प्रयोगशाळेंत बसे. कंटाळा आल्यासारखा वाटल्यास

कारखान्यांत चक्कर मारून यंत्राची माहिती घेई. पण लवकरच त्याला या गोष्टीचाहि कंटाळा येऊं लागला. बाबासाहेबांच्या बंगल्यावर हेमलतेच्या सहवासांत त्याचा जेवढा वेळ जाई तेवढाच काय तो त्याच्या दृष्टीनें बरा जाई.

मुंबईला त्याचे दिवस मजेंत व चैनींत गेले होते. म्हणूनच कीं काय त्याला तिथल्या आठवणी वरचेवर येत. बाल्यांतून तारुण्यांत प्रवेशणारें वय आणि समवयस्क मित्रमैत्रिणींत विना जबाबदारी दिवस घालविण्याची संधि. कुणाच्याहि जीवनांतील हा काल रमणीयच असतो. त्यांतल्या त्यांत सुरेशप्रमाणें सधन पालक असलेल्या विद्यार्थ्यांची गोष्ट तर विचारूंच नका. त्याचे वडील तो लहान असतांनाच वारले होते व पतिनिधनानंतर लगेच त्याची आई आपल्या भावाकडे येऊन राहिली होती. अशाप्रकारें मामांनीं—थोरल्या साहेबांनीं—त्याच्या संवर्धनाची सारी जबाबदारी घेतली असल्यामुळें त्याला कसल्याहि गोष्टीची ददात पडली नाहीं किंवा कसली विवंचना करावी लागली नाहीं. शास्त्रीय विषयाकडे त्याचा प्रथमपासूनच ओढा होता. साहजिकच मॅट्रिक झाल्यावर कॉलेजांतहि विज्ञानशाखा घेऊन त्यानें रसायनशास्त्रांतील एम्. एस्सी. ची पदवी यंदाच संपादन केली. एम. एस्सी. झाल्यावर त्याचें महत्त्वाकांक्षी मन एखादी परदेशीय पदवी मिळविण्याबद्दल आतुर झालें आणि आपल्या मामांच्याकडे त्यानें त्याबद्दल सूत उवाच केलें. त्यांनाहि आपल्या कारखान्यासाठीं शुगर टेक्नॉलॉजीसंबंधीं विशेष शिक्षण घेतलेला एखादा तज्ज्ञ हवा होताच. आयता घरचाच माणूस त्यासाठीं मिळाल्यावर आणखी काय पाहिजे ? त्यांनीं त्याला कंपनीतर्फे अमेरिकेला पाठविण्याचें ठरविलें. जूनच्या सुमारास तो तिकडे जायला निघणार होता. तत्पूर्वी एक हंगाम ( Season ) तो कारखान्याच्या प्रयोग-शाळेंत काम करणार होता.

सुरेश महत्त्वाकांक्षी होता. पण त्याच्या महत्वाकांक्षेचें संवर्धन एका विशिष्ट वातावरणांत झालेलें होतें. लहानपणापासून आपल्या पितृहीन मुलापुढें आईनें आपल्या भावाचा आदर्श ठेवला होता.

थोरल्या साहेबांचें नांव भाऊसाहेब परांजपे. कारखान्यावर सगळेच

साहेब असल्यामुळें त्या छोट्या—मोठ्या साहेबांत यांची गल्लत होऊं नये म्हणून यांना ‘ थोरले साहेब ’ म्हणण्याचा प्रघात पडला. पुढें त्याच नांवानें त्यांचा निर्देश होऊं लागला. त्यांचें आतापर्यंतचें आयुष्य अतिशय उलाढालींत, धांदलींत अन् धडपडींत गेलें होतें. अगदीं खालच्या स्थितींतून ते वर आलेले होते. त्यांचे वडील पुण्याच्या नगरपालिकेंत कारकून होते व त्यांच्या मिळकतीच्या मानानें त्यांच्या पाठीमागें संसाराचा जंजाळ बराच होता. अशा परिस्थितींत भाऊसाहेबांनीं मोठया कष्टानें मॅट्रिकपर्यंतचें शिक्षण पुरें केलें आणि शाळेंत शिक्षकाची नोकरी धरली. पण त्यांचें धडपडणारें मन तेवढ्यावर संतुष्ट होणें शक्य नव्हतें. त्यांनीं शाळेंत शिकवितां शिकवतां स्वतःहि कॉलेजच्या टर्म्स भरायला सुरुवात केली. मोठया मिनतवारीनें त्यांनीं पदवीहि मिळविली. पदवी प्राप्त झाली तरी त्यांच्या मिळकतींत कांहीं म्हणण्यासारखा फरक पडला नाहीं. तेव्हां ‘ ज्यांना पैसा कमवायचा असेल त्यांनीं स्वतंत्र व्यवसायांत पडलें पाहिजे ! ’ हें सूत्र लक्षांत घेऊन त्यांनीं मास्तरकीचा राजीनामा दिला. नंतर त्यांनीं आपल्या एक दोन श्रीमंत मित्रांना पुढें करून पुण्यांत एक अद्ययावत् पद्धतीचें ‘ को ऑपरेटिव्ह स्टोअर्स ’ काढलें. कांहीं दिवस मोठया गाजावाजांत चालणाऱ्या त्या दुकानाचें दोन वर्षांतच दिवाळें वाजून त्यांचे मित्र सफाई बुडाले ! यावेळीं झालेल्या ओळखीच्या व अनुभवाच्या भांडवलावर त्यांनीं एक बॅंक काढण्याचा प्रयत्न केला. त्याच सुमारास महाराष्ट्रांत साखरेचे कारखाने नवीनच निघूं लागलेले होते. तेव्हां भाऊसाहेबांनीं ह्या नव्या धंद्याकडे आपलें लक्ष वळवलें. कलापूर भागांत उंसाचें पीक चांगलें येतें. शिवाय, कमी मोबदल्यांत तिकडील जमिनीहि मिळण्याची शक्यता आहे, असें पाहून त्यांनीं ह्या कारखान्याची रूपरेषा आंखली. मध्यम वर्गीयांनीं मध्यमवर्गीयांच्या भांडवलावर चालविलेला कारखाना अशी या कारखान्याची प्रसिद्धि होती. अर्थात् पांच-सहा कंपन्यांचे डायरेक्टर व कांहीं लाखांचे असामी असलेले भाऊसाहेब आतां मध्यमवर्गीय राहिले नव्हते. ही गोष्ट अलाहिदा !

* * *

अशा प्रकारचें आपल्या मामांचेंच उदाहरण सुरेशच्या नजरेसमोर असल्यामुळें त्यालाहि तसलींच स्वप्नें पडत असल्यास नवल नाहीं. आपल्या मामांच्याप्रमाणें आपणहि उद्योगधंद्यांत पडावें, खूप पैसा मिळवावा आणि नव्या नव्या मॉडेलच्या कोऱ्या करकरीत गाड्यांतून रुबाबांत फिरावें, असें त्याच्या वरचेवर मनांत येई.

पार्वती निघून गेल्यावर बराच वेळ सुरेश तसाच आरामखुर्चीवर पडून होता. नंतर 'साहेऽब,' 'अहो साऽहेब' असें पुकारीत पुढें लोटलेलें दार उघडून एक व्यक्ति आंत आली. तिच्या हातांत टाईप केलेल्या कागदांची एक सुरळी दिसत होती. शिडशिडीत बांधा, तरतरीत नाक व खोल डोळ्यांची ही किरकोळ मूर्ति लक्ष्मीनगरला प्रसिद्ध होती. बबनराव कुलकर्णी हें तिचें नांव. बबनराव हे ऑफिसांत हेडक्लार्क होते. कुत्सितपणा हें त्यांचें वैशिष्ट्य. कुत्सितपणांत त्यांची बरोबरी करणारा इसम त्या सबंध वसाहतीवर तर सापडला नसताच, पण इतरत्रहि त्यांना तुल्यबल सांपडणें कठीण गेलें असतें. सहा-सात वर्षांपूर्वी तो–वास्तविक पाहतां बबनरावासारख्या फाटक्या अंगाच्या पोरसवदा तरुणाला 'ते' असें आदरार्थी संबोधण्याचें कारण नाहीं–प्रथम कंपनींत आला, त्यावेळीं इतर कुठें रिकामी जागा नसल्यामुळें कंपनीच्या मेस–क्लबमध्यें ( खानावळींत ) हिशेबाठिशेब ठेवण्यासाठीं त्याला मोठ्या मिनतवारीनें ठेवून घेतलें. पण पुढें त्यानें स्वतःच्या चलाखीनें अन् हांजीहांजीखोर वृत्तीमुळें हेड क्लार्कच्या जागेपर्यंत मजल मारली. थोरल्या साहेबांचा मुक्काम कारखान्यावर असला म्हणजे सारखे त्यांच्या पुढें पुढें करून आणि त्यांच्या अपरोक्ष कारखान्यावर घडलेल्या बारीक सारीक घडामोडींचा साद्यंत अहवाल त्यांना सादर करून त्यानें त्यांची बहाल मर्जी संपादन केली होती. त्याच्या या अहवालांत कारखान्यांतील यंत्रांत झालेली मोडतोड, कोणता साहेब कामावर केव्हां येतो, किती वेळां नि केव्हां घरीं जातो, असल्या हकीकतींपासून तों तहत कुणाच्या घरीं कोण पाहुणे आले, कोण गांवाला गेले, कोण कुठें कितीवेळ बसतो, असल्या खाजगी गोष्टींचाहि समावेश होत असे ! असल्या हकीकती टिपण्यांत

त्याची अगदीं कावळयाची नजर होती ! त्याचें अक्षर मात्र इतकें सुरेख, कीं टाइपरायटर काय त्यापुढें ! हेडक्लार्कच्या जागेवर आल्यावर त्याच्या कुत्सितपणाला अगदीं बहर आला; अजाण बॅाशिंग्टनच्या हातांतील कुऱ्हाडच जणूं—अशाप्रकारें त्यानें आपली लेखणी वापरायला सुरुवात केली. आणि बबनराव त्यावेळीं असें वजन मारून होता कीं, त्यानें लिहावें नू थोरल्या साहेबांनीं डोळे मिटून त्याखालीं सही करावी. थोरल्या साहेबांचीच ही वृत्ति असल्यावर बाबासाहेबांसारख्यांचें त्याच्याबाबतचें धोरण कसें असेल हें काय सांगायला हवें ! ज्याच्याबद्दल बबनरावाच्या मनांत दंश असेल, किंवा जी व्यक्ति डोळयांत सलत असेल तिला क्षुल्लक गोष्टीवरून सतावण्यांत किंवा नसतें शुक्लकाष्ट त्याच्यामागें लावून देण्यांत तो वाकबगार होता. लेखणीधारी कारकुनांची जरी मजुरांत गणना होत नसली तरी बबनरावाच्या लेखणी वापरण्याच्या कसबावरून त्याला कारखान्याच्या परिभाषेंत 'Skilled Labour' अशी संज्ञा द्यायला कांहीं हरकत नाहीं !

बबनराव हा चन्द्रकान्ताच्या मागाहून दोन वर्षांनीं नोकरीस लागलेला पण लाख उचापती आणि अठरारों भानगडी करून बबनराव हेड क्लार्कच्या जागेपर्यंत पोंचला. चन्द्रकान्ताचा स्वभाव त्याच्या अगदीं विरुद्ध असल्यामुळें तो आल्यावेळीं लागला त्याच विभागांत त्याच जागेवर राहिला. निष्कारण वरिष्ठांच्या पुढें पुढें करण्याबद्दल त्याला चीड असली किंवा स्वतःच्या कामाव्यतिरिक्त इतर उचापती करणें त्याला आवडत नसलें तरी त्याची हुषारी वरिष्ठांच्या नजरेंत आल्यावांचून राहिली नव्हती. शिवाय असल्या गोष्टीपेक्षां स्वतःचा लेखन-वाचनाचा व्यवसाय अधिक महत्त्वाचा आहे हें तत्त्व त्यानें डोळयांपुढें ठेवलें असल्यानें कवि म्हणून आज त्याचें नांव रसिकांत प्रिय झालें होतें. बबनराव हेड क्लार्क झाला तरी त्याचा कीर्ति डिंडिम लक्ष्मीनगरच्या परिसराबाहेर ऐकूं जाण्याचें कांहीं कारण नव्हतें. हें वैषम्य अलीकडे फारच जाणवत असे. आणि तो आपल्या स्वभावाप्रमाणें चन्द्रकान्ताशीं वरून जरी गोड बोलत असला तरी मनांतून त्याचा मत्सर करीत असे.

" काय बबनराव, काय आणलंयत् ? ' बबनरावाला पाहतांच सुरेशनें त्याला विचारलें.

' कांहीं विशेष नाहीं. हीं स्टेटमेंट्स् आजच्या टपालानं जायला पाहिजेत. त्यांच्यावर तुमच्या सह्या हव्या होत्या म्हणून घेऊन आलों आहे. म्हटलं तुम्हांला बोलावणं धाडण्यापेक्षां आपणच गेलेलं काय वाईट ? ' कॉटवर बसल्याबसल्या भिंतींवर, आंतल्या खोलींत, इकडे तिकडे नजर टाकीत बबनराव म्हणाला.

' सह्यांचं काय हो, कुणी ऑफिसांतला शिपाई पाठवला असता तरी काम होत होतं. तेवढ्यासाठीं तुम्ही यायची काय जरूर होती ? '

' नुसतं सह्यांचंच काम होतं असं नाहीं. तुमचीहि सारी व्यवस्था नीट लागलीय् कीं नाहीं तें पाह्यचं होतंच एकदां, नाहींतर थोरलेसाहेब आम्हांला विचारायचे ! चहासाठीं घराकडे निघालों होतों, तेव्हां म्हटलं कामांत कामं उरकून घ्यावींत ! ह्या ऑफिसच्या कामांतनं फुरसत अशी मिळत नाहीं बघा. प्रत्येक गोष्टींत मी लक्ष घातलं तरच सारं ठाक-ठीक होतं. परवां एक दिवस मी रजेवर होतों तर तेवढ्यांत कसा गोंधळ माजला, तें तुम्ही पाहिलंत ना ? पण मी एकटा तरी कुठं कुठं म्हणून पाहणार ? '

' बाकी तुमची कामाची हातोटी और आहे बबनराव. '

' कसली आली आहे हो हातोटी ? बरं तें जाऊं द्या. तुमचं सारं ठीक चाललंय ना ? ' हवं–नको ' आम्हांला कळवीत चला बरं का. '

' सारं ठीक आहे. स्वत: बाबासाहेबांनीं लक्ष घातल्यामुळं कांहीं गैरसोय होत नाहीं. बरं तुम्ही चहालाच निघालांहात, तर इथंच करूं या का ? '

' नको. तुम्हींच चला आमच्याकडे. तिथंच बसूं आपण. '

चहा झाल्यानंतर बबनरावनें बोलतां बोलतां शाळेच्या वाढदिवस-समारंभाचा विषय काढला.

' कसा काय वाटला तुम्हांला वाढदिवस-समारंभ ? '

' बरा झाला कीं, पण मला कांहीं प्रकाशांची विचारसरणी–त्यांची

सरकारवरली टीका—तितकीशी पटली नाहीं. बाबासाहेबांच्याकडे त्याविषयीं वाद झाला माझ्या न् चंद्रकान्तामध्यें. तो मात्र भारून गेल्यासारखा दिसतोय् त्यांच्या व्याख्यानानं.'

'चन्द्रकान्तोचं पुरे हो. त्याला आपलं कांहीतरी निमित्तानं लोकांपुढं मिरवायला पाहिजे, दुसरं काय? नाहींतर कुठं चार मजुरांना साक्षर केलं त्याचा एवढा समारंभ न् गाजावाजा कशाला हवा होता हो? आमचे बाबासाहेबहि पडले सरळ. त्यांनीहि दिली त्याच्या बेताला संमति. मग काय?'

'प्रकाशांची बाजू घेऊन काय वाद केला त्यानं माझ्याशीं!'

'तो अलीकडे स्वतःला समाजवादी म्हणवून घेत असतो. पण म्हणावं असं चार मजुरांना साक्षर करून न् दिवाणखान्यांत वादविवाद करून समाजवादी होता येत नसतं. मला कांहीं त्याच्या ह्या अलीकडल्या गोष्टी पसंत पडत नाहींत. थोरल्या साहेबांच्या कानांवर असं कांहीं गेलं तर—! मालक—मजूर असे मुद्दाम भेद पाडणें त्यांना बिलकुल आवडत नाहीं. आतांपर्यंत इतर कारखान्यांतून इतके संप न् तक्रारी झाल्या असतील, पण इथं तसला प्रकार एकदांहि घडला नाहीं! थोरल्या साहेबांचं धोरणच तसं आहे. चन्द्रकान्ताला म्हणावं तुझं कविता करणं वगैरे फार तर चालूं दे. आधीं कविता कुणी फारशी वाचत नाहीं अन् ह्या अलीकडच्या कविता तर वाचल्या तरी समजत नाहीत! बरं तिकडे कवीलाहि खुशींत गाजरं खातां येतात कीं, आपण कुणीतरी वेगळे प्राणी आहोंत म्हणून!'

कांहीं वेळानंतर सुरेशला आपल्या खोलीवर सोडून पुढें जातांना बबनरावाच्या चेहऱ्यावर कसलें समाधान दिसत होतें?

८

# प्रीति-विश्व

अर्धवट जाग आली तरी रात्रीं झालेल्या जागरणामुळें हेमलतेच्या डोळ्यावरची धुंदी अद्याप पूर्णपणें गेलेली नव्हती. तशाच आळसावलेल्या स्थितींत बिछान्यावर पडल्या पडल्या आदल्या दिवशींच्या रात्रींचे प्रसंग तिच्या मनश्चक्षूंसमोरून जात होते.

सुरेश सोडला तर बाहेरच्यापैकीं फक्त शेजारच्या जोशी चीफ एंजिनिअरांना काव्यगायनाच्या कार्यक्रमाला निमंत्रण दिलें होतें व त्याप्रमाणें ते सपत्नीक आले होते. जोशीसाहेबांचा स्वभाव विनोदी होता आणि त्यांच्या व्यवसायाच्या मानानें त्यांची वाङ्मयाभिरुचि देखील चांगली होती. आपल्याला वगळून कार्यक्रम झाल्याचें त्यांना कळल्यावर त्यांनीं हेमलतेची चांगली हजेरी घेतली असती.

त्यांच्या चर्येवरून त्यांना कार्यक्रम आवडल्याचें दिसत होतें. चन्द्रकान्ताला ते रसिकतेनें 'अशापैकीं एखादी कविता म्हणा,' 'तशी एखादी म्हणा,' असें सुचवीत होते. सुरेश व बाबासाहेब यांची रसिकता मात्र एकंदरीत तटस्थ वृत्तीची दिसत होती. एखादें प्रेमगीत असलें किंवा एखाद्या कवितेची चाल विशेष मधुर असली तर तेवढ्यापुरतें सुरेशला चैतन्य संचारल्यासारखें वाटे. आणि अशा वेळीं त्याची नजर वरचेवर आपल्याकडे वळत असल्याचें हेमलतेला दिसून आलें होतें.

जोशीसाहेबांच्या आठवणीबरोबर कॉफीपानाच्या वेळीं त्यांची व चन्द्रकांताची झालेली चर्चा हेमलतेला आठवली आणि ह्यावेळींसुद्धां त्या आठवणीनें तिच्या चर्येवर किंचित् स्मितरेषा उमटली.

एकीकडे गरमगरम कॉफीचे घोट घेत असतांना जोशीसाहेब चन्द्रकांताला म्हणत होते—' अलीकडे नव्या युगाची युगप्रवर्तक म्हणून मासिकांतून छापून येणाऱ्या कवितेसारखी मासलेवाईक कविता तुम्ही नाहीं लिहिलींत

वाटतं कांहीं ? आम्हांला तर नाहीं बुवा तिचा अर्थ कधीं लागत ! आमच्या लहानपणी आम्हांला मोरोपंतांच्या किंवा वामनपंडितांच्या कवितेचा अर्थसुद्धा लागत नसे वाचल्याबरोबर. पण तो त्यांच्या भाषेमुळं. एकदां ती भाषा समजली कीं अर्थ बरोबर ठसे. म्हणजे तिच्यांत अर्थ नसे असं नाहीं. पण तुमच्या हल्लींच्या कांहीं कांहीं कवितांत कांहींच अर्थ नसतो—सगळयाच दृष्टींनीं. बरं त्या एखाद्या अगम्य सूत्रासारख्या नुसत्या चालींत घडघडा म्हणाव्या म्हटलं तरी त्या पडल्या मुक्तछंद ! आणि गद्याप्रमाणं सरळ वाचायला जावं तर वाक्यांतल्या शब्दांची उगीचच फिरवाफिरव केल्यामुळं वरचेवर ठेचाळण्याचा प्रसंग. कविता करायला पूर्वीं वृत्तबद्ध रचनेची तरी जरूरी असल्यामुळं कवि म्हणून मिरवण्यापूर्वीं तेवंढ्या तरी खटपटीची तयारी ठेवणं जरूर होतं. आतां काय, सारं मुक्तछंद ! कवितेचा छद करायला आतां कुणालाहि मुक्तता ! किंवा अगदी मुक्तपणानं कुणीहि हा छंद करावा असं म्हणा हवं तर.'

त्यांच्या या बोलण्यानें चन्द्रकान्तालाहि हंसूं आल्याशिवाय राहिलें नाहीं. तो म्हणाला, 'तुम्ही म्हणतां तशी हास्यास्पद परिस्थिति थोडी बहुत निर्माण झाली आहे खरी. पण म्हणून सारंच नवीन काव्य किंवा त्याचे प्रकार टाकाऊ आहेत असं म्हणतां येणार नाहीं. मुक्तछंदाचंच उदाहरण घ्या. मुळांत त्याचा उगम कविप्रतिभेच्या स्वैरसंचाराला छंदाचं बंधन पडूं नये ह्या कल्पनेंत आहे. पण कोणत्याहि चांगल्या कल्पनेचं पुढं त्याच्या अनुयायांकडूनच विडंबन व्हावं, तसंच मुक्त छंदाचंहि होऊं लागल्यास नवल नाहीं. आणि कल्पनेच्या स्वैर संचारासाठीं वृत्ताच्या मर्यादा झुगारणारा मुक्तछंद काव्यरचनेची हाव असणारांना आपलं कल्पनादारिद्र्य लपवायला उपयोगी पडूं लागला. तीच गोष्ट नव कवितेच्या नांवावर कांहींहि खरडणारांची. भावना अभिव्यक्तीचं जुनं स्वरूप, जुने संकेत बदलायला कांहीं हरकत नाहीं. पण जे नवे संकेत वापरायचे ते अनाकलनीय, असंबद्ध किंवा रस-हीन नसावेत, हें लक्षांत घेतो कोण ? कधीं कधीं तर अशी शंका येते कीं—खुद्द कवींना तरी आपण काय लिहितों त्याची कल्पना येत असेल

कीं नाहीं कुणास ठाऊक ! अशा कवीला एखाद्या खाष्ट रसिकानं त्याच्या कवितेचा अर्थ विचारला तर त्याच्या तावडीतून निसटण्यासाठीं केशव-सुतांच्या शब्दांत—

'शारदेनें जो मंत्र दिला कानीं
तसें लिहिलें मीं, काव्य तिचें मानी'

असें सांगून अर्थासाठींहि तिच्याकडेच बोट दाखवायची पाळी यायची त्याच्यावर !'

'वाः, चन्द्रकान्त तुम्ही स्वतः कवि असून आपल्या जातभाईंचं समर्थन करण्याऐवजीं तुम्हीहि आमच्यासारखंच बोलूं लागलांत, याला काय म्हणावं ?'

'माझ्या टीकेवरून मी नवकवितेचा किंवा काव्यक्षेत्रांतील नव्या प्रयोगांचा द्वेष्टा आहे असं मुळींच नाहीं. उलट अशा प्रकारचे प्रयोग करणाऱ्या कांहीं सत्कवींबद्दल माझ्या मनांत आदर आहे. माझा रोख फक्त टूम म्हणून नवकाव्याच्या नांवावर कांहींहि आणि कांहींतरी खर-डणाऱ्या लोकांच्यावर आहे. नवकाव्याच्या या उमाप पिकाकडे पाहून एखाद्यावेळीं मनांत येतं कीं, केशवकुमारांसारखा एखादा विडंबक कवि सध्यां हवा होता. त्याला विडंबन काव्यासाठीं खूपच मालमसाला मिळाला असता—'

अशी त्यांची चर्चा आणखी किती वेळ चालली असती कुणास ठाऊक ! हेमलतेची त्यामुळें बरीच करमणूक झाली. पण बाबासाहेब अन् सुरेश मात्र तिला कंटाळून पेंगण्याच्या बेताला आले होते. तेव्हां बाबा-साहेबांनींच सुचविलें—'अहो, जोशीबुवा—तुमची ही चर्चा आटपा पाहूं अगोदर. आम्हांला झोप यायला लागली तुमच्या या चर्चेमुळं. चन्द्रकान्तांना लौकर कार्यक्रम सुरू करूं द्या.'

यानंतर चन्द्रकान्तांनीं ती 'प्रीति-विश्व' कविता म्हटली. ती सर्वांनाच आवडली. हेमलतेला तर ती ऐकत असतांना अननुभूत आनंद होत होता. आतां देखील ती आठवण झाल्याबरोबर तिच्या सर्वांगावर

आनंदानें रोमांच उमे राहिले. काल रात्रीं वाचतां वाचतां झापे येऊं लागली म्हणून बिछान्यालगतच्या तिपाईवर ठेवलेली चन्द्रकान्तांच्या कवितांची वही तिनें उचलली व खुणेपाशीं उघडली. ती वाचूं लागली :

प्रीतिमुळें विश्व नवें उदय पावलें
भंवतींच्या जगताचें भान हरपलें!
मम आवड-निवडहि ती लोप पावली
प्रिय तुज त्याचीच रुची सखे, लागली!
अरुची ज्याविषयीं मीं जनीं दाविली!
तुज रुचतां, त्याची मज प्रीति लागली!
प्रीतीनें जादु करुनि असें भुलविलें
माझेंपण विसराया मजासि लाविलें!
कधिं निवांत बसलों मी एकला जरी
जगताचा कोलाहल टाळुनी दुरी
मूर्ति तुझी तरि माझ्या मनीं तरळते
मधु सहवास-क्षण स्मृति उजळुं लागते!
मन तुझिया एक विचारेंच भारलें
मम एकांतींही तुझीं चोर-पावलें!
नित्यापरि एक दिन न भेट जाहली
तव सहवासीं न घडी मधुर वेंचली
भेटीस्तव हृदयीं हुरहूर लागते
मन बनुनी बेचैन कुठें माळें न गुंततें!
सहवासा एक तुझ्या हृदय भुकेलें
त्याविण कांहीं न सुचे-रुचे, प्रेमले!
प्रीतिमुळें विश्व नवें उदय पावलें
भंवतींच्या जगताचें भान हरपलें!

'प्रीतीनें भारलेल्या मनाचें किती सुंदर वर्णन केलें आहे चन्द्रकान्तांनीं हें!' तिची विचार मालिका सुरू झाली. 'स्वतःला प्रीतीचा अनुभव

आल्याबांचून का इतकं उत्कट वर्णन कोणाला साधणार आहे? मग कुणाच्या प्रीतींत सांपडून त्यांनीं हें वर्णन केलं असावं बरं? इथं आपल्याशिवाय दुसरं कोण आहे त्यांच्या सहवासांत? काय, आपल्या-वरल्या प्रीतीनं त्यांना ही कविता स्फुरली असेल? आपल्यावरल्या प्रीतीनं?'....ह्या कल्पनेनें हेमलतेच्या शरिरावर रोमांचांचीं फुलें फुललीं! तिचे विचारतरंग पुढें सुरू झाले–' पण छे! आपली ही कल्पना किती धाडसाची आहे! कवीच्या एखाद्या कवितेवरून असे तर्क वितर्क करीत बसणें म्हणजे––छेः कांहीं तरीच! परवां चन्द्रकान्तांनींच माधव –जूलियन् यांच्या कांहीं कवितासंबंधीं बोलतां बोलतां सांगितलं नव्हतं कां, कीं तीं गीतं वस्तुतः कुठल्याहि तरुणीवरून स्फुरलीं नव्हतीं म्हणून? रसिकांच्या दृष्टीनं पाहिलं तर त्यांची गणना उत्कट प्रेमगीतांत करतात! काय...चन्द्रकान्तांच्या ह्या कवितेचंहि तसंच कांहीं असेल?...'

ह्या शंकेनें तिच्या हृदयांत कुठेंतरी टोंचल्यासारखें झालें. ती अस्वस्थ झाली. तिनें त्या कवितेच्या खालीं कोंपऱ्यांत पाहिलें. नेहमींप्रमाणें चन्द्र-कान्तानें तेथें तारीखहि टाकली नव्हती! पण अनुक्रमावरून व शाईच्या ताजेपणावरून त्यानें ती अलीकडेच लिहिलेली असावी असें अनुमान तिनें बांधलें. मनाच्या ह्या दोलायमान स्थितींत तिला एकदां असेंसुद्धां वाटलें कीं, ' चन्द्रकान्त आपणाकडे आल्यावर त्यांना विचारावं का ही कविता तुम्हांला कशी सुचली म्हणून?...अन् त्यांनीं उत्तर द्यायचं टाळलं तर?...किंवा आपल्या दृष्टीनं कांहीं निराशाजनक उत्तर त्यांनीं दिलं तर?....छे! नकोच तसं कांहीं विचारायला! अन् तें बरंहि दिसायचं नाहीं!'

तिची नजर त्या कवितेवरून पुन्हां फिरूं लागली. तिला वाटलें, ' चन्द्रकान्ताच्याच मनोवृत्तीचं कशाला? आपल्या मनोवृत्तीचं सुद्धां स्पष्ट प्रतिबिंब तिच्यांत दिसतंय् कीं! आपली अवस्थाहि ह्या कवितेंत वर्णन केल्याप्रमाणंच झाली नाहीं काय?

आपल्या जीवनांत चन्द्रकान्तांचा प्रवेश झाल्यापासून आपणांत किती बदल झाला आहे! पुण्याहून आपण इथं आलों तेव्हां कुठं अरण्यांत

येऊन पडल्यासारखं वाटायचं ! पण चन्द्रकान्तांचा व आपला लवकरच परिचय झाला. तेव्हांपासून दिवस कसे भराभर निघून जात आहेत ! सुटी कशी संपेल याची आपणांला मोठी काळजी वाटत होती. आता सुटी इतक्यांत कशी संपली याचं आपल्याला नवल वाटतंय् ! झालं, पुढच्या आठवड्यांत तर कॉलेज सुरू होणार. इथल्या कॉलेजांत आपल्याला कसल्या मैत्रिणी मिळतील ?'

या विचाराबरोबर तिला आपल्या पुण्याच्या मैत्रिणींची आठवण झाली.

'काय एकेकींचा थट्टेखोर स्वभाव ! यायच्यावेळीं तर थट्टा करकरून आपल्याला त्यांनीं भंडावून सोडलं. परस्परांचा निरोप घेतांना मात्र कसं भडभडून आलं. जवळ जवळ तीन चार वर्षं एकत्र घालवलेली सुलभा साठे न् वसुमती केळकर तर हायस्कुलांत असल्यापासून आपल्या बरोबर होत्या. येतेवेळीं लांब लांब पत्रं लिहायचं कबूल केलं. पण इथं आल्यापासून आपल्या हातून कांहीं तें झालं नाहीं. सुलभा साठे म्हणाली होती, 'तूं पत्रं किती छान लिहितेस ग. तुझ्यासारखं रूप मिळणं कांहीं शक्य नसलं तरी तुझी पत्रं लिहिण्याची कला तरी आम्हांला येऊं दे कीं. लक्ष्मी-नगरला गेल्यावर चांगली हात हात लांब जुन्या काळच्या पत्रिकेसारखीं किंवा हल्लींच्या भार्षेत सांगायचं म्हणजे एखाद्या दीर्घकथा—कादंबरी सारखीं पत्रं धाड. नाहींतरी तू अलीकडे लिहूं लागलीच आहेस. होऊं दे आतांपासूनच प्रॅक्टिस.'

त्यावेळीं आपणहि तिला 'बरं, बरं हं' म्हटलं होतं. तेव्हां आपली कल्पना कीं, सुटींत वेळ घालवायला हें एक साधन बरं उपयोगी पडेल म्हणून. पण तिलाच काय, इतरहि कुणाला आपल्याकडून पत्र गेलं नाहीं. त्या बिचाऱ्या मनांत म्हणतील—हेमा आपल्याला विसरली बरं का.

रोज गळ्यांत गळे घालून फिरणाऱ्या आपल्या मैत्रिणी—खरंच किती दिवसांत त्यांची आपल्याला आठवणहि झाली नाहीं ! इतके आपण रमून गेलों आहोंत या वातावरणांत ?'

चन्द्रकान्ताच्या कवितेच्या ओळी तिला डोळ्यांपुढें दिसूं लागल्याः

प्रीतीनें जादु करुनि असें भुलविलें
माझेंपण विसराया मजसि लाविलें !

× × ×

मन तुझिया एक विचारेंच भारलें
मम एकान्तींहि तुझीं चोर पावलें !

'म्हणजे—आपल्याहि मनांत प्रीतीनंच जादू केली आहे काय ? आपल्यांतील हा बदल प्रीतीच्या प्रभावाचाच द्योतक आहे ? आपली प्रीति—कुणावर आहे आपली प्रीति ?'

तिच्या नजरेसमोर चन्द्रकान्ताची मूर्ति खेळूं लागली.

'चन्द्रकान्तांनीं आपल्या मनाला भूल घातली आहे ? त्यांच्या व्यक्तित्वावर आपण मोहित झालों आहोंत ? त्यांच्या काव्यावर आपण लुब्ध आहोंत ? ह्या मोहिनीला, ह्या आकर्षणालाच प्रेम म्हणतात का ? रोज त्यांच्या येण्याकडे आपले डोळे लागून राहिलेले असतात, एखादे दिवशीं ते आले नाहींत तर आपल्या मनाला हुरहुर लागून राहते, हें कशाचं लक्षण आहे ? सुरेशांच्याबद्दल नाहीं कधीं अशा प्रकारचं आकर्षण आपल्याला वाटत तें ? त्यांच्याबद्दल नाहीं कधीं आपल्याला तशी हुरहूर लागून रहात ती ?'

सुरेशची मूर्ति तिच्या मनश्चक्षूंसमोर आली.

तसें पाहिलें तर सुरेशहि दिसायला वाईट नव्हता. सुखांत, ऐषारामांत वाढलेल्याची छाया त्याच्या देहावर दिसून येत असे. चन्द्रकान्ताचीं गालाचीं हाडें किंचित् उठून दिसत, तर सुरेशच्या गुबगुबीत गालांवर त्यांचा मागमूसहि नव्हता. पण चन्द्रकान्ताच्या वागण्यांत जो एकप्रकारचा तडफदारपणा होता, त्याच्या नजरेंत जें तेज होतें, त्याच्या शब्दाला जी एक धार असे—तसें सुरेशबाबत कांहीं म्हणतां आलें नसतें.

'व्यक्तिमत्व ही देहसौष्ठवाहून एक वेगळीच गोष्ट आहे, नव्हे ?' असाहि विचार हेमलतेच्या मनांत आला. 'त्या व्यक्तिमत्वामुळंच सुरेश चन्द्रकान्तांपुढं निष्प्रभ ठरतात, उगवत्या सूर्यापुढं चन्द्र दिसावा, त्याप्रमाणं !

एरवी संपन्नतेच्या किंवा शिक्षणाच्या दृष्टीनं पाहिलं तरीहि सुरेश चन्द्रकान्तांहून बरचढ ठरतात ! चन्द्रकान्त आपणाला न भेटतां एकटे सुरेश भेटते तर त्यांचं आपणाला आकर्षण पडलं असतं काय ? ' असाहि एक विचार तिच्या मनांत डोकावून गेला !



# २

# शंकरचें घरकुल

त्या दिवशीं शंकरला ' ऑफ ' ( सुटी ) असल्यामुळें तो घरींच होता. शेवटची रात्रपाळी करून पहांटे चारला आल्यावर तो जो झोपला तो पुन्हां सकाळीं दहा वाजतां उठला. दर ऑफच्या दिवशीं त्याची ही झोपून उठण्याची ठराविक वेळ होती. त्यानंतर दुसऱ्या दिवसापर्यंत कामाला जायचें नसल्यामुळें तो एक दिवस त्या जोडप्याला सणासारखा वाटे असें म्हटल्यास फारशी अतिशयोक्ति होणार नाहीं. त्यांचीच काय, पण दिवसपाळी, रात्रपाळी या चक्रांत सांपडलेल्या साऱ्याच कामगारांची मनोवृत्ति अशी असते असें म्हणायला हरकत नाहीं. जेवणखाण, झोप, बाजारहाट, इत्यादि दैनंदिन गोष्टी कशाबशा उरकून किंवा कांहीं न उरकतां भोंग्याच्या हाकेला ' ओ ' देण्यासाठीं धांवपळ करणाऱ्या कामगारांना 'ऑफ'चा एकच दिवस असा असतो कीं, ज्या दिवशीं भोंग्याच्या दीर्घ, कर्णकर्कश आवाजानें मनाला कामावर जाण्याची धास्ती न वाटतां उलट त्याची ती दीर्घ किंकाळी ऐकून ' का उगी स्टीम वायां घालवतोयास बाबा ? ' असा विनोद त्यांना त्यावर करतां येतो !

ऑफच्या दिवशीं पार्वतीहि आपलीं बाहेरचीं कामें झपझप उरकून घरीं येत असे मग तीं दोघें मिळून दुपारचें जेवण हास्य–विनोदांत

उरकीत व कांबळें अंथरून पडल्या पडल्या इकडल्या तिकडल्या गप्पा-गोष्टी करीत. असा चार वाजेपर्यंत वेळ काढल्यावर पार्वती चहा करी व नंतर कामासाठीं बाहेर पडे. ती दिवेलागणीला परत येई. दुपारप्रमाणेंच खेळीमेळीनें रात्रीचें जेवण उरकल्यावर पुन्हां अंथरुणें पसरून झोप येई-पर्यंत तीं दोघें गोष्टी बोलत रहात.

आजहि नित्याप्रमाणें दुपारचें जेवण उरकून दोघेजण गप्पागोष्टी बोलत पडले होते. कांहीं वेळानें पार्वतीच्या डोळ्यांवर झोप येऊं लागली. म्हणून दोघेहि मुकाट्यानें पडून राहिले. लवकरच पार्वतीला झोप लागली. तिच्या या निद्राधीन मुखाकडे तो कितीतरी वेळ एकटक पाहात राहिला. किंचित् स्मिताची छटा दाखविणारे तिचे गाल, कांहींसें नकटें पण ठसके-बाज नाक, त्याच्यावर नेहमीं प्रेमाचा पाऊस पाडणाऱ्या डोळ्यांच्या मिट-लेल्या पापण्या, कपाळाच्या उजव्या भागावर खेळणारी कुरळ्या केसांची ती बट, आणि सांवळ्या वर्णाच्या गोल चेहऱ्यावर नव्यानेंच चमकणारी ती झळाळी—होय, ती झळाळी नव्यानेंच चमकूं लागल्याचें त्याच्या ध्यानीं आलें होतें. त्या झळाळीचें कारण—तिला दिवस गेल्याचें—तिनेंच त्याला एकदां लाजत लाजत सांगितलें होतें. त्या गर्भाची छाया तिच्या मुखावर पडली होती. ती लवकरच एका बाळाला जन्म देणार होती आणि तो बाप होणार होता. 'टँहाँ, टँहाँ' रडणाऱ्या एका काळ्यासांवळ्या गुट-गुटीत बालकाची मूर्ति त्यानें कल्पनेनें तयार केली. त्याच्या अंतरंगांत गोड लहरी उसळल्या.

ह्या घडीची तो किती आतुरतेनें वाट पहात होता! केवळ तोच असें नव्हे तर त्याचे आई-बापसुद्धां. त्याच्यानंतर बऱ्याच वर्षांनंतर त्याच्या पाठीवर झालेली मुक्ता दोन वर्षांची असतांनाच वारली. त्याच्या पुढल्या वर्षी शंकरचें लग्न झालें. मुक्ताची आठवण झाली कीं, आतां त्याची आई म्हणायची—' तिचं औक्ष सरलं. ती देवाघरीं गेली. आतां शंकरचं पोरगं माज्या मांडीवर खेळाया लागलं म्हंजे माझी मुक्ताच त्या पोराच्या रूपानं आल्यागत मला वाटल. ' शंकरचें लग्न झाल्यावर चार महिन्यांनीं पार्व-तीला पदर आला. शंकरच्या आईनें तिच्या ओटीभरणाचा समारंभ

मोठ्या थाटानें साजरा केला. ती म्हणायची–' कसंबी झालं तरी शंकर माजा येकुलता येक ल्येक हाये. मला काई आतां दुसरी सून यायची न्हाई. अन् त्यांत पुना ही माजी नक्षत्रावानी सूनबी पाटलाची ल्येक. तवा तिला काई उनं वाटुनशान न्हाई उपेगी. असल शंकरच्या नशिबांत न् पोरीच्या पायगुनांत तर मिळवत्याल म्होरं मायंदळ. पर माज्या डोळ्यांदेखत जें व्हायला व्होवं तें मी काईबी करुनशान थाटानंच करनार. ' शंकरच्या आईला हौस दांडगी अन् त्यांत तिला सूनहि मनाजोगी मिळालेली. मग त्या हौसेला काय विचारायचंय !

याप्रमाणें थाटानें ओटीभरण झालें. सारें झालें. नंतर महिन्यामागून महिने लोटूं लागले. परंतु शंकरच्या आईची इच्छा पुरी होण्याचें कांहीं चिन्ह दिसेना. वर्षे मागें पडलीं, तशी तिची निराशा दुणावत गेली. पहिल्या पहिल्यानें पार्वतीच्या हरएक गोष्टीचें कौतुक करणारी तीच शंकरची आई आतां तिच्यावर एखाद्या वेळीं उगीचच चिडल्यासारखें करूं लागली. ती शेजार पाजारणीजवळ म्हणायची देखील—' काय बाई ह्या पोरी–आम्ही यांच्या येवढ्या हुतो तवां आम्हांला दोन–दोन पोरं झालीं हुतीं.'

पार्वती बिचारी चिमणीसारखें तोंड करून मुकाट्यानें बसे !

परंतु आतां शंकरची, किंबहुना त्या सबंध घराचीच बऱ्याच दिवसांपासूनची मनःकामना पुरी व्हायचा समय आला होता, त्यामुळें त्याला विशेषच आनंद झाला होता.

आणि अशा आनंददायक विचारांत तो रमला असतांना पार्वती झोपेंत चावळली—' ताईसाहेब, जात्यें आतां. घरधनी यायचा वखत झाला.' पार्वतीला झोपेंत चावळायची फार संवय होती. ती अशी बडबडूं लागली म्हणजे शंकर तिला जागें करी. आतांहि त्यानें तिला जागें केलें. झोपेंतून एकदम जागी झाल्यानें तिनें इकडे तिकडे पाहिलें. ' ए, झोपेंत काय बडबडत होतीस ? ' म्हणून शंकरनें तिला विचारतांच 'कुटं काय ? ' असें तिनेंच त्याला उलट विचारलें. तें खरेंच तिला कांहीं आठवत नव्हतें म्हणून कीं उडवाउडवीच्या उद्देशानें कुणास ठाऊक !

नंतर तिनें पडल्या पडल्याच दोन्ही हात जुळवून डोक्यावर नेत आळोखे पिळोखे दिले व ‘ चार वाजाय आलं का ? ’ म्हणून शंकरला विचारलें.

तिच्या त्या हालचालीकडे पाहात असलेल्या शंकरनें उत्तर दिलें— ‘ ह्या दिवसांत तूं कामाच्या असं आरी ( आहारीं ) पडूं नगस उगीच. खरं बगितलं तर तूं आतां विसावा घ्यायचा सोडलं अन् उलट येकेक काम जास्तच अंगावर घेत बसलीस. नेहमींचं हायेच कीं. ह्या दिवसांत तरी जिवाला थोडं सुख घे.’

त्याच्या शब्दाशब्दांतून जिव्हाळा ओथंबला होता. पार्वतीलाहि तो जाणवला नाहीं असें थोडेंच होतें ? तरीपण ती म्हणाली—‘ होतंय तंवर करतें. म्होरं मग हायेच कीं इसावा. आन तवा जो खर्चाला पैका लागल, त्येची नग का काई येवस्था कराया ? का कुटं गाडगंबिडगं पुरून ठेवलयसा ? ’

पार्वतीनें अखेरचें वाक्य कांहींसें थट्टेत उच्चारलें.

‘ असं गाडगं पुरून ठेवलं असतं, तर स्वतःची जमीन सावकाराच्या घशांत कशापायीं गेली असती ? आन् आम्ही तरी असं इथं मोलमजुरी करत कशाला बसलों असतों ? ’

शंकरच्या बोलण्यांत विषादाचा सूर होता.

‘ पर अजुनी काय झालंया ? तुमचं माझं हात चालतयात तंवर असल्या घा जिमिनी घेऊं. मग तिचंच काय ? आन् ती जिमीन तरी म्होरल्या सालापावतर मोकळी हुतीयाच नव्ह ? ’ नंतर किंचित् थांबून स्निग्ध आवाजांत ती म्हणाली, ‘ आपल्याला न्हाई सुख लाभल. निदानीला आपल्या पोराला तरी लागल. त्यांतच आपुन सुख मानावं .’

पार्वतीच्या तोंडांत साखर असल्याचा शंकरचा अनुभव कांहीं नवीन नव्हता.

पार्वती उठली. तिनें झटपट चूल पेटवून चहा केला व ती कामाला बाहेर पडली.

पार्वती निघून गेल्यावर शंकर पुन्हां कांहीं वेळ आडवा झाला. त्याच्या डोळ्यांपुढें मागील आठवणी एका पाठोपाठ एक येऊं लागल्या. पार्वतीच्या गोड बोलण्यानें सावकाराचा विषय तो तात्पुरता विसरला होता इतकेंच.

पिंपळगांवांत रामराव पाटलाच्या बांधालगतच शंकरचेंहि लहानसेंच पण विहरीखालील शेत होतें. लहानपणापासून राखणीच्या किंवा काढणी मळणीच्या दिवसांत शंकर आपल्या आईबापाबरोबर शेतावर यायचा. लहान वयांतहि त्याला गोफण घेऊन पांखरें राखणें किंवा मळणीच्या वेळीं बैलांच्या मागें हिंडणें यांत मौज वाटावयाची. पुढें पुढें तर थंडीच्या कडाक्यांतसुद्धां पांखरें राखण्याचें काम तो एकटा मोठ्या हौसेनें करी.

असेच एकदां शाळूच्या राखणीचे दिवस होते. नित्याप्रमाणें थंडीच्या रामप्रहरांत पांखरें राखण्यासाठीं शंकर शेतावर आला होता. गोफणीचे फटाफट आवाज व तोंडांतून ' हाऽ हाऽ ' असे सूर निघत होते. इतक्यांत मध्येंच 'अव कोन हायसा ते ! पांखरं राखतायासा का मानसं टिपतायसा तरी ? ' असा पलीकडच्या पाटलाच्या शाळूच्या पिकाकडून शंकरच्या कानांवर आवाज आला. आणि थोड्याच वेळांत तो प्रश्न विचारणारी व्यक्ति बांधावर येऊन शंकरच्या पुढ्यांत उभी राहिली. ती रामराव पाटलाची गंणू होती.

' काय मानसं माराया आला व्हय सकाळच्या रामपारी ! ' तिच्या तोंडातून ते खोट्या रोषाचे शब्द बाहेर पडले.

गंणूला पाहतांच तोहि थोडा वेळ माच्यावरून खालीं उतरला. बारा तेरा वर्षांच्या गंणूची ती ठेंगणी ठुसकी, काळी सांवळी मूर्ति आणि खोट्या रागामुळें तिनें चढवलेली भुंवई व फुगवलेले गाल पाहून त्याला मौज वाटली.

' आन् मानसं तरी सकाळच्या रामपाऱ्यांत कशापायीं आलीं असत्याल वरं ? '

'तुमच्यावानीच. तुमी माणसंच न्हवं ? तुम्ही कशापायीं आलायासा ? '

'आम्ही आलों पाखरं माराया.' त्यानें बेगुमानपणें उत्तर दिलें.

त्याच्या बोलण्यांत अन् पाहण्यांत तिला काय अर्थ दिसला कुणास ठाऊक ! पण तिनें ' तर, तर ' करून मानेला हिसडा दिला.

नंतर त्यांचे मनमोकळेपणानें बोलणें झालें.

अशाच नंतरच्या एका रामप्रहरची गोष्ट शंकरला आठवली.

रामराव पाटील दोन तीन गांवकऱ्यांना बरोबर घेऊन शंकरच्या बापाकडे—भिवा दादाकडे—आले होते. रामराव एकटे कधींमधीं त्यांच्या-कडे यायचे. पण आज ह्या लव्याजम्यानिशीं कशाला आले असावेत असा त्याला प्रश्न पडला. त्यांच्या बोलण्यांत गंगूच्या लग्नाचा विषय निघाल्यावर त्याला थोडाबहुत उलगडा झाला. पण त्यांत त्याचें स्वतःचेंहि नांव गोवलें गेल्यावर तो पुन्हां बुचकळयांत पडला. ' आपलं न् गंगूचं लगीन ठरतंय् काय ? ' ह्या कल्पनेनें त्याच्या अंगांतून हर्षाच्या लहरी उठल्या. 'तरीच बरं का चार रोजा आधीं—'

त्याला तो चार दिवसांपूर्वीचा प्रसंग आठवला. गंगूचें गांवच्या बाजी देशमुखाशीं लग्न ठरतें आहे असें आईकडून त्याच्या कानांवर आलें होतें. इतके दिवस आपल्याशीं खेळीमेळीनें वागणारी गंगू आतां लोकाची होणार, याच्यापुढें ती कशाला आपल्याबरोबर बोलायला येईल, याचें त्याला वाईटहि वाटलें. त्यानंतर शेतांत गेल्यावर केळीला पाणी पाजतांना त्याच्या डोक्यांत हेंच विचार घोळत होते आणि मग गांवाकडल्या वाटेनें गंगू येतांना त्याला दिसली. तिला प्रत्यक्षच सारी हकीकत विचा-रावी म्हणून गंगू जवळ आल्यावर मोट पाण्यांत बुडवून माचाडावरच कांहीं वेळ थांबत तो म्हणाला, 'तुम्ही देशमुखीणबाई होनार म्हनं आतां. मग मागल्यावानी आम्हां गरिबासंगं चार शबुद बोलाया कुठलं आवडाया तुम्हाला ? '

' त्या देशमुखाचं नांव काढूं नगासा माज्याम्होरं. अन् तुम्हाला कुनी सांगितलं मी देशमुखीन होनार म्हून ? '

तिच्या तोंडचे ते शब्द ऐकतांच त्यानें झरझर कशीतरी मोट बाहेर काढली व धाडकन् थारोळयांत लोटून दिल्यावर बैलाला थोडा वेळ विसांवा देऊन तो तिच्याकडे गेला.

‘ मग ऐकलं तें खोटंच जनुं ? ’

‘ मला काय ठावं कुनी सांगितलं तुम्हास्नी तें. मला काय येड–बीड लागलया काय त्या घुबडासंगं लगीन कराया ? त्याच्या देशमुखीला काय चाटायचं हाय व्हय ? दिसभरांत कदीं शुद्धीवर असतो का तो ?’ हें बोलत असतांना तिच्या नजरेसमोर त्याची ती अतिरिक्त नशेनें धुंद झालेली नजर, तांबडसर डोळे, गोबरें तोंड, काळा वर्ण, आणि इतक्या तरुण वयांत सुटलेलें दोंद–अशी मूर्ति बहुधा उभी असावी !

नंतर शंकर केळीच्या बावरांत जाऊन पाणी दिलेलीं दारें बंद करून नवीन दारें फोडत असतांना तिनें त्याला किंचित् लाजत लाडिकपणें विचारलें– ‘ मी येऊं तुम्हास्नी मदत कराया ? ’

‘ आजच्या रोज येक तूं आलीस म्हनून माझं काम झालं का ? रोज मलाच करायचं हाय न्हवं ? ’

‘ मग रोज येऊं ? चालल तुम्हास्नी ? ’ त्याच्याकडे प्रेमभरानें पाहात तिनें विचारलें.

त्याला प्रथम कळेना-हिचें आतां लग्न होऊन लवकरच ही परक्याच्या घरीं जाणार आणि रोज येऊं म्हणून आपल्याला काय विचारते आहे ! पण नंतर जेव्हां त्याचा अर्थ त्याला आकळला— .

ह्या आठवणींत तो गुंगून गेला असतांनाच रामराव पाटील व इतर मंडळी ‘ लई ब्येस झालं, ’ ‘ लई ब्येस झालं ’ असें बोलले. त्याचा अर्थ ते चहापाणी घेऊन उठून गेल्यावर भिवादादाच्या बोलण्यावरून त्याला समजला. पाटलांनीं आधीं देशमुखाशीं सोयरीक करण्याचें कसें ठरविलें होतें, परंतु गंगूनें ‘ मी त्याच्याशीं काय बी झालं तरी लगीन करनार न्हाई ’ असा ऐनवेळीं हट्ट कसा घेतला, एकदां लग्नाच्या बाटा-घाटी सुरू केल्यावर पोरीच्या जातीचें लग्न लांबणीवर टाकणें पाटलांना धोक्याचें कसें वाटलें, ओघाओघानें तिनेंच सुचवल्यावरून शंकरचें स्थळ ठरविण्यासाठीं अखेर पाटील आपल्याकडे कसे आले, इत्यादि हकीकत भिवबांनीं शंकरला सांगितली. आतांच्या बाटाघाटींत त्याचें व गंगूचें लग्न ठरलें होतें. पण पैशाचा प्रश्न मात्र बिकट होता. पाटील हे

भातां वतनवाडीच्या दृष्टीनें नांवाचेच पाटील राहिले असले तरी गांवांत यांचें नांव चांगलें होतें. तेव्हां त्यांच्या इतमामाप्रमाणें देज, लग्नसमारंभ, इत्यादि गोष्टी उरकायला हव्या होत्या. भिवबाजवळ जेमतेम दोनशें रुपये निघाले असते. अखेर अशा घरंदाज कुटुंबाशीं सोयरीक जुळून येत आहे तर थोडक्यासाठीं माघार नको म्हणून आणखी पांचशें रुपये यांनीं पिंपळगांवच्या जिरगे वाण्याकडून जमिनीवर कर्जाऊ काढायचे ठरविलें.

पैशाचा प्रश्न सुटल्यावर मग काय, लग्न अगदीं थाटांत झालें. गंगू शंकराची पार्वती झाली. इतके दिवस शंकराला डोईजड असणारी गंगा पार्वतीच्या रूपानें सहचरी म्हणून मांडीवर बसल्यावर त्याचा आनंद काय वर्णावा ! दोघेहि पूर्वींचे प्रसंग आणि बोलणीं आठवून हरखून जाऊं लागले. आतां शंकरला शेतामध्यें पार्वती हक्कानें मदत करूं लागली. हंसत खेळत दिवस जाऊं लागले.

कालचक्र फिरत होतें. तीन वर्षें लोटलीं. पण सावकाराचा पैसा परत गेला नाहीं. खर्चानें खर्च वाढत होता. मध्यंतरी पाटील वारल्यामुळें देशमुखाला जोर चढल्यासारखा झाला. त्याच्या फुसलावणीनें जिरग्यानें भिवबाची जमीन काढून घेतली. बरें, जमिनीचा तावा सोडावयाचा नाहीं म्हटलें तर पैसे कुठले भरायचे ? नाइलाजानें आपल्या बैलजोडी-निशीं दुसऱ्याच्या मळ्यांत घाम गाळण्याचें त्यांच्या नशिबीं आलें. पण तेवढ्यानेंहि भागलें नाहीं. संकट कधीं एक एकटें येत नाहीं. वरील घटनेनंतर सहा महिन्यांनीं त्यांच्या बैलजोडींतला ‘ सुभान्या ’ लाळीच्या रोगानें आजारी पडला. गांवठी उपचारांचा कांहीं उपयोग न होऊन तो दगावला आणि त्याच्या पाठोपाठ चालीला, कामाला त्याच्या बरो-बरीनें असणारा ‘ बत्ताशा ’ त्याच आजारानें लागला व मरणांतहि त्यानें आपल्या जोडीदाराची बरोबरी साधली. भिवबा सावंताच्या घरावर झालेला हा आघात जबर होता ! जमीन गेली तरी बैलांच्या आधारावर दुसऱ्याच्या शेतांत का होईना मजुरी करतां येत होती. नियतीचा कोप होऊन त्यांच्या हातचें तेंहि साधन हिरावलें गेलें ! कांहीं काळ त्यांना

अगदीं बेडयागत झालें. आपण देवाचा असा काय गुन्हा केला आहे म्हणून आपल्या पाठीमागें तो असा हात धुऊन लागला आहे, हें त्यांना कळेना. ते अशा दिङ्मूढ स्थितींत असतांनाच चन्द्रकान्त चार दिवस रजेवर पिंपळगांवास आला होता. आपल्या बाळपणींच्या सवंगड्याच्या घराची ती वाताहात पाहून त्यानें त्यांना धीर दिला व तो शंकरला आपल्या बरोबर कारखान्यावर घेऊन गेला.

' हें काय, दिवे लागणीची येळ झाली तरी पडलायसा ? ' पार्वतीनें दारांतून आंत येत शंकरला विचारलें.

' तूं गेल्यावर पडल्या पडल्या येकेक मागल्या आठवणी यायला लागल्या, त्या नादांत कायबी कळलं नाहीं. ' प्रत्युत्तरादाखल बोलत शंकर उठून बसला. समोरच्या खोल्यांतून नुकतेच दिवे लागलेले पाहून त्यानेंहि झटकन् उठून दिव्याचें बटन दाबलें. खोलींत लख्ख प्रकाश पडला.

× × ×

रात्रीं पुन्हा अंथरुणावर पडल्या पडल्या त्यांच्या गुजगोष्टी सुरू झाल्या.

' खरंच, तुला माझ्या गरिबाच्या घरीं येऊन सुख न्हाई लागलं, पार्वती त्यापरिस—'

त्याच्या बोलण्याचा रोख लक्षांत घेऊन पार्वती म्हणाली—

' उगी कांहींतरी बोलूं नगासा. मला ह्या घरांत यायचं हुतं म्हून मीं हट्ट धरला हुता बाबाजवळ. मीं त्यास्नी साप सांगितलं कीं, मला त्या देशमुखाला द्यायचा इचार करूं नगासा. मी त्याचं तोंड दिखुन पगनार नाहीं. मला घर गरिबाचं मिळालं तरी चालल, पर—' पुढें बोलायला ती लाजूं लागली. तेव्हां शंकर मुद्दाम म्हणाला, ' पर काय ? '

' पर काय त्येंच बोलतया कीं माझ्या संगं. '

' आतां रामूमामा असतं तर त्यांना किती आनंद झाला असता. त्यांना लई हौस होती नातवंड बगायची. '

' हंऽऽ ' असा सुस्कारा सोडून पार्वती स्वस्थ बसली.

## १०

# कवि अन् शिवाय प्रेमिक !

रविवारचा दिवस. दुपारचा तीन साडेतीनचा सुमार झालेला. चन्द्रकान्त स्वस्थपणें आरामखुर्चीवर पडून कांहींतरी वाचीत होता. सत्यभामाबाई पलीकडेच खिडकीच्या उजेडांत तांदूळ निवडीत बसल्या होत्या.

' काय चन्द्रा, आज तुझी स्वारी घरींच बरी बसलीय ? आज कांहीं कार्यक्रम–बिर्यक्रम नाही वाटतं ! ' तांदळांतील खडा बोटांच्या चिमटींत धरून बाहेर फेकीत सत्यभामाबाई म्हणाल्या.

आपल्या सदोदित बाहेर जाण्याला हा टोमणा आहे हें चन्द्रकान्तानें ओळखलें.

' काय करावं, आज रविवार असल्यामुळं सगळीकडेच सुटी आहे. बरं इतरहि कांहीं कार्यक्रम नसल्यानं घरीं बसणं भाग पडलं, करतां काय !' चन्द्रकान्तालाहि थट्टेची सुरसुरी आली होती !

' मुलं मोठीं झालीं कीं त्यांना आपल्या आईबापांबद्दल कांहीं वाटेनासं होतं काय कीं ! '

' तुझं म्हणणं खरं आहे, आई. पण लग्न झालेल्या मुलांच्या बाबतींत. आणि त्यांना तरी लग्नानंतर नवं माणूस घरांत आल्यावर जुन्या माणसांबद्दल इतकं स्वारस्य कां वाटावं ? '

' पण तूं तर लग्न व्हायच्या आधींच दुर्मिळ व्हायला लागला आहेस. आधीं तुझं घरांत पाऊल टरायचं मुष्किल न् कधीं ठरलं तरी तुझं आपलं सदान्कदा त्या पुस्तकांत डोकं खुपसलेलं ! कधीं आईशीं निवातपणीं चार गोष्टी करशील–नांव कशाला ! त्यापरिस सून आण कशी मला आपली लौकर. मग तूं राहिलास निदान तुझ्या बायकोशीं तरी बोलण्यासवरण्यांत माझा वेळ जाईल. अन् तिची मला सोबत पण होईल. तूं असा सदान्कदा बाहेर जायचास न् घरांत मी आपली एकटी. शांता होती

त्यावेळीं नाहीं इतकं कांहीं वाटायचं. आतां तीहि गेली आपल्या घरीं...'

'हरदासाचं घोडं मूळ पदावर म्हणतात तें असं. बायकांचं आपलं कोणत्याहि विषयावर बोलणं निघो, त्याचा शेवट लग्नाच्या मुद्यावर व्हायचा!' नंतर किंचित् नाटकी आविर्भाव आणून तो पुढें बोलूं लागला—'आज आपला देश कोणत्या स्थितींत आहे, आपण कोणत्या स्थितींत आहों, साऱ्या पुढाऱ्यांचं लक्ष बाह्यपरिस्थितीकडे कसं लागून राहिलं आहे! आणि आमच्या आईसाहेबांचा आग्रह काय तर म्हणे मला सून आणा!'

'पुरे. पुरे. तुला बरी कोणतीहि गोष्ट थट्टेवारी नेतां येते ती. लग्नाची गोष्ट काढल्यावर तुझ्याकडून कधीं सरळ उत्तर येईल, नांव कशाला? सारखं मला आपलं कुणी ना कुणी विचारीत असतं—'आमची यमू करून घेतां का हो तुमच्या चन्द्रकान्तांना?' 'चन्द्रकान्तांचा विचार असला तर शकू आणूं का त्यांना दाखवायला?' म्हणून. पण तुझा आपला एक हेका—'माझ्या पसंतीची मुलगी जेव्हां मला आढळेल, तेव्हां मी एक क्षणाचाहि विलंब करणार नाहीं. तंवर मी कुणाचंहि ऐकणार नाहीं मला कुणाचीहि मुलगी पाहायची नाहीं!' तुला आपल्या पसंतीनं करायचं असलं तरी लौकर उरक बाबा.'

'लौकर न् उशीरा. एकदां माझ्या पसंतीप्रमाणं करायला संमति दिल्यावर माझी पसंती होईपर्यंत थांबायला नको का? माझी पसंती काय—कदाचित् यंदा होईल, कदाचित् पुढल्या वर्षीं होईल, कदाचित् अधिकहि थांबावं लागेल बाकी, तूंच मला माझ्या राशीचं त्या दिवाळी अंकांतलं भविष्य परवां वाचून दाखवलंसना कीं, अविवाहितांचे विवाह होतील—म्हणून? तुझा आहे ना भविष्यावर विश्वास? जसा ज्याचा विश्वास तसं त्याला फळ मिळतं म्हणतात अशा बाबतींत. तर यंदा माझ्या पसंतीला कुणीतरी उतरणार असं धरून चालायला हरकत नाहीं तुला.'

कां कुणास ठाऊक, पण हें बोलतांना हेमलतेची मूर्ति चन्द्रकान्ताच्या मनश्चक्षूंसमोर उभी राहिली खरी!

'तुझ्या तोंडांत साखऽर पडूं दे.' तांदळाचा डबा, ताट उचलून आंत जातां जातां सत्यभामाबाई उद्गारल्या.

अर्ध्याहून अधिक करडेपणाकडे वळलेले डोक्यावरील केस, कपाळावरील त्या वळ्या, निस्तेज डोळे, फिकुटलेली चर्या आणि अशक्तपणामुळें मंदावलेली चाल–अशा स्थितींतील आपल्या आईकडे पाहतांच, 'आपल्या मतांपायीं, आपल्या हट्टापायीं, एक प्रकारं आपल्या आईला आपण त्रासच देत नाहीं काय,' असा विचार क्षणमात्र चन्द्रकान्ताच्या अंतःकरणाला चाटून गेला. वाचनावरलें त्याचें लक्ष उडून मग त्याचे विचार त्या विषयाभोंवतींच फिरूं लागले. त्याची नजर समोर भिंतीवर टांगलेल्या एका जुन्या ग्रुप-फोटोकडे गेली. चन्द्रकान्त दोन–तीन वर्षांचा असतांना काढलेला फोटो होता तो ! त्या फोटोंत तो आईच्या कडेवर बसला होता. अर्थात् फोटो पाहणाराला 'हा चन्द्रकान्त बरं का' असें सांगितल्यावरच त्याची ओळख पटे. आणि त्याच्या आईमध्यें तर थोडा का बदल झाला होता ! फोटोंतील सत्यभामाबाईचा तो नितळ चेहरा, ठसठशीत नाकडोळे, नाकांतील ती नथ, काशीबोराच्या आकाराचें उभट गोल कुंकू, रसरशीत अंगकांति–काय शिल्लक होतें हल्लीं त्यांपैकीं ? नाहीं म्हणायला आपली नथ त्यांनीं आपल्या सुनेकरितां–अर्थात् चन्द्रकान्ताच्या भावी बायकोकरितां मोठ्या आस्थेवाईकपणें जपून ठेवली होती ! हल्लींच्या मुली नथ किती आवडीनें घालतात हें त्यांना ठाऊक का नव्हतें ? तरीपण त्यांच्या वेड्या मनानें ती गोळीबद पाणीदार मोत्यांची नथ मोठ्या अपूर्वाईनें जपून ठेवली होती खरी !

पन्नाशी उलटण्यापूर्वींच सत्यभामाबाईच्या शरिरावर वार्धक्यानें गाजवलेल्या अंमलाच्या बुडाशीं त्यांना सोसावे लागलेले आघातच होते. कृष्णाजीपंत हयात असतांनाहि त्यांचा सारा वेळ इनामदारांच्या जिंदगीचें संवर्धन करण्यांत जाई आणि साहजिकच त्यांचें घरादाराकडे दुर्लक्ष होई. मग प्रपंचशकट हांकण्याची जबाबदारी एकट्या सत्यभामाबाईच्या अंगावर पडे. पुढें कृष्णाजीपंत वारल्यावर तर काय–जिव्हाळ्याचे कुणीं नातेवाईक नाहींत, कुणाकडे चार दिवस विसाव्यासाठीं जावें म्हटलें तर घर नाहीं,

पदरीं तीन मुलें—अशा परिस्थितींत नेकीनें दिवस काढण्याची गोष्ट एक सत्यभामाबाईच करूं जाणोत ! अगदीं कृष्णाजीपंतांच्या पावलांवर पाऊल ठेवून त्यांनीं कुणाकडून फट म्हणून घेतलें नाहीं. दोघी मुलींचीं लग्नें करून दिलीं. दोघींनाहि घरें त्या मानानें बरीं मिळालीं. तरीपण गोदूताईच्या नवऱ्याचा स्वभाव थोडा तापट अन् एककल्ली असल्यामुळें त्याचें पाऊल क्वचित्च स्थिर राही. मालकाशी एवढ्यातेवढ्यावरून कुरबूर झाली कीं, डोक्यांत राख घालून ती नोकरी सोडून दुसरी शोधत बसायचें ! लगेच दुसरी नाहीं मिळाली तर बेकारींत दिवस काढायचे व मिळविलेली पुंजी खर्चून टाकायची. अशीच एकदां त्याची नोकरी सुटली असतां गोदूताईला आपल्या मुलांबाळासकट सत्यभामाबाईंनीं आपल्याकडे ठेवून घेतलें. जवळ जवळ तीनचार महिने गोदूताई त्यावेळीं त्यांच्याकडे राहिली होती. सध्यां ती पुण्याला असली तरी अजूनहि तिचें स्थिरस्थावर नसल्यानें तिच्याबद्दलची चिंता सत्यभामाबाईंना अजून सुटली नव्हती.

शांताचें लग्न होऊन ती सासरीं गेल्यावर त्यांना साहाजिकपणेंच चन्द्रकान्ताच्या लग्नाबद्दल उतावळी वाटूं लागली. आतांपर्यंत त्यांच्या हाताखालीं कुणी ना कुणी असे, विशेषतः अली-अलीकडे त्या जेव्हां अधिकच थकल्या तेव्हां तर शांताचा त्यांना मोठाच आधार वाटायचा. तिच्या लग्नाच्या वेळींच त्या चन्द्रकान्ताच्या मागें लागल्या होत्या. त्या कऱ्हाडच्या कुलकर्णी मास्तरांची मालू करून घेण्याबद्दल ! मराठी पांचसहा यत्ता झाल्या आहेत, शंभरजणींत उठून दिसणारी आहे. जोडा कसा लक्ष्मीनारायणासारखा शोभेल—सारें कांहीं वर्णन त्यांनीं केलें पण चन्द्रकान्तानें आपला हेका सोडला नाहीं. सत्यभामाबाईंची फार निराशा झाली.

आणि चन्द्रकान्ताचा तो हेका अजून कायम असल्यामुळें तेवढ्या बाबतींत मात्र त्या त्याच्यावर नाराज असतात. आणि वरचेवर संधि साधून त्याबाबत चन्द्रकान्ताच्या मागें त्या भुणभुण लावतात.

आजचा प्रसंगहि तशापैकींच होता.

काय असेल तें असो, जुन्या पद्धतप्रमाणें मुलगी पाहून लग्न करायची कल्पना चन्द्रकान्ताच्या मनाला बिलकुल पटत नसे. मग तें कथा काद-

बऱ्यांच्या यक्षसृष्टींत वावरल्यामुळें असो, कीं मनावरील काव्यमय वृत्तीच्या पगड्यामुळें असो, अथवा सुधारणावाद पटल्यामुळें असो. अगदीं अनोळखी मुलीला पांच दहा मिनिटें पहायची अन् पसंत किंवा नापसंत ठरवायची ! ही का जन्माचा जोडीदार निवडण्याची पद्धत म्हणायची का थट्टा म्हणायची ! असा विचार त्याच्या मनांत येई.

अगदीं एकदांच आपल्या एका मित्राच्या आग्रहाखातर त्याला वधू-परीक्षेसाठीं मदत करायला म्हणून अशा एका समारंभाला तो गेला होता. नियोजित वधू ही पांच सहा इयत्ता इंग्रजी शिकलेली व थोडी बहुत सभाधीट असल्याचीहि माहिती तिच्या पालकांकडून सांगण्यांत आली होती. पण आपणावर आज विशिष्ट हेतूनें इतके डोळे रोखले जाणार आहेत ह्या कल्पनेनें असो, कीं त्या प्रसंग महात्म्यामुळें असो, ती बैठकीवर आली तेव्हां अतिशय घाबरल्यासारखी दिसली आणि दोन तीन विचारलेल्या प्रश्नांना कशीबशी उत्तरें देऊन ती आंत निघून गेली. त्यावेळीं तिच्या सभाधीटपणाची माहिती सांगणारे पालक तर थिजलेच, पण आपण तिच्याशीं अमुक बाबतींत चर्चा करूं, तमुक विचारूं असे मनचे मांडे खाणारे वरमहाशय त्याहून अधिक थिजले !

ही कुचंबणा अन् हा फार्स पाहिल्यावर चन्द्रकांतानें मनोमन ठरविलें कीं, आपण ह्या पद्धतीला आजिबात फांटा द्यायचा !

अगदीं प्रेम-विवाह नच जमला तरी परस्परांच्या पूर्ण परिचयानंतर आपण विवाह करायचा. एकमेकांच्या आवडीनिवडी, एकमेकांचे स्वभाव मिळते-जुळते असले तरच ते विवाह सुखकर व्हायचे. परस्परांच्या मनांच्या मिळणीनंतर झालेली हातजुळवणी हेच खरे विवाह, असें त्याचें मत बनलें होतें. आपल्या सध्यांच्या समाजांत एवढी संधि जरी प्रत्येकाला मिळाली नाहीं तरी निदान विवाहापूर्वी वधूवरांचा परस्पर परिचय असावा, परस्परांच्या स्वभावांची व गुणावगुणांची ओझरती ओळख करून घेतलेली असावी, असें तो प्रतिपादन करीत असे.

पुण्या–मुंबईसारख्या शहरांत चन्द्रकान्ताला राहण्याची संधि मिळती तर त्याच्या विचारांना पोषक असें वातावरण तरी तेथें त्याला लाभलें

असतें. शाळा, कॉलेजें किंवा सभासंमेलनांच्या निमित्तानें तेथें तरुण तरुणी एकत्र येऊं शकतात, क्वचित् प्रसंगीं त्यांच्यांत परस्पर-परिचय, विचार विनिमय होण्याची शक्यता असते. पण लक्ष्मीनगर म्हणजे कारखान्यामुळें अस्तित्वांत आलेली कामगार वर्गाची एक वसाहत. 'काम, काम, आणि काम' हा एकच ध्वनि त्या वसाहतीवर सदा सर्वदा निनादित होत असे. किंबहुना त्यासाठींच वसाहतीनें शहरी जीवनापासून तुटकपणा, एकांतवास पत्करला होता !

अशा वातावरणांत चन्द्रकान्ताच्या उपरिनिर्दिष्ट विचारांची अवस्था रसिकांच्या अभावीं गवसणींत पडून राहिलेल्या वाद्यासारखी झाली असल्यास नवल नाहीं. तरीपण आपण ते सोडून द्यावेत अशी कल्पना त्याच्या मनाला शिवली नाहीं. छे ! त्याच्या निग्रही मनाच्या बाबतींत तें शक्य नव्हतें !

नंतर अलीकडेच त्याचा हेमलतेशीं अचानक परिचय घडून आला. तिच्या सौंदर्यानें तो मुग्ध झाला. दोघांचीहि काव्यविषयक समान अभिरुचि परस्परांच्या परिचय-वाढीला पोषक झाली. त्या अभिरुचीनें दोघांना वरचेवर एकत्र आणलें. चन्द्रकांताच्या गवसणींत पडलेल्या वाद्याची तार छेडली जाऊन गोड झंकार उठले. त्याच्या आशाबीजाला आतां अंकुर फुटले. लवकरच तो तराऊन फोफावेल, फळांफुलांनीं बहारून येईल, अशीं स्वप्नें तो पाहूं लागला. काय मनाच्या भराऱ्या ह्या ! एखाद्या व्यक्तिबद्दल आपल्या मनांत प्रेमोद्भव होणें आणि तें प्रेम सफल होणें यांत वास्तविक जमीन-अस्मानाचें अंतर असतें. पण प्रेमांत सांपडलेल्या माणसाच्या गणतींत हें अंतर कुठें असतें ? यामुळें तर प्रेमिकांना वेड्याच्या पंक्तींत बसविलेलें नाहीं ना ? कवि, प्रेमिक आणि तत्त्वज्ञानी ह्यांना वेड्याच्या मालिकेंत गुंफणाऱ्या उक्ती-प्रमाणें चन्द्रकान्त कवि तर होताच, पण आतां तो प्रेमांतहि सांपडला होता किंवा सांपडूं पहात होता !

आणि म्हणूनच कीं काय, सत्यभामाबाईनीं आज लग्नाचा विषय काढतांच त्याच्या दृष्टीसमोर हेमलतेची मोहक मूर्ति उभी राहिली व

एरवीं मोघम थट्टेवारी विषय नेणाऱ्या चन्द्रकान्तानें त्यांचें भविष्याच्या आधारावर तथाप्रकारें समाधान केलें.

× × ×

चन्द्रकान्त असा विचारांत गढून गेला असतांना बाबासाहेबांच्या बंगल्यावरचा गणू 'साहेब, साहेब' पुकारीत आला. आणि त्यानें चन्द्रकान्ताला निरोप सांगितला—'कलापूरच्या कॉलेजांतील कुणी आले आहेत, त्यांना आपल्याला भेटायचंय म्हणून ताईसाहेबांनीं आपल्याला लगोलग बोलावलं आहे.'

'बरं आलोंच, हो पुढं' असें त्याला सांगून चन्द्रकान्त आईकडे स्वैंपाक-घरांत गेला.

'बघ आई, मला म्हणाली होतीस ना मघां-तूं आज घरींच कसा—म्हणून? तर आलाच बघ निरोप बाबासाहेबांच्या बंगल्यावरून कीं, मला कुणी कॉलेजांतले भेटायला आलेत म्हणून. देवानं तुझं म्हणणं ऐकलं असावं बहुतेक.'

'तर, तर तेवढंच बोलणं बरं ऐकायला येतं देवाला न्‌ बाकीचं मात्र नाहीं कांहीं येत.'

'बरं. मी जाऊन येतों हं.'

'अरे चहा उतरलाय्‌ तेवढा घेऊन जा कीं.'

'बरं आण लौकर.'

चहा घेतल्यावर चन्द्रकान्त बाबासाहेबांच्या बंगल्याकडे गेला. तेथें हेमलता व नीटनेटका पोषाख केलेले दोन तरुण बोलत बसलेले त्याला दिसले. ते मराठी वाङ्मय—मंडळाचे चिटणीस असल्याचें त्याला समजलें. त्यांच्यापैकीं एकजण बोलूं लागला—'आमच्या मंडळातर्फे आपल्या काव्य-गायनाचा कार्यक्रम ठरविण्यासाठीं आम्हीं मुद्दाम आलों आहोंत. आपण इतके जवळ असून अद्याप आपला कार्यक्रम आमच्या कॉलेजांत होण्याचा योग आला नाहीं. ती संधि आम्ही मिळवायची ठरविली. हेमाताई आमच्या मंडळाच्या नवीनच सभासद झाल्या आहेत. त्यांच्या-जवळ सहज आम्ही ही गोष्ट बोललों, तेव्हां त्यांनीं तुम्हांला कबूल

करायला लावायची हमी घेतली. म्हणून आज आम्ही आलों आहोंत.'

चद्रकान्ताची नजर हेमलतेकडे गेली. तिच्या चर्येवर मिस्किल पण गोड हास्य विलसत होतें.

' इतकी कडेकोट नाकेबंदी केल्यावर मग कसला मी यांतून सुट-तोय ? ' चन्द्रकान्तानेंहि हंसत हंसत उत्तर दिलें.

' आपणाला केव्हां सवड होण्यासारखी आहे ? '

एकादा सुटीचा दिवस—शनिवार रविवार ठेवा. '

त्यांनीं विचार करून पुढला शनिवार निश्चित केला. हेमलतेला त्या दिवशीं एकच पीरिअड असल्यानें चन्द्रकान्ताला आपल्याबरोबर मोटारीं-तून नेण्याची व परत आणण्याची जबाबदारी तिच्यावर सोपविण्यांत आली. तिनेंहि ती आनंदानें पत्करली हें सांगायला नकोच.



## ११

# राजकारणाचें ' वेड '

टाळ्यांच्या कडकडाटांत आणि स्टँपिंगच्या दणदणाटांत आपलें काव्य-गायन संपवून चन्द्रकान्त खुर्चीवर बसला. त्याची नजर मुलींच्या बाजूला बसलेल्या हेमलतेकडे गेली. इतरांबरोबर तीहि टाळया वाजविण्यांत सामील झालेली त्याला दिसली. तिला झालेला आनंद तिच्या चर्येवरूनच दिसून येत होता. विद्यार्थ्यांची पांगापांग झाल्यावर ती चन्द्रकान्ताकडे गेली. चन्द्रकान्तानेंहि चिटणीसांचा निरोप घेतला आणि तो हेमलते-बरोबर चालूं लागला. ते दिसतांच ड्रायव्हर मोटार सुरू करण्याच्या पावित्र्यांत बसलेला पाहून चन्द्रकान्त हेमलतेला म्हणाला, ' आत्ता कुठं पांच वाजताहेत. आपण थोडं शहरांतून फिरून येऊं या की. मॉडर्न

बुकस्टॉलकडेहि मला जरा जायचंय. तशी कांहीं घाई नाहीं ना परतायची ?

'इश्श, घाई कसली ? मी तरी कुठं अजून इथं फार हिंडलेय ?'

'असं ना ? मग चला तर.' असें म्हणून चन्द्रकान्त चालूं लागला. आपण परत येईपर्यंत ड्रायव्हरास थांबण्यास सांगून हेमलताहि निघाली.

चन्द्रकान्ताचा वाचनाचा अन् चांगलीं पुस्तकें संग्रही ठेवण्याचा व्यास दांडगा होता. तो कलापूरला आला कीं, त्याची बुकस्टॉलकडे फेरी ही ठरलेली असायची. त्याप्रमाणें आजहि त्यानें तिकडे गेल्यावर नव्या प्रकाशनांपैकीं एका काव्य-संग्रहाची खरेदी केली व ते त्या दुकानाबाहेर पडले.

'आतां थांबलोंच आहोंत तर इथलं तळं पाहून येऊं या का ? बरंच नांव ऐकलंय त्याचं. मोटारीनं ठराविक रस्त्यानं यायचं न् ठराविक रस्त्यानं जायचं, त्यामुळं त्या भागाकडे जायला कांहीं अजून झालं नाहीं.' हेमलता म्हणाली.

'मग चला कीं. तसं कांहीं लांब नाहीं तें.'

बोलत बोलत ते तळ्याच्या रस्त्याला लागले. संध्याकाळची वेळ होत आली असल्याकारणानें तळ्याकडे तरुण-तरुणी गटागटानें फिरायला निघालेल्या दिसत होत्या. तरुणींच्या घोळक्यांतून हास्य-विनोदाबरोबर पातळांचे पदर सांवरणें व जाणाऱ्या येणारावर ओझरते दृष्टिक्षेप टाकण्याचें कार्य जसें चाललें होतें, तसें तरुणांच्या दृष्टीहि गप्पांबरोबर नवीन नवीन चेहरे धुंडाळण्यांत गढलेल्या होत्या. मधूनच एखादें जोडपें जाई तेव्हां दोन्ही पक्षांच्या कुतुहलाचा तें विषय होई. लवकरच ते तळ्याजवळ आले. तळ्याचा परिघ दीड दोन मैल तरी असावा. तो विस्तीर्ण जलाशय दगडी कठड्यांनीं मर्यादित करून सभोवार फिरण्यासाठीं सुंदर सडक तयार करण्यांत आली होती. कठड्याला रेलून समोरचा तो अफाट, संथ जलाशय पाहतांच हेमलतेचें मन प्रसन्न झालें. समोर तळ्याच्या कांठावर बांधलेल्या इमारतीची पाण्यांत पडलेलीं प्रतिबिंबें तर कशीं रेखीव दिसत होतीं ! अस्तास चाललेल्या सूर्याच्या किरणांनीं न्हाऊन विविध रंगांनीं नटलेले आकाशाच्या निळ्या पार्श्वभूमीवरील मेघ

सुंदर, कीं त्यांची पाण्याच्या हिरव्या पार्श्वभूमीवरील दिसणारीं प्रतिबिंबें अधिक सुंदर—याचा निर्णय तिच्या मनाला करतां येईना ! चन्द्रकान्ताचेंहि लक्ष ती शोभा पाहण्यांतच गुतलें आहे असें पाहून ती त्याला म्हणाली, ' किती सुंदर आहे हें दृश्य, नाहीं ? '

' जीवनानं आपल्या हृदयांत बाळगलेलीं हीं स्वप्नंच म्हणायचीं ! पण स्वप्नं कितीहि सुंदर असलीं तरी सत्यसृष्टींत त्यांचं काय मोल ? वास्तव जीवनापासून अलिप्त राहून स्वतःच्याच ध्येयसृष्टीशीं किंवा स्वप्नसृष्टीशीं म्हणा—रममाण होणाऱ्या माणसासारखीच ह्या तळ्याची वृत्ति वाटते मला. जोंवर हें तळ्याचं पाणी एखाद्या नदीला किंवा ओढयाला मिळून त्या जीवनप्रवाहाशीं समरस होत नाहीं तोंवर त्याचीं हीं स्वप्नं ! एकदा त्या खळखळाटांत सांपडल्यावर मग कसलीं आलीं आहेत स्वप्नं ! ध्येयवादी किंवा स्वप्नाळू माणसाच्या स्वप्नांचासुद्धां तो जेव्हां जगाच्या कोलाहलांत सांपडतो तेव्हां असाच चक्काचूर होतो. '

' मग तुमच्या दृष्टीनं स्वप्नांना महत्त्व नाहीं तर ? ' हेमलतेनें विचारलें.

'असंच कांहीं नाहीं म्हणतां येणार. पण ह्या दोन्ही स्वप्नांतलं सादृश्य एकदम मनांत आलं इतकंच. एका दृष्टीनं विचारवंतांचीं स्वप्नंच सत्यसृष्टीला आकार देत आलीं आहेत. गेल्या शतकांत मार्क्सनं जें स्वप्न पाहिलं तें चालू शतकांत सत्यसृष्टींत थोडंबहुत तरी उतरल्याचं आपणांला दिसून येतं. तरीसुद्धां अजूनहि कांहींजणांना हा मार्क्सवाद—'

'पुरे बाई तुमचे हे वाद. एखादं सुंदर दृश्य पाहात असतांना देखील तुम्हांला राजकारणाचा विसर कसा पडत नाहीं कीं ! कसं हो तुम्हांला राजकारणाचं इतकं वेड ? तुमच्यासारख्या काव्यवृत्तीच्या माणसाला खरं म्हटलं तर राजकारणाचं वावडं असायला हवं, पण तुम्हांला तर राजकारणाचा विषय निघाला कीं, आवेशच चढतो जसा कांहीं ! मी तर म्हणेन तुमच्यासारख्यांनीं निव्वळ काव्याला वाहून घ्यावं. राजकारणासारख्या अवांतर गोष्टींत तुम्हीं जो वेळ घालवतां तो तुम्हीं सुंदर सुंदर काव्यं लिहिण्यांत खर्चायला हवा. तुम्ही मराठी वाङ्मयाचं एका दृष्टीनं नुक-

वाढवल्यावर एखादं दीर्घ काव्य म्हणा, खंड काव्य म्हणा लिहून त्या पुऱ्या करायला नकोत कां ? राजकारण करायला काय कुणीहि मिळेल, पण तुमच्यासारख्या प्रतिभावंतांनीं जर आपलं क्षेत्र सोडलं—'

' तुमचं म्हणणं मला पटत नाहीं. हिंदुस्थानसारख्या मागासलेल्या देशांत जनतेला सज्ञान करणं हें खरं म्हटलं तर प्रत्येक सुशिक्षिताचं कर्तव्य आहे. विशेषतः आज आपण स्वतंत्र झाल्यावर तर या गोष्टीची फारच जरूरी आहे. आपल्या ह्या अफाट देशांत स्वातंत्र्य न् लोकशाही खऱ्या अर्थानं नांदायची असल्यास सामान्य लोकांचं अज्ञान न् धर्मभोळे-पणा शक्य तितक्या लौकर नाहींसा केला पाहिजे. आपल्यांतले दोष त्यांना पटवून दिले पाहिजेत. हें काम एकट्यादुकट्याचं नाहीं. सर्वांचं आहे, प्रत्येकाचं आहे. चीनबद्दल तुम्ही वाचलं असेल–तिथले विद्यार्थीसुद्धां शेतकऱ्यांतनं न् मजुरांतनं हिंडतात. त्यांना ज्ञानचक्षु देतात. ह्यांत समाजकारणाचा संबंध नाहीं, कीं राजकारणाचा नाहीं. हें एक नवसमाज-रचनेचं कार्य आहे. त्याला हातभार लावणं हें प्रत्येकाचं कर्तव्य आहे. माझ्यासारख्याची प्रतिभा वांया चालल्याचं तुम्हांला वाईट वाटतं, पण आज कितीतरी अज्ञात प्रतिभावंतांची प्रतिभा न् बुद्धिमंतांची बुद्धिमत्ता विषम समाजरचनेमुळं वांया जात असेल-त्याबद्दल किती हळहळ वाटा-यला हवी ! हा अन्याय, ही विषमता दूर करायला नको काय ? योग्य संधीच्या अभावीं मला स्वतःला माझ्या ज्या आशाआकांक्षांना पारखं व्हावं लागलं, त्या माझ्याहून कनिष्ठ बुद्धिमत्तेच्या मुलांना संधि मिळाल्या-मुळं–पैशाच्या अनुकूलतेमुळं–सफल करतां आल्या ह्या गोष्टींमुळं मला कांहींच विषाद वाटला नसेल ? ह्या स्वानुभवामुळंच कीं काय विषमता कुठंहि दिसली कीं माझ्या मनाला चटका बसतो. माझं चित्त भडकून उठतं......'

' मला तुमची तळमळ समजत का नाहीं ? पण मला आपलं वाटतं—का वाटतं कुणास ठाऊक, पण वाटतं खरं, कीं...' हेमलता बोलतां बोलतां तेवढ्यावरच थांबली.

तिच्या बोलण्यांतील स्निग्धतेनें चन्द्रकान्त कांहींसा विरघळला.

तो म्हणाला, ' तुमच्या इच्छेच्या मागील आपुलकीची भावना मला जाणवते. अशी जाणीव झाली कीं, मला कसं गुदमरल्यासारखं होतं. विद्यार्थीदशेपासून मी सुद्धां कांहीं स्वप्नं मनाशीं बाळगीत आलों आहें. कांहीं स्वप्नांचा वास्तव जगाशीं संबंध येतांच चूर झाला. मोठा कवि होण्याचंसुद्धां माझं एक स्वप्न आहे. आणखींहि माझीं कांहीं स्वप्नं आहेत. ' किंचित्काल थांबून तळ्याकडे पाहात तो पुन्हां बोलूं लागला, ' बाकी माणसांच्या स्वप्नांचं ह्या संथ तळ्यातील प्रतिबिंबाशीं असलेलं साम्य मला मोठं मजेशीर वाटतं. कांहीं वेळापूर्वी सायंकालीन आकाशाचीं विविधरंगीं प्रतिबिंबं धारण करणाऱ्या ह्या तळ्यात आतां चन्द्र व तारकांचा खेळ कसा सुरू झाला आहे पाहा. माणसांचीं स्वप्नं दिखील अशींच पालटत जातात !'

बोलण्याच्या नादांत सूर्यास्त होऊन पौर्णिमेच्या चंद्रानें आपल्या धवल ज्योत्स्नेचें संमोहनजाल स्थिरचरावर केव्हां पसरलें हें त्यांच्या ध्यानांतहि आलें नव्हतें. चंदेरी किरणांनीं तळ्यातील पाणी चमकत होतें. सारें वातावरण कसें सौम्य शीतल बनत चाललें होतें.

' चला जाऊं या. बराच वेळ बसलों आपण इथं ' असें म्हणून चन्द्रकान्त उठला. हेमलताहि उठून त्याच्याबरोबर चालूं लागली

' अशा ठिकाणीं कितीहि वेळ बसलं तरी उठावसंच वाटत नाहीं, नाहीं ! '

' हं. ' असें एकाक्षरी उत्तर देऊन चन्द्रकान्त मूक झाला.

तळ्याकडेच्या त्या अरुंद रस्त्यानें जातां जातां चन्द्रकान्ताच्या हाताला हेमलतेच्या हाताचा ओझरता स्पर्श झाला. चन्द्रकान्ताच्या अंगांतून एक विद्युल्लहर उठून गेली. हेमलतेनें अंग किंचित् शहारल्यासारखें केलें. ती थोडें अधिक अंतर ठेवून चालूं लागली. तो ओझरता स्पर्श-सुखाचा अनुभव पुन्हां यावा अशी हुरहूर मात्र दोघांच्याहि हृदयास लागली.

त्या गोड तंद्रीतच तीं दोघें चालत होतीं. चंद्र सुधा-सिंचन करून दोघांसहि न्हाऊं घालीत होता. मार्ग दाखवीत होता.

चालतां चालतां तीं एका बोलपट-गृहापाशीं आलीं. रस्त्यावरील दिवे

आज बंद असले तरी त्या इमारतीवर मात्र दीपावलीची आरास केली होती. बोलपटगृहाच्या व बोलपटाच्या नांवाच्या अक्षरांत दिवे बसविलेले होते. पटगृहासमोर प्रेक्षकांचा नुसता तांबा उडाला होता आणि त्यांनीं रस्ता जवळ जवळ बंद ठेवला होता म्हटलें तरी चालेल. बोलपट बराच लोकप्रिय असावा आणि तो नव्यानेंच सुरू झालेला असावा.

त्या गर्दीतून वाट काढीत असतां 'साहेब, साहेब' ह्या हांकेनें चन्द्रकान्ताचें लक्ष वेधून घेतलें. एका सुमारें दहा वर्षांच्या मुलानें त्याला हटकलें होतें. त्याची चर्या कमालीची दीनवाणी दिसत होती. अंगांतील निळ्या-काळ्या रेघांचा शर्ट खांद्यावर फाटला होता.

चन्द्रकान्तानें त्याच्याकडे पाहिल्यावर तो बोलू लागला,

' साहेब, कांहीं मदत करा. मी गरीब विद्यार्थी आहे. शाळेंत शिकतो आहे. वर्गांत माझा पहिला नंबर आहे.'

' तुझ्या घरीं कोण कोण आहे ? '

' माझी आई न् चार वर्षांची धाकटी बहीण. आम्ही तिघंच. दोन वर्षांपूर्वी वडील वारले. आई एके ठिकाणीं स्वैंपाकाला जाते. तेवढ्यावर भागत नाहीं म्हणून सिनेमाच्या वेळेला मी इथं येऊन उभा राहतो.'

चन्द्रकान्ताचें मन त्या हकीकतीनें द्रवलें.

' बघूं तें हातांत काय आहे ? ' त्यानें उगीचच विचारलें. हेडमास्तरांनीं दिलेलें शिफारस-पत्र घडी करून त्यानें हातांत धरलें होतें. तें त्यानें चन्द्रकान्ताकडे दिलें. चन्द्रकान्तानें तें उघडलें. त्या मुलाचें नांव विनायक दाभोळकर असें होतें. तो हुषार व अनाथ असून त्याला यथाशक्ति मदत करण्याबद्दल हेडमास्तरांनीं लिहिलें होतें.

चन्द्रकान्ताचें लक्ष मधून मधून त्या मुलाकडे वळत होतें. केविलवाण्या नजरेनें अन् आशेनें तो आपल्याकडे पाहात असल्याचें त्याला दिसून आलें. चन्द्रकान्ताच्या डोक्यांत काहूर उसळलें.

' बाळ, तुझ्यासारख्याला कितीहि मदत केली तरी अयोग्य वाटायची नाहीं. उलट ती करतां आली नाहीं, तर मात्र करंटेपण वाटेल.

सध्यां माझ्याजवळ एवढेच आहेत, ते घे. मी जेव्हां जेव्हां इथं येईन, तेव्हां मला भेटत जा. पहिला नंबर मात्र सोडायचा नाहीं बरं का!'

चन्द्रकान्तानें त्या मुलाचे हातावर अधेली ठेवल्याचें पाहातांच हेमलतेनें आपल्या पर्समधून एक रुपया काढून त्या मुलाला दिला.

मुलाच्या डोळयांत अश्रूंचा पाऊस भरून आला.

चन्द्रकान्ताच्या डोळयांच्या कडा ओलसर झाल्या.

चालतां चालतां चन्द्रकान्त बोलूं लागला, 'अशीं दृश्यं पाहिलीं म्हणजे मनामध्यें जी कालवाकालव होते—कांहीं सांगता येत नाहीं. मघाशीं समानसंधीबद्दल तुम्हांला मीं जें सांगितलं त्याचं 'प्रात्यक्षिक' म्हणूनच कीं काय हा प्रसंग घडल्यासारखा वाटतो. अशा दृश्यानं कुणाचं हृदय भरून येणार नाहीं? आणि अशा वेळीं सरकारचं शिक्षणासंबंधीचं धोरण पाहिलं कीं, जखमेवर मीठ चोळल्यासारखं वाटतं...' नंतर किंचित् थांबून तो म्हणाला, 'आणि तुम्हांला वाटतं कीं, मी केवळ काव्याचीच उपासना करावी. तुमच्या दृष्टीनं मी ह्या प्रसंगावर फार तर एखादं करुणरसपूर्ण काव्य रचलं कीं, झालं माझं काम. पण नुसतं काव्य लिहून न् हळहळ व्यक्त करून मला कसं समाधान वाटेल? उलट, ज्या समाजरचनेमुळं अशी दुरवस्था निर्माण झाली आहे, ती शक्य तितक्या लौकर बदलून टाकून नवी समाजरचना निर्माण करण्याचा मला ध्यास लागेल....'

हा वेळपर्यंत ते मोटारजवळ आले होते. म्हणून चन्द्रकान्तानें आपलें बोलणें आखडतें घेतलें. ज्या पिंपळाच्या झाडाखालीं मोटार उभी होती, त्याच्या फांद्या व पानांच्या सावल्यांनीं निर्माण केलेल्या मनोहर आकृतीनें हेमलतेचें लक्ष वेधून घेतलें. ती म्हणाली, 'हें पाहिलंत निसर्गाचं डिझाइन? काळया व पांढऱ्या ह्या दोन रंगांतच किती सुंदर आकृति उठवून दिली आहे पण!'

हेमलतेच्या कल्पकतेचें अन् सौंदर्यदृष्टीचेंहि चन्द्रकान्ताला कौतुक वाटलें. त्याच्या डोक्यांतील मघांचे विचार जाऊन तो कांहींशा प्रसन्नतेनें म्हणाला, 'खरंच कीं!'

हेमलता गाडींत चढल्यावर तिच्यानंतर चन्द्रकान्त बसतांना तिच्या दारावर असलेल्या हाताचा त्याच्या हाताला पुन्हां एकवार स्पर्श झाला. बेभानपणें तो त्यानें किंचित्काल तसाच राहूं दिला.

त्या सुखकर स्पर्शाच्या आठवणींत गढून गेलेल्या त्याच्या मनाला आपण लक्ष्मीनगरला केव्हां आलों हेंहि समजलें नाहीं !



# १२

# बहिणीच्या मायेचें ऊबदार पांघरूण

त्या वर्षी मराठी साहित्य संमेलन नाताळच्या अखेरीस पुण्याला भरणार होतें. चन्द्रकान्ताला या संमेलनास उपस्थित रहाण्याबद्दल खास निमंत्रण आलें होतें. ' प्रतिभे 'कडून मिळालेल्या पारितोषिकाचा वितरण समारंभ संमेलन-अध्यक्षांच्या करवीं होणार होता, हें तर त्याला उपस्थित राहण्याला एक कारण होतेंच. शिवाय त्या संमेलनांत ' सध्याचे कवितें-तील इष्ट व अनिष्ट प्रवाह ' या विषयावर एक परिसंवाद होणार होता, त्यांत आणि काव्यगायनाच्याहि कार्यक्रमांत चन्द्रकान्तानें भाग घ्यावा अशी संमेलन-चिटणीसांनीं त्याला आग्रहाची विनंति केली होती.

ह्यापूर्वी चन्द्रकान्त एक–दोनदां संमेलनाला हजर राहिला होता. पहिल्या खेपेस संमेलन पहाण्याचें कुतूहल म्हणून व दुसऱ्या खेपेस तें कलापूरलाच भरलें होतें म्हणून. त्यावेळीं चन्द्रकान्त कवि म्हणून हळू हळू उदयाला येत होता पण त्याच्या नांवाला अद्याप प्रसिद्धि मिळाली नव्हती. त्यामुळें त्यावेळची त्याची भूमिका जवळ जवळ प्रेक्षकाचीच होती. आतां तसें नव्हतें. आतां कवि म्हणून रसिकवर्गांत तो प्रिय

होऊं लागला होता. तेव्हां अशा कवीला संमेलन कार्यकर्ते वगळतील हें शक्यच नव्हतें.

चन्द्रकान्तानें चर्चेत भाग घेण्याचें ठरविलें. पण एवढ्या मोठ्या समुदायापुढें काव्यगायनाचें आपल्याला कसें काय जमेल याविषयीं तो साशंक होता. अशा समुदायापुढें काव्यगायन करायचें म्हणजे त्याला जी एक प्रकारची आवाजाची देणगी किंवा गायनाचे ढंग लागतात, त्यांचा तर त्याच्यापाशीं अभाव होता. म्हणून तो विचारांत पडला होता.

हेमलतेकडे गेल्यावर आपल्याला आलेलें निमंत्रण-पत्र चंद्रकान्तानें तिला दाखवलें. निमंत्रण-पत्र म्हणजे एकपरी त्याचा गौरवच वाटून तिला आनंद झाला. तिनें त्याला विचारलें,

' मग त्यांना 'संमतिदर्शक उत्तर लिहिणार ना ? '

' त्याचाच विचार करतों आहें. चर्चेत भाग घ्यायचं तर नक्की आहेच. पण काव्यगायनाचं काय करावं हें समजत नाहीं. काव्य-गायनाचा मला विशेषसा सराव नाहीं. अन् अशा मोठ्या संमेलनांतून तर अजिबातच नाहीं. बरं, अशा कार्यक्रमांत श्रोत्यांवर योग्य ती छाप पाडतां नाहीं आली तर तुमच्या काव्यांतील कल्पनेच्या साऱ्या भराऱ्या वाऱ्यावर जातात...'

' मग मी सुचवूं का एक कल्पना ? ' तिनें त्याच्याकडे स्निग्ध दृष्टीनें पाहात विचारलें.

' काय ! ' तो कांहीशा उत्सुकतेनें म्हणाला.

' तुमच्या कविता मी गाऊन दाखवल्या संमेलनांत तर ? अर्थात् कवीची खास परवानगी असेल तरच—'

' बा:, अशा बाबतींत कोण संमति देणार नाहीं ! '

हेमलतेनें आपल्या कविता संमेलनांत गाऊन दाखविण्याची इच्छा प्रदर्शित केल्यानें चन्द्रकान्ताला अतिशय आनंद झाला. अर्थात् त्या आनंदाचें स्वरूप द्विविध होतें. सुंदर कविता रसिक मनाला आनंद देतेच, पण तीच सुंदर चालींत गाइल्यास दुधांत साखर पडल्यासारखें होतें. चन्द्रकान्ताच्या आनंदाचें हें एक जसें कारण होतें, तसेंच हेमलतेच्या प्रा

इच्छेमुळें तिला आपल्याबद्दल वाटणारा जिव्हाळा तिनें या मार्गानें प्रगट केला—ही कल्पनाहि होती.

हेमलतेच्याहि मनांत साहित्य-संमेलनाचा सोहळा पाहण्याचें होतेंच. शिवाय जुन्या मैत्रिणींत पुन्हा जाऊन मिसळण्याची ही संधि ती कशाला दवडील ?

चन्द्रकान्त पुण्याला आपल्या बहिणीकडे—गोदूताईकडे उतरणार होता. गेल्या दिवाळीला तिला यायला न जमल्यानें तिची भेट झाली नव्हती. तिचीहि त्याला येऊन जाण्याबद्दल वरचेवर पत्रें येत होतींच.

हेमलतेनेंहि आपल्या मैत्रिणीला—सुलभा साठेला आपण येत असल्याचें कळवून टाकलें.

× × ×

चन्द्रकान्ताला पाहतांच गोदूताईच्या डोळ्यांत आनंदाश्रु चमकले. गेल्या दीड-दोन वर्षांत बहीण-भावंडांची भेट नव्हती. त्यामुळें बऱ्याच दिवसांत मनांत साठवून ठेवलेलीं हितगुजें बोलून दाखविण्याची संधि गोदूताईला प्राप्त झालेली होती. अशीं हितगुजें सांगण्यांतील अन ऐकण्यांतील गोडी एक बहीण-भावंडांनाच माहीत !

आपला चन्द्रकान्त दादा इथल्या संमेलनासाठीं आपल्याकडे येणार असल्याचें, तो कवि असल्याचें, आणि संमेलनांत त्याला शंभर रुपयांचें बक्षीस मिळणार असल्याचें गोदूताईनें आपल्या शेजाऱ्यापाजाऱ्यांजवळ मोठ्या अभिमानानें सांगितलें होतें. त्यामुळें गोदूताईच्या बिऱ्हाडीं पाहुणा आल्याचें समजतांच शेजाऱ्यापाजाऱ्यांचे डोळे दरवाजांतून, खिडक्यांतून गोदूताईच्या घराकडे लागले असल्यास नवल नाहीं. अर्थात् या कुतूहलांत ‘ कवि तो आहे कसा आनखी ’ हें जाणण्याच्या भावने-इतकीच कुणाकडेहि पाहुणा आल्यास तो कसा आहे, काय बोलतो हें जाणण्याची माणसाची स्वाभाविक जिज्ञासा देखील सामावलेली होती, हें सांगण्याची आवश्यकता नाहीं.

गोदूताई चुलीजवळ बसून चहा करीत होती. समोरच भिंतीला टेकून चन्द्रकान्त पाटावर बसला होता. गोदूताईच्या दोन मुलांपैकीं

थोरला चार वर्षांचा अनिल ' मामा, ' ' मामा ' करून चन्द्रकान्ताच्या गळ्यांत पडला होता, तर दोन वर्षांची बेबी त्याच्या मांडीवर निमूटपणें बसून होती. त्याच्यांतच तिला सुख-सर्वस्व लाभलें होतें कीं काय कुणास ठाऊक!

' अनिल, मामा दमून आलाय्. त्याच्या अंगाला असं झटूं नये बाळ. आतां चाऽऽर दिवस तो इथंच राह्यचा आहे. अन् बेब्या, तुला खाऊ हवा का ? मामानं बघ काय खाऊ आणलाय् तुझ्यासाठी तो. '

आईनें खाऊचें नांव काढतांच अनिलची मिठी सैल पडली आणि बेबीहि पावलें मोजीत जावें त्याप्रमाणें एक एक पाऊल टाकीत आईकडे गेली.

तिच्या त्या चालीकडे कौतुकानें पाहात असतां चन्द्रकान्त म्हणाला, ' बेबी आतां चालायला लागली कीं ! '

' लहान आहे का घोडी आतां ? येत्या वैशाखाला दुसरं सरून तिसरं वर्ष लागेल कीं तिला' जवळ आलेल्या बेबीला वात्सल्यभरानें ओढून घेऊन मांडीवर बसवीत आणि तिच्या गालाचा मुका घेत गोदूताई उत्तरली.

खाऊ मिळाल्यावर दोघेंहि पुन्हां मामाला येऊन चिकटलीं.

गोदूताईनें चन्द्रकान्ताच्याहि पुढें लाडवाची बशी ठेवली.

' वामनराव केव्हां येतात कामावरनं ? ' लाडवाचा तुकडा तोंडांत टाकीत चन्द्रकान्तानें विचारलें.

' त्यांचं काय, ते आधीं हपिसातनं मोकळे होतात सहा वाजतां. नंतर सायकलीवर इथं येईस्तवर पावणेसात होतात.'

' अन् सकाळीं केव्हां जावं लागतं ? '

'सकाळीं ते घरनं निघतात साडेदहा वाजतां. पण जेवायला दहाच्या आंत तयार असावं लागतं. हातावर पाणी पडल्या पडल्या लगेच निघायला हवं, जवळ का जायचं आहे ? चांगला चार मैल आहे मेला इथनं तो कारखाना. मग रोजची अशी त्रेधा—तिरपीट अन् धांदल उडते कीं सांगून सोय नाहीं. एक रविवारचा दिवस थोडा बरा असतो. उद्यां

शनवार ना ? उद्यां सुद्धां ते थोडे लौकर सुटतात, पण इथं येईस्तवर काय पांच वाजलेलेच असतात.'

खडकीच्या बाजूला नवीनच निघालेल्या एका बिस्किटांच्या कारखान्यांत बामनरावांना नोकरी होती. तिथें त्यांना कांहींतरी नव्वद का पंचाण्णव पगार मिळत असे.

चहाचा कार्यक्रम आटोपल्यावर बैठक बाहेरच्या खोलींत आली. एका चार साडेचार खणांच्या खोलीलाच प्लायवुडचें पार्टिशन घालून एक बैठकीची आणि मधली झोपायची व सामान-सुमानाची खोली असे तिचे दोन भाग केलेले दिसत होते. कसबा पेठेसारख्या जुनाट वस्तींतील तें घर. पण जागा माडीवरची अन् रस्त्यालगतची असल्यामुळेंच कीं काय, उजेडाच्या दृष्टीनें थोडी बरी होती. बैठकीच्या खोलींत सामानसुमान बेतांचेंच दिसत होतें. एक जुनें, पॉलिश केलेलें लहानसें टेबल, त्यावर अस्ताव्यस्तपणें रचून ठेवलेला पुस्तकांचा ढीग, मासिकांचें न् वर्तमानपत्रांचे अंक, तसेंच लांकडी पट्टयांच्या जाचांतून सुटलेला पाटीचा तुकडा. अंकलिपी न् तत्सदृश दुसरें कसलें तरी पुस्तक—हा सरंजाम बहुतेक अनिल महाशयाचा असावा. सुपारीची डबी, अडकित्ता, असें विविध साहित्य तेथें खेळीमेळीनें बावरत होतें. टेबलापुढें एक किर्लोस्करची लोखंडी खुर्ची. भिंतींना पूर्वी केव्हां गिलावा केला होता, तें त्या घरमालकांनाच माहीत ! त्याचें अस्तित्व सारवणाच्या पट्टयांतून दृग्गोचर होत होतें. एका खुंटीवर एक जुनाट दिसणारा कोट व दुसरीवर तसाच एक शर्ट अडकविला होता. आणखी एका खुंटीवर एक बिलोरी आरसा लोंबत होता. भिंतीवर दोन तीन कॅलेंडरें लटकवलेली दिसत होतीं. एका नटीच्या चित्राच्या कॅलेंडरवरील सर्व स्लिपा फाटून गेल्या होत्या. तें बहुधा त्या चित्रांसाठींच स्थानभ्रष्ट झालें नसावें. त्या साऱ्या मेळाव्यात एकच ग्रुप फोटो दिसत होता. 'चल बेबी, त्या फोटोंत कोण कोण आहे तें पाहूं आपण.' असें म्हणून तिला उचलून घेत चन्द्रकांत तिकडे गेला. वामनरावांच्या बिस्किट कारखान्याला कुणी भेट दिली असतांना त्याचा स्टाफसह घेतलेला फोटो

होता तो. गोदूताईनें फोटोवरून कारखान्यांतील कांहीं लोकांची चंद्रकांताला ओळख करून दिली.

नंतर चन्द्रकांताचें लक्ष रस्त्याच्या बाजूला भुईलगत असलेल्या खिडक्यांकडे गेलें. त्या खिडक्यांना लोखंडी गजांऐवजीं लांबलांब अंतरावर लांकडी पट्टया मारलेल्या होत्या. तें पाहिल्यावर चन्द्रकान्त म्हणाला, ' हें थोडं धोक्याचंच आहे, नाही ! बेबी कधीं तिकडे जात नाहीं का ? '

' तें कांहीं विचारूं नकोस बाबा. नवीन नवीन उभी राहायला शिकत होती तेव्हां माझा डोळा चुकवून अगदीं बेधडक खिडकीच्या दांड्याला धरून पाय नाचवत् न् बाहेर पाहात उभी राह्यची. एकदां असंच अनिलला तिच्यावर लक्ष ठेवायला सांगून मी कशाला तरी खालीं गेलें होतें. वर येऊन पाहातें तों पोरटी दांड्याला दोन्ही मुठींनीं घट्ट धरून मान बाहेर काढून वांकवांकून बघत होती. माझ्या काळजाचं पाणी पाणी झालं. मी मागनं हळूच जाऊन गप्पकन् धरलं म्हणून—'

' अन् अनिल काय करीत होता मग ? '

' मी तिला तिकडं जाऊं नको म्हणून अडवलं, तशी ती रडायला लागली. मग म्हटलं जा खुशाल—' अनिलनें आपली कैफियत सादर केली.

' वा अनिल, असंच संभाळतात वाटतं आपल्या बहिणीला ? तूं शहाणा ना ? '

' पण मामा, त्याच्यानंतर तिला मी कधीं तिकडं जाऊं दिलं का, विचारा आईला. ' आपल्या शहाणपणावर आलेला कलंक नाहींसा करण्यासाठींच जणूं अनिल म्हणाला.

अशा त्यांच्या गोष्टी चालल्या होत्या. आपल्या लाडक्या बेबीच्या न् अनिलच्या गोष्टी गोदूताईच्या तोंडून ऐकतांना चन्द्रकान्ताला जितका आनंद होत होता, तितकाच विषाद पुण्याची महागाई, रेशनिंग, अपुरा पगार यांची कहाणी ती सांगत असतांना त्याच्या चर्येवर दिसूं लागला. कारण बोलतां बोलतां तो विषय निघाला, तेव्हां गोदूताई सांगूं लागली.

' काय सांगूं दादा, महिना अखेर आली कीं इकडे अशी स्थिति होते कीं सांगून सोय नाहीं, शेवटचा आठवडा खिशांत जवळ जवळ पैसा नसतोच. पैसा नसला म्हणजे तोंडाला कसं अगदीं मुसक्या बांधल्यागत होतं. मग भाजी नाहीं. पाला नाहीं. शेवटच्या आठवड्याचं रेशनिंगसुद्धां चुकवावं लागतं. आधीं रेशनला मिळतं काय मेलं—त्यांतहि एखादा आठवडा बुडाला कीं झालंच—बरं, ह्यांचा स्वभाव म्हणजे असा कीं, घरीं उपाशीं बसतील पण कुणाला एक पैसा उसना मागायला म्हणून जायचे नाहींत. मग मीच त्यांना न सांगतां कुणाकडून तरी उसनवारी करतें न् वेळ भागवतें. बेव्याला भाताशिवाय चालत नाहीं. अनिलहि पहिल्या पहिल्यानं मिलोची भाकरी खातांना नाक डोळे मुरडायचा. हळूहळू संवय व्हायला लागलीयू त्याला आतांशी. तरी आम्ही दोघं दुपारीं नांवालाच भात घेतों. बरं, पोरांना दूध द्यावं म्हटलं तर तिकडून तरी कांहीं सोय आहे का ? रुपाया शेराचं दूध न् तेंहि पाण्यासारखं. तरी वीस—पंचवीस रुपये नुसते दुधाचे होतात महिन्याकांठीं. आणखी विशेष म्हणजे ह्यांना कसली संवय नाहीं, कसला अवांतर खर्च नाहीं. ह्यांना चहा मात्र लागतो दिवसांतून दोनदां न् सुटी असली तर कधींमधीं तिसऱ्यांदाहि होतो. पण बाकी कांहीं नाहीं. अनिल—पोरगं रोज नव्या नव्या सिनेमाच्या जाहिराती घेऊन माझ्यामागं लागतं ' सिनेमाला जाऊं या कीं ग आज—' म्हणून. पण चार—चार महिन्यांतनं एखादा खेळ पाहातों आम्ही...'

इतक्यांत दरवाजांतून सायकल आंत आणतांना होणारा खडखड असा ठराविक आवाज ऐकून गोदूताई म्हणाली, ' आले वाटतं हे. '

जिन्यांत पावलें वाजलीं. थोड्याच वेळांत वामनराव बैठकीच्या खोलींत आले.

' काय चन्द्रकान्त, कसा काय झाला प्रवास ? गर्दीबिर्दीचा कांहीं विशेषसा त्रास नाहीं ना झाला ? ' अंगांतील कोट टोपी काढून खुंटीवर अडकवितांना वामनराव म्हणाले.

' गर्दी रोजचीच. अन् ह्या नाताळामुळं तर अधिकच. तरी माझ्या-बरोबर आलेल्या हेमाताईंनीं नको नको म्हणत असतांहि दोघांची दुसऱ्या

बर्गाची तिकिटं काढलीं. त्यामुळं तितका कांहीं त्रास नाहीं जाणवला.'

'त्या इकडे नाहीं आल्या वाटतं ?'

'नाहीं. त्या परस्परच आपल्या मैत्रिणीकडे गेल्या, चहा घेऊन जा म्हटलं, तर पुन्हा येऊं म्हणाल्या त्या. त्यांची मैत्रीण तिकडे डेक्कन जिमखान्याजवळ कुठ राहते,'

'तुमचं संमेलन काय उद्यांपासून सुरू नाहीं का ?'

'हो. उद्यां न् परवां दोनच दिवस खरे महत्त्वाचे. सोमवारीं सकाळीं काय अध्यक्षांचा समारोपच. तुम्ही येणार ना कार्यक्रमाला ?'

'उद्यां कांहीं जमायचं नाहींच. येऊन जाऊन काय जमलं तर रविवारींच पाहूं. निदान तुमच्या कार्यक्रमापुरतं पाहूं जमलं तर.'

'दादा, मी मात्र येणार बरं का. तुमच्या प्रत्येक कार्यक्रमाला!' गोदूताई म्हणाली.

'तूं जात जा. नाहींतरी बहिणीच्या अभिमानाची सर मेहुण्याला थोडीच येणार आहे ?'

'नाहींच यायची!' असें म्हणून गोदूताई स्वैंपाकघराकडे गेली. नंतर वामनरावांचें चहापाणी होऊन मेहुण्या-मेहुण्यांच्या गप्पा सुरू झाल्या. बाहेर लक्ष्मीनगर संबंधीं गप्पागोष्टी चालू असतां आंतून अनिलचा 'मी मामांच्याबरोबर बसणार जेवायला' असा हट्ट सुरू झालेला चन्द्रकान्ताच्या कानांवर आला.

'तूं लौकर झोपतोस. त्यांच्या वेळपर्यंत जागा राह्यचा नाहींस. तर जेवून घे कसा. उद्यां सकाळीं बस मामांच्या पंक्तीला!' गोदूताईच्या ह्या समजावणीनें तो वळलेला दिसला नाहीं. तेव्हां चन्द्रकान्त आंत येत म्हणाला, 'काय, अनिलराया काय म्हणतोय ?'

'काय म्हणायचाय ? त्याला तुझ्या पंक्तीला जेवायला बसायचंय्!

'एवढंच ना ? ताई, आपली सुद्धां जेवणं आज आपण लौकरच उरकून घेऊं या. आज आपण सगळेच सिनेमाला जाऊं. अनिल, तूं येणार ना सिनेमाला आमच्या बरोबर ? तर आटप पाहूं आपलं जेवण भरभर. बघूं आधीं कोण आटपतंय्—तूं का बेबी!'

सिनेमाचें नांव काढतांच अनिलचा आनंद काय विचारतां ! त्यानें आईची अट एकदम मान्य केली. त्याचा आनंद व त्याचे ते हातवारे पाहून बेबीनेंहि त्याच्याप्रमाणें उगीचच हात नाचवायला सुरवात केली.

सर्वांचीं जेवणें उरकल्यावर गोदूताई, अनिल, बेबीच्या पोषाखांत गुंतली असतां चन्द्रकान्त तिला म्हणाला, ' हं ताई—त्यांच्या कपड्यांचं मी बघतों. तुझं काय पातळ बदलणं वगैरे असेल तें लौकर उरक. बायकांचा जामानिमा व्हायलाच वेळ लागतो ! '

चन्द्रकान्त हें वास्तविक सहजच म्हणाला. पण त्यामुळें गोदूताईच्या चेहऱ्यावर किंचित् खिन्नतेची छटा पसरून ती म्हणाली,

' पातळ-बितळ मी आतां कांहीं बदलत नाहीं. मी अशीच निघणार. तुम्हीच कपडे करा जा, तंवर मुलांचं मी उरकतें !'

गोदूताई हें बोलत असतांना चन्द्रकान्ताचें लक्ष तिच्या पातळाकडे गेलें. तें पातळ इतकें साधें व कळाहीन होण्याच्या बेताला आलेलें दिसत होतें कीं, दुसऱ्या कुणी बाहेर जातांना तें नक्कीच बदललें असतें. असें असतां गोदूताई तें बदलायचें नाहीं म्हणते याचा अर्थ काय? याचा अर्थ तिच्या खिन्न मुद्रेवरून त्याच्या लक्षांत यायला वेळ लागला नाहीं !

विषादपूर्ण अंतःकरणानें चन्द्रकान्त बाहेर आला आणि त्यानें कपडे केले.

सिनेमाहून परत आल्यावर गोदूताईनें चन्द्रकान्ताला गादी घालून दिली व कांबळ्याला चादर जोडून पांघरण्यासाठीं पायथ्याला ठेवून दिली. वामनरावांच्याकरितां सतरंजीवर धोतर अंथरून त्यांना पांघरण्या-साठीं एक चादर ठेवली. आतां स्वतःसाठीं काय अंथरावें ह्या संभ्रमांत ती पडलेली पाहून चन्द्रकान्त तिला म्हणाला, ' मला पांघरायला नुसती चादर पुरेल. तूं तें कांबळें घे ताई. फार झालं तर माझं धुतलेलं धोतर त्या चादरीला जोडायला दे म्हणजे झालं. '

' अरे बाबा, इथं थंडी फार असते. तेवढ्यानं नाहीं भागायचं. '

' असूं दे. भागतंय्. शिवाय माझ्या अंगांत गरम स्वेटर आहेच कीं. ' चन्द्रकान्त इतकें म्हणाल्यावर गोदूताईनें कांबळें स्वतःला पांघरायला नेलें.

पण पहांटे चन्द्रकान्त जागा होऊन पाहातों तों त्याच्या अंगावर तें ऊबदार कांबळें टाकलेलें व पुढ्यांत अनिलला झोपवलेलें त्याला दिसून आलें. तो पाणी पिण्यासाठीं उठला तर गोदूताई दुपट्यासारखें कांहींतरी अंथरून आणि धुतलेल्या पातळाची घडी पांघरून झोपलेली त्याला आढळली !

त्याच्या मनांत आलें—बहीण असावी तर अशी ! धाकटी बहीण म्हणवते, पण आपल्या मायेचं ऊबदार पांघरूण थोरल्या भावावर घालते.

× × ×

रविवार सकाळची गोष्ट. चन्द्रकान्त नळावरून तोंड धुऊन येत होता. त्यावेळीं त्याच्या कानावर खालील संवाद पडला.

'दादा परवाचे दिवशीं जायचं म्हणतो, तर उद्यां कांहींतरी करूंया काय ?'

' पण आतां तारीख किती लक्षांत आहे ना ? माझ्याजवळ ×× कुठं आहे ? ' पैशाचा उल्लेख त्यांनीं खुणेनेंच केला असावा.

नंतर चन्द्रकान्त आंत आल्यावर जणूं काय आपण त्यांचें बोलणें ऐकलेंच नाहीं अशा आविर्भावांत म्हणाला, ' ताई, उद्यां आपण मेजवानीचा बेत करूं या. हेमालाहि बोलवूंया जेवायला. माझ्या बक्षिसा-बद्दलची मेजवानी. '

' वा:, तूं जाणार म्हणून आम्हीच उद्यां कांहीं करण्याच्या विचारांत होतों न् तुझं काय हें भलतंच मध्यें ! '

' भलतंच कसलं आलंय् ! तुम्ही कांहीं येणार नाहीं लक्ष्मीनगरला लौकर. म्हणून इथंच देतों तुम्हांला मेजवानी. यांत भलतंच काय मला समजत नाहीं. '

अखेर चन्द्रकान्ताच्या म्हणण्याला सर्वानुमतें मान्यता मिळाली.

ठरल्याप्रमाणें चन्द्रकान्त संमेलनाला जातांना गोदूताई त्याच्याबरोबर जात असे. तेथेंच त्यानें हेमलतेशीं गोदूताईची ओळख करून दिली. नंतर ती संमेलनांत हेमलतेबरोबर राहूं लागली. अध्यक्षांच्या हस्तें चन्द्र-कान्ताला बक्षीस मिळतांना पाहून व खुद्द त्यांच्या तोंडून त्याचा गौरव ऐकून गोदूताईला आनंदाचें भरतें आलें.

—•— —•— —•—

## १३

# मूक स्पर्श-संगीत

आज हेमलता व चन्द्रकान्त हीं दोघेंच फिरायला बाहेर पडलीं होतीं. पाच वाजून गेलेले होते. गोदूताईच्या पाठीमागें स्वैपाक असल्यामुळें व गेले दोन दिवस ती कार्यक्रमाच्या निमित्तानें त्याच्याबरोबर बाहेरबाहेरच असल्यामुळें तिनें आपण होऊनच आज बाहेर येण्यास नकार दिला होता. चन्द्रकान्तानें ठरल्याप्रमाणें मेजवानीच्या बेताची तयारी केली होती. पण तो कार्यक्रम सकाळीं न करतां निवांतपणें संध्याकाळीं करावा, म्हणजे कुणाचीच धांदल उडणार नाहीं, असें त्यानें सुचविलें होतें. हेमलताहि जेवायला येणार होती. त्या स्वैपाकासाठीच गोदूताई घरीं राहिली होती. हेमलतेनें मदतीसाठीं थांबण्याची इच्छा दर्शविली तेव्हां 'कशाला हो ! इतका कसला स्वैपाक आहे ? तुम्ही या जा हिंडून' असें गोदूताईनें तिला अडविलें.

शनवारवाडा मागें पडला व तीं नव्या पुलावर आलीं. तरी दोघेंहि जवळजवळ निस्तब्धच चाललीं होतीं म्हटलें तरी चालेल. चन्द्रकान्ताची चर्या आज हेमलतेला विशेषच प्रफुल्लित दिसत होती, व त्याच्या मुद्रेवरील वरचेवर बदलणाऱ्या हावभावावरून त्याचें मन संमेलनांतील आनंददायक आठवणींची उजळणी करण्यांत गढून गेलें असावें असा तिनें तर्क केला; आणि म्हणून आपल्या बोलण्यानें त्या गोड तंद्रींतून त्याला जागें करण्याचें तिनें टाळलें.

आणि हेमलतेचा तर्क खराच होता. तो हेमलतेबरोबर चालत होता तरी त्याचें मन संमेलनांतील कांहीं प्रसंगांभोंवतींच घोटाळत होतें.

अध्यक्षांच्या करवीं पारितोषिक घेण्याचा तो प्रसंग. त्यावेळीं त्याच्या काव्यावर झालेलीं दोन-तीन वक्त्यांचीं भाषणें. त्या वक्त्यांपैकीं एकजण

तर वाङ्मयातील मार्मिक टीकाकार म्हणून प्रसिद्ध होते. त्यांचीं पुढील वाक्यें आतांहि त्याच्या अंतर्मनाला ऐकायला येत होतीं.

'चन्द्रकान्तांच्या कवितेच्या स्वरूपाकडे पाहिलं म्हणजे मराठी काव्याच्या भवितव्याबद्दल आशा वाटूं लागते.' 'मराठी काव्याला ओहोटी लागली आहे काय? ' असा मध्यंतरीं संशय वाटूं लागला होता. पण तो काळ आतां मागें दडून मराठी काव्यसरितेला वर्षाकालीन पूर येऊं लागल्याचं सुचिन्ह स्पष्ट दिसत आहे. नदीच्या मूळ प्रवाहाला लहानमोठे अनेक प्रवाह मिळून तो पुष्ट बनतो, सकस बनतो. आधुनिक काव्यसरितेला पुष्टि देणारा असा एक प्रवाह चन्द्रकान्तांनीं खास आणून सोडलेला आहे. अर्थात् पावसाळीं पुराबरोबर कांहीं घाण पाण्याचे ओघळहि त्याला येऊन मिळावेत आणि मूळ प्रवाहाला त्यामुळं मलिनत्व यावं असाहि प्रकार सध्यां आपणाला कुठं कुठं पाहायला मिळत आहे. पण तूर्त आप-णांला त्याविषयीं कांहीं कर्तव्य नाहीं...तर चन्द्रकान्तांना आज मिळालेलं हें यश त्यांच्या भावी यशोमंदिराचा पाया ठरो व त्यांच्या उज्ज्वल भवितव्याबरोबर भाषा–सुंदरीचेंहि भवितव्य उजळून निघो अशी आशा व्यक्त करतों. '

त्यानंतर पारितोषिक घेतेवेळीं आणि उत्तरादाखल चार शब्द बोल-ण्यासाठीं तो उभा राहिल्यावेळीं श्रोत्यांनीं केलेला टाळ्यांचा कडकडाट आणि गोदूताई व हेमलता ह्यांनीं आपल्या नेत्रांच्या द्वारें केलेली पंचारती त्याला आठवली. क्षणमात्र त्याचें हृदय भरून येऊन त्यावेळीं त्याच्या तोंडांतून शब्द फुटेना, नंतर तो कसाबसा बोलूं लागला. 'माझ्यासारख्या एका सामान्य, एका कोपऱ्यांत राहणाऱ्या शारदोपासकाचं आपण केलेलं हें कोडकौतुक पाहिलं म्हणजे वाणी कुंठित होते. अप्रत्यक्षतः हा त्या शारदेचाच गौरव आहे असं मी समजतों आणि म्हणूनच कीं काय ती मुग्ध होऊन शब्दद्वारें प्रगटण्यास असमर्थ बनली आहे. आजच्या ह्या समारंभांत गौरवापेक्षां प्रोत्साहनाचाच भाग अधिक असावा असं मला वाटतं. ह्या प्रोत्साहनानं उत्तेजित होऊन आपण व्यक्तविलेल्या आशा अंशतः तरी पुऱ्या करण्यासाठीं मी यत्न करीन असं आश्वासन देतों.'

अशा आठवणींत तो गुंग असतां त्याचें लक्ष सहजच अस्तगिरीकडे बुडावयास टेकलेल्या सूर्याकडे गेलें. त्याच्या किरणांतील दाहक तेज लोप पावून तीं सौम्यपणानें आतां स्थिर-चरांना कुरवाळूं लागलीं होतीं. ज्या ज्या वस्तूंना त्यांचा स्पर्श घडे, त्या त्या वस्तूंवर मोहक अशी सौम्य तांबूस झूव चढत होती. चन्द्रकान्ताचें लक्ष रविरायाच्या त्या कारागिरीनें वेधून घेतलें. त्यानें हेमलतेकडे पाहिलें. तिच्या गौर मुखमंडलावर तांबूस छटा उठवून त्या किरणांनीं त्याला अपूर्व शोभा आणली होती. फिरावयास निघालेल्या तरुण तरुणी, झाडांचे शेंडे, उंच उंच इमारतींचे वरचे भाग, आकाशांत विहरणारे तुरळक ढग, यच्चयावत् गोष्टींवर क्रमाक्रमानें तांबूस छटा चढवत जाऊन अखेर सूर्य पश्चिमेच्या दाराआड झाला होता. आतां पश्चिमेनें सूर्याच्या आगमनाप्रीत्यर्थ आपल्या अंगणांत जो केशरी डाळिंबी रंगाचा सडा घातला होता त्याकडे चन्द्रकान्त मंत्रमुग्ध होऊन पाहूं लागला.

फार दूर न जातां पुलापलीकडे असलेल्या बागेंतच बसायचें ठरवून तिकडे चालू लागल्यावर चन्द्रकांत हेमलतेला म्हणाला, ' मला तर हीं सारीं दृश्यं प्रीतीच्या प्रभावाचींच द्योतक वाटतात. रविरायाच्या या जादुगिरीकडे पाहतां पाहतां मनांत कल्पना आली कीं, आपली प्रीतिदेवता जी पश्चिमा तिच्या मंदिराजवळ आल्यानं तर तो आपली दाहकता विसरला नसेल? त्याच्या अंतरांतील प्रीति दाटून येऊन, अनावर झालेली प्रीति तर बाहेर उसळून स्थिरचरावर सांडली नसेल? आणि त्यानंच तर त्यांच्यावरहि सौम्य प्रीतिरंगाचा मुलामा चढला नसेल? अथवा असंहि वाटतं कीं, तो स्वतः प्रीतिदेवतेच्या मंदिराकडे निघाला असल्यानं ' तुम्हीहि माझ्याप्रमाणंच प्रीतिरंगांत न्हाऊन जा ' हा संदेश स्थिरचरांना देण्यासाठीं स्वतःच्या हृदयांतील प्रीतिरंग त्यानं सहेतुकच तर त्यांच्यावर फेकले नसतील? दिवसभर जनसेवेचं कठोर व्रत आचरणाऱ्या सूर्याच्या अंतरंगांतहि इतके कोमल भाव असतील, अशी कुणाला कल्पना तरी येईल काय?'

चन्द्रकांत हें बोलत असतांना त्याच्यावर एकदोन वेळां कौतुक-

मिश्रित ओझरते दृष्टिरात करून हेमलता बागेकडे पाहात मूकपणानें चालत होती. बागेचा विस्तार बराच मोठा असून झाडाझुडपांच्या सुंदर तऱ्हेच्या कापणीवरून तिची निगाहि चांगली ठेवल्याचें दिसून येत होतें. पाऊल बाटेच्या दोन्ही बाजूंला अंतर्भागांत वर्तुळाकार, चतुष्कोनी, त्रिकोनी अशीं आळीं करून त्यांत विविध प्रकारचीं फुलझाडें लावलेलीं होतीं व मोकळ्या जागेंत लोकांना बसण्यासाठीं बांक टाकलेले होते. संध्याकाळची वेळ झाल्यानें बागेंतील रहदारी वाढूं लागलेली होती. बसण्यासाठीं निवांत जागा शोधतां शोधतां तीं बागेच्या मध्यभागीं असलेल्या कारंजा-जवळ आलीं. एखाद्या भुईनळ्यांतून प्रकाशाचे फवारे बाहेर पडावेत त्याप्रमाणें त्या कारंजांतून पाण्याचे फवारे उडत होते. तेथून जवळच असलेला एक मोकळा बांक पाहून ते तिकडे वळले.

खिशांतील रुमालानें बसायची जागा झटकून तेथें बसल्यावर चन्द्रकान्त म्हणाला, ' बाकी तुमचं कालचं काव्यगायन फार सुंदर झालं हं. तुम्ही प्रत्येक कविता इतकी समरसून म्हणत होतां म्हणूनच मला वाटतं, तुमच्या प्रत्येक कवितेला टाळ्या पडल्या.'

' वा; पण त्याचं सारंच श्रेय कांहीं माझं नाहीं बरं का. कवीलाच त्यातला बराचसा वांटा द्यायला हवा! मूळ तुमच्या कवितेंतच इतके गुण नसते तर ती श्रोत्यांना आवडली असती काय ? माझ्याऐवजीं ती कुणीहि म्हटली असती तरी—'

' मला नाहीं तसं वाटत. कवीच्या भूमिकेशीं तादात्म्य पावणं साऱ्यांनाच जमेल असं नाहीं. म्हणूनच कालच्या श्रेयाचा बराचसा वांटा तुमच्याकडेच येतो. '

नंतर कांहीं वेळ चन्द्रकान्त स्तब्ध बसला. पण त्याच्या चर्येवर दिसणाऱ्या चलबिचलीवरून त्याच्या अंतरंगांत बरीच खळबळ चालली असावी व ती कशी व्यक्त करावी या विचारांत तो गुंग असल्यासारखा दिसत होता. मग एका फुलांच्या ताटव्याकडे पाहतां पाहतां तो बोलूं लागला, ' दोन तीन महिन्यांपूर्वी तुमचा माझा परिचय होईल न् तुम्ही माझ्या कविता संमेलनांत गाऊन दाखवाल असं मला कुणी म्हटलं असतं

तर मला तें खरं वाटलं नसतं. माणसांचे संबंध किती योगायोगानं जमतात! तुमच्या चुलत्यांची बदली झाली नसती तर कदाचित् तुम्ही लक्ष्मी-नगरला आलांहि नसतां. मग तुमची माझी भेट कुठली न् परिचय तरी कुठला ? परिचय झाल्यावरहि तो तुम्ही वाढूं दिला. माझ्याबद्दल तुम्हांला आपलेपणा वाटूं लागला. माझ्या काव्याचं तुम्हीं कौतुक केलंत. माझ्याबद्दल तुम्हाला अभिमान वाटूं लागला न् माझ्याबरोबर संमेलनाला येऊन तुम्ही माझ्या कविता गाऊन दाखवल्या. माझ्या यशाचे एकपरी वाटेकरी झालांत. सारं कसं एखाद्या स्वप्नासारखं अकल्पित, आकस्मिक वाटतं. स्वप्नमुद्धां गोड असल्याचा आजवर मला कधीं अनुभव आला नव्हता. स्वप्नसाफल्यापेक्षां तीं चूर होण्याचींच दृश्यं मी आजवर पाहात आलों. पण तुमच्या दृष्टींत माझ्याबद्दलचा जिव्हाळा दिसून आल्यावर माझं एक तरी स्वप्न खरं ठरेल अशी आशा मनाला वाटूं लागली. तें उल्हसित झालं. कल्पनेंतलं स्वप्न साकार करण्यांत तें रमून जाऊं लागलं. हेमा, हेमलता–खरंच तें साकार होईल का ? आजवर जशी तूं मला साथ दिलीस तशीच पुढं कायमची देशील का ? '

चन्द्रकान्ताच्या स्वरांत हळुवारपणा आला होता. त्याच्या नजरेंत प्रीतीची आर्द्रता दाटून आली होती. हेमलतेला ती चाटून गेली.

तिनें आपल्या नेत्रांनींच उत्तर दिलें. तिचेंहि हृदय चन्द्रकान्ताच्या त्या बोलण्यानें भारावून आल्यासारखें झालें होतें. तिचे ते भावदर्शी डोळे जणूं म्हणत होते—

' चन्द्रकान्त, तुमच्यासारख्यांच्या प्रीतीस पात्र होण्यासारखं दुसरं कुठलं भाग्य असेल का ? तें भाग्य तुम्ही मला देऊं करताहांत, यांत तुमचंच मोठेंपण नाहीं का ?....'

पण तेवढ्यानें समाधान न होऊनच कीं काय, तिचा थरथरता हात आपल्या हातांत धरून तो हळुवारपणें दाबीत चन्द्रकान्त म्हणाला, ' सांग, हेमलता सांग, आहे तुझी संमति ? '

तिनें होकारार्थी किंचित् मान हालवली.

नंतर कितीतरी वेळ तसाच हातांत हात ठेवून तीं दोघें मूकपणानें स्पर्शसंगीतांतलें सुख अनुभवीत बसलीं होतीं!

तिकडे अंधार धरेला आपल्या बाहुपाशांत अधिकाअधिक कवळून धरूं लागला होता.

त्यांच्या मीलनाकडे आकाशांतील तारका डोळे मिचकावून पाहात होत्या!

× × ×

रात्रीं सर्वजण जेवावयास बसले होते. गोदूताईनेंहि चन्द्रकान्ताच्या आग्रहाखातर आपलें पान त्यांच्याबरोबरच वाढून घेतलें होतें. हंसत खेळत जेवण चाललें होतें. कशावरून तरी चन्द्रकान्ताच्या विवाहाचा विषय निघाला.

गोदूताई म्हणाली, 'खरंच दादा, हें सारं ठीक झालं. पण आतां मला एकदां वहिनी आण कीं लौकर. तुझी ही चालढकल कुठवर चालायची? आई आतां विचारी एकटी. तिलाहि सोबत होईल बरं कां, हेमाताई आमच्या दादाचा एक विचित्रच हट्ट! काय तर म्हणे, माझ्या पसंतीची मुलगी माझ्या आढळांत येईल तेव्हां मी लग्न करणार. तंवर बाकी कुणी त्याच्या लग्नाबद्दल अवाक्षर काढायचं नाहीं काय म्हणायचं असल्या हट्टाला? आतां ह्याच्या पसंतीची मुलगी ह्याला केव्हां भेटतेय् यासाठीं साऱ्यांनीं तिष्ठतच बसायला हवं कीं नाहीं?'

हेमलतेनें चन्द्रकान्ताकडे पाहून किंचित् स्मित दर्शविलें '

'कवि म्हटला कीं त्याच्या कांहीं लहरी ह्या असायच्याच. आमच्या ह्या कवीची ही तसलीच एक लहर म्हणावी झालं.' वामनराव

'काय दादा, केव्हां सांपडायची तुझ्या पसंतीची मुलगी तुला? किती दिवस तिष्ठत बसवणार असंच तू आम्हांला?

'मी तरी कसं सांगूं तुला तें, ताई! बाकी ती मुलगीहि मोठी मिस्किल दिसतेय बरं का. कुठं लपून बसली आहे कुणास ठाऊक! आतां आमच्या आईची न् ताईची अधीरता पाहून ती केव्हां प्रकट

होईल, ती होवो!' चन्द्रकान्तानें हेमलतेकडे कटाक्ष टाकीत हंसत हंसत उत्तर दिलें.

'तुला आतां सारीच थट्टा वाटतेय् खरी. पण अशा चिकित्सेखोर-पणानं वाट पाहात बसलास तर अप्सरेऐवजीं एखादी घोरपड गळ्यांत बांधून घ्यायची पाळी येईल अखेरला म्हणजे झालं. नाहींतरी असंच फार होतं. म्हणून सांगतें—फार चिकित्सा करूं नये.'

अशा थट्टा मस्करींत जेवण उरकलें.

गोदूताईनें काढलेल्या विषयाचा समारोप जरी असा थट्टेत झाला होता, तरी हेमलता व चन्द्रकान्त यांचें परस्परांतील बोलणें-चालणें, नेत्र-पल्लवी पाहिल्यावर तिच्या उगीचच मनांत आलें—'खरंच आपल्या दादाला हेमलतेसारखी बायको मिळाली तर—! किती लाघवी आहे नाहीं ती! आणि दादाबद्दल आपलेपणा तरी किती दाखवते! पण काय कुणास ठाऊक! कांहीं समजत नाहीं!'

× × ×

अखेर चन्द्रकान्ताच्या जाण्याचा दिवस आला.

गोदूताई सकाळीं लौकर उठली. चन्द्रकान्ताच्या जाण्याच्या कल्पनेनें तिच्या मनाला विलक्षण हुरहूर वाटूं लागली. तीन—चार दिवस कसे मजेंत गेले होते. अनिल-बेबीलासुद्धां चन्द्रकान्ताचा किती लळा लागला होता! गोदूताई चन्द्रकान्ताला म्हणालीसुद्धां—

'असं काय रे दादा, अगदीं घोड्यावरनं आल्यासारखा येतोस न् जातोस? पुरते चार दिवससुद्धां राहायचं नाहीं याला काय म्हणावं! तूं होतास तर तीन चार दिवस कसे भुर्रदिशीं निघून गेले तूं गेल्यावर चार आठ दिवस करमायचं दिखील नाहीं या घरांत! काल तुम्ही अनिलला ठेवून फिरायला गेलांत तर तो घरांत आल्यावर मला विचारा-यला लागला—'आई, मामा गांवाला गेले का ग--' म्हणून. अगदीं आजच गेलं पाहिजे का? नाहींतर राहा कीं आजच्या दिवस—'

'मायेच्या माणसांना आजच काय, पण कितीहि दिवस राहिलं तरी थोडंच वाटेल! पण आम्ही नोकरी पेशांतील माणसं म्हणजे फांसांत

अडकवलेलीं माणसं, ताई. जरा कुठं इकडे तिकडे झालं कीं आवळला गेलाच फांस. आतां पुन्हां येईन तेव्हां चांगली सवड काढून येईन. अन् मग राहीन अगदीं तुझ्या मनासारखं. तुझ्यासारखी प्रेमळ बहीण अन् अनिल-बेबीसारखीं गोड भाचरं ह्यांच्या संगतींत राहायला मला नको का वाटतं ?'—चन्द्रकान्ताचा कंठ बोलतां बोलता दाटून आला.

जाण्यापूर्वी चन्द्रकान्तानें अनिल-बेबीसाठीं बाजारांतून निरनिराळा खाऊ, खेळ आणून दिला. त्यांचें मन थोडेंतरी त्यांत गुंतवून आपण जावें हा उद्देश. पण आईच्या धांदलीवरून मामांच्या पलायनाचा बेत त्यांच्या ध्यानांत आला की काय कुणास ठाऊक ! पण त्यांचीं तोंडें चिमणीसारखीं झालीं खरी.

निघण्यापूर्वी गोदूताईनें चन्द्रकान्ताला ओवाळलें.

जरीच्या पातळाची घडी गोदूताईच्या हातांत व पंचवीस रुपयांच्या नोटांची घडी त्यानें बेबीच्या मुठींत दिली.

बहीण भावाला गहिंवरून आलें.



## १४

# मर्मभेद करणारा बाण !

पार्वती एकदोन दिवस बाहेरून कामावरून लौकर येत असलेली पाहून शंकरनें तिला विचारलें, ' मी कालच्यापासरनं बघतोय तूं लौकर येतीस कामावरनं. कुटलं काम सोडलं भिडलंयस काय ' ?

' हं ' असें एकाक्षरी उत्तर देऊन पार्वती मूक झाली.

' कुनाचं ? '

' सुरेशाकडलं '

' एकपरी तें बरंच झालं. मी तर किती दिसांपासनं सांगतोय कीं, इतकं काम ह्या दिसांत अंगावर घेऊं नगस म्हणून '

पार्वती कांहींच बोलली नाहीं. पण हा विषय निघाल्यापासून तिच्या चेहऱ्यावर एक प्रकारची त्रासिकतेची किंवा आपल्याला अप्रिय असलेल्या विषयांवर बोलणें निघाल्यावर दिसावी तशी छटा दिसत होती.

आपल्याला उरकेनासें झालें म्हणून आपण सुरेशकडील काम सोडलें अशी शंकरची समजूत झालेली पाहून तिला एकपरीनें बरेंच वाटलें.

पण तिनें तें सुखासुखी थोडेंच सोडलें होतें ?

त्यानंतर तिचे हात तव्यावरील भाकरी भाजण्याचें काम करीत होते, पण तिचें मन मात्र त्या अप्रिय आठवणीच्या गोंधळांत सांपडलें होतें.

पहिल्या पहिल्यानें कांहीं दिवस पार्वती सुरेशला चन्द्रकान्ताप्रमाणें समजून त्याच्याशीं थोडेसें मोकळेपणानें वागत असे.

दुपारचा चहा करण्याचीच गोष्ट.

एकदां पार्वती सुरेशकडे कामाला गेली तेव्हां त्यानें नुकताच स्टोव्ह पेटवून चहाला आधण ठेवलेलें होतें. चहाची भांडीं विसळण्यासाठीं कधींहि थांबावें लागणारच असें पाहून पार्वती म्हणाली—' मी करत्यें चहा. तुम्ही बसा जावा बाहेर. '

सुरेशलाहि तेंच हवें होतें असें दिसलें.

पार्वतीनें आणून दिलेला चहा घेतांना तो म्हणाला, 'वाः पारू मला कल्पना नव्हती—तुला इतका सुंदर चहा करतां येत असेल याची. तर उद्यां-पासून माझा खटाटोप बंद. तूं आल्याबरच दुपारचा चहा.'

झालें. पार्वतीलाहि नाहीं म्हणतां येईना.

हळुहळू वागणुकींत मोकळेपणा येतांच एकदां त्यानें पार्वतीला आपली सारी हकीकत विचारून घेतली. तिनेंहि ती सांगितली. 'कर्जापायीं आपल्याला इकडं यावं लागलं न् हीं कामं करावीं लागलीं' हें तिनें सांगितल्यावर त्यानें हळहळ व्यक्त केली.

तो म्हणाला, 'मला तूं हें आधीं सांगितलं असतंस तर तुला मी अधिक मजुरी दिली असती. बरं आतां या महिन्यापासून तुला दोन रुपये

जास्त देत जाईन. तुझ्या नवऱ्यालादेखील पगारवाढ करायला सांगेन मी बाबासाहेबांना. आणि तुला अडीअडचणीला कांहीं लागलं सवरलं तर सांगायला लाजूं नकोस बरं का मला.'

आपला देश सोडून पोटापाठीमागें आलेल्या त्या जिवाला आणखी काय हवें होतें ?

तिला त्याच्याबद्दल आपलेपणा वाटूं लागला. आणि त्याची सारीं कामें ती मन लावून करूं लागली.

भाबडी बिचारी !

एके दिवशीं ती चहाचीं भांडीं विसळून फळीवर ठेवीत होती. फळी थोडी उंच असल्यानें मान वर झाल्यावर तिचा डोक्यावरील पदर घरंगळून डाव्या खांद्यावरून लोंबू लागला. भांडीं ठेवून झाल्यावर ती बाजूला वळून पाहाते तों सुरेश दारांत उभा राहून तिच्या उघड्या पडलेल्या उरोजाकडे व भरदार अंबाड्याकडे अभिलाषबुद्धीनें एकटक पाहात असलेला तिला दिसला. पण तिची मान वळतांच लगेच कांहींच झालें नाहीं असें दर्शवून तो बाहेर गेला. पार्वती मात्र मनांत लाजेनें चूर झाली !

हळूहळू त्याची तिच्याबरोबर वागण्याची अन् बोलण्याची तऱ्हा बदलत चाललेली पाहून तिच्या मनांत त्याच्याबद्दल एकप्रकारचा तिरस्कार आणि कांहींशी भीतिहि निर्माण झाली.

वरील घटनेनंतर काहीं दिवसांनीं घडलेली गोष्ट.

ती चहाचा कप तिपाईवर ठेवायला निघाली असतांना त्यानें तो तिच्या हातांतून घेतांना तिच्या हाताला केलेला स्पर्श ! त्यावेळीं तो त्यानें चुकून झाल्यासारखा दाखवला. पण—

तिची तशी समजूत झाली नाहीं.

आणि त्यानंतर दुसऱ्याच दिवशीं घडलेला तो अखेरचा प्रसंग.

त्या दिवशीं घरून निघतांनाच ती ठरवून निघाली होती कीं, आज सुरेशकडून परत निघतांना आपण उद्यांपासून कामावर येणार नसल्याचें सांगून यायचें. नाहींतरी, आपल्याला दिवस गेलेले असल्यामुळें लौकरच

त्याचें काम सोडावें लागेल याची अस्पष्ट जाणीव तिनें त्याला पूर्वी दिलेलीच होती. त्याच सबबीचा उपयोग करायचा तिनें ठरविलें.

पण ती वेळच आली नाहीं. घडलें तें वेगळेंच.

नेहमींप्रमाणें तिनें चहा केला व सुरेश कॉटवर पडल्यापडल्या कांहीं वाचीत होता म्हणून तिथल्या तिपाईवर चहाचा कप ठेवून परत जातांना ती म्हणाली, 'चहा टेवलाय' नंतर ती दोनतीन पावलें गेली नसेल तोंच तिच्या हाताला घट्ट धरून कुणीतरी मागें ओढलें. तिनें पाहिलें तों सुरेशचा हात! ती आतां मोठ्यानें ओरडणार असें पाहतांच त्यानें तिचा हात सोडून दिला. क्रोधाचा एकच तीव्र कटाक्ष फेकून तिनें दरवाजाकडे धूम ठोकली व घर गांठलें. शंकर कामावर गेलेला असल्यामुळें घाईघाईनें दाराचें कुलूप काढलें आणि आंत येऊन धाडकन् कांबळ्यावर अंग टाकून दिलें. तिच्या हृदयाची धडधड थांबली नव्हती. तरी मोठ्या संकटांतून सुटल्यामुळें तिला हायसें वाटलें मात्र आपण आपला राग इतका कसा आवरूं शकलों याचें तिला नवल वाटलें. रागाच्या भरांत थरथरत्या ओठांशीं आलेला 'मेल्या' हा शब्दसुद्धां तोंडांतून फुटण्यापूर्वी तिनें धूम ठोकली होती!

आतांदेखील, या आठवणीबरोबर तिला आपल्या संयमाचें नवल वाटलें. आणि आपण तो एक शहाणपणाच केला अशी तिची समजूत झाली. नाहींतरी आरडाओरड करून काय फायदा होता? शंकरला व तिला मात्र नोकरीला मुकावें लागलें असतें! शंकरलासुद्धां या गोष्टीचा तिनें सुगावा लागू दिला नव्हता. हो, त्याला सांगायला गेलें न् रागाच्या भरांत त्यानें कांहीं अविचार केला तर—! म्हणून तिनें अगदीं मूग गिळले. आपल्या शीलावर एवढें संकट आलें असतांनासुद्धां आपल्याला तोंडांतून 'ब्र' काढतां येऊं नये, ह्या कल्पनेनें मात्र तिच्या डोळ्यांतून खळखळा पाणी आलें! श्रीमंतांच्या जगांत गरिबांच्या शीलाची अशीच परवड होते याची तिला बिचारीला काय कल्पना!

× × ×

साहित्यसंमेलनांत चन्द्रकान्ताच्या झालेल्या गौरवाचीं वर्णनें वर्तमान-पत्रांत वाचल्यावर बबनरावांच्या मनांत डाचूं लागलें. दुसऱ्याचें चांगलें झालेलें त्याच्यासारख्या माणसाच्या वृत्तीला बघवतच नाहीं, त्याला तो तरी काय करणार ? तेव्हां मनांत साचलेली ही मळमळ बाहेर ओकून टाकण्यासाठींच कीं काय तो आज सुरेशकडे आलेला होता. कांहींतरी निमित्त काढून तो अलीकडे बरचेवर सुरेशकडची बैठक साधीत असे. सुरेशच्या बोलण्यावरून त्याचेंहि चंद्रकांताशीं सूत जमत नसावें असा त्याचा अदमास होता. आणि त्याचा तो अदमास कांहीं अंशीं खराहि होता. विशेषतः, तो हेमलतेकडे आकृष्ट झाला होता, परंतु तिचा चन्द्रकान्ताकडे असलेला ओढा पाहून त्याच्या चन्द्रकान्ताविषयींच्या तिरस्कारांत भरच पडली होती आणि आतां तर ती त्याच्याबरोबर साहित्य संमेलनालाहि गेली होती !

बबनराव दारांतून आंत आल्याचें दिसतांच 'याऽयाऽऽ' असें म्हणत व स्टोव्हच्या काजळीनें काळे झालेले आपले हात पुसत पुसत सुरेश बाहेर आला.

'काय चाललंयू ?'

कांहीं नाहीं. चहाची तयारी. स्टोव्हला चढलेली काजळी पुसून काढीत होतों, इतक्यांत तुम्ही आलांत. या, आंतच बसूं या आपण बोलत.'

बबनराव त्याच्याबरोबर आंतल्या खोलींत गेला. त्याची तीक्ष्ण नजर एकदां सर्व वस्तूंवर फिरली, जमिनीवरील केर एक-दोन दिवसांत निघालेला नसावा, किंवा त्या मुदतींत भांड्यावरून साफसफाईचा हात फिरला नसावा, असा त्यानें तर्क केला. मोरीवर काजळलेलीं एक दोन भांडीं तशींच पडलीं होतीं. खोलीचा तो सारा बदललेला अवतार पाहून बबनराव म्हणाला, 'तुमच्याकडे ती पारू येते ना कामाला ?'

'येत होती. पण दोन-तीन दिवसांपासून यायची बंद झाली आहे.'

'कां ?'

'अहो ती आहे वाटतं Pregnant ( गरोदर ). तेव्हां ती म्हणाली. आपल्या हातनं आतां कांहीं काम व्हायचं नाहीं. म्हटलंऽ-बरंऽऽ'

'काय मिजास वाढलीय् पहा या लोकांची हल्लीं! हीच पारू दोन वर्षांपूर्वी इथं आली तेव्हां कशी गरीब कोकरासारखी दिसत होती. चन्द्रकान्तानं खटपट करून तिच्या नवऱ्याला इथं कामाला लावलं. बाकी, चन्द्रकान्तहि बस्ताद बरं का.' छद्मी हास्य करीत बबनराव म्हणाला.

'तो कसा काय?'

'तुम्हीच सांगतां ना ती Pregnant आहे म्हणून. But for a long period she bore no Child' बबनरावानें आपलें तर्कशास्त्राचें ज्ञान इंग्रजींतून पाजळण्यास सुरवात केली. पण लगेच मायभाषेचा आश्रय घेत तो उद्‌गारला—'म्हणजे चन्द्रकान्तानें त्याला नोकरीहि दिली आणि'- पुढलें वाक्य त्यानें अपुरेंच सोडलें.

पण सुरेशच्या मनानें त्या अपुऱ्या वाक्याचा अर्थ जाणला. बबनरावाच्या आविर्भावाचाहि तो अर्थ समजण्यास मदतच झाली.

'तुमच्याकडे कुठलीहि न् कसलीहि माहिती अगदी खडा न् खडा असते अं. कमाल आहे तुमची.'

'छे! छे! छे!' अगदीं नाटकी पद्धतीनें कानावर हात ठेवीत बबनराव बोलूं लागला, 'तुमचा कांहींतरी भलताच गैरसमज झालेला दिसतोय्. अहो, आम्हांला करायच्यीं आहेत काय लोकांचीं कुलंगडीं न् भानगडी! आमचं काम का आम्हांला थोडं आहे.? इथं फुरसत आहे कुणाला? आमच्याकडे ती मंजुळा भांडीवाली: नाहीं का, ती त्या शंकरच्या चाळींतच त्याच्यापलीकडे कुठं राहते. तीच एकदा कशावरून तरी सांगत होती. चन्द्रकान्त वेळीं अवेळीं शंकरकडे कसा येतो, त्याच्याकडे कसा खातो-पितो, न् त्याच्या न् पारूच्या यट्टामस्करीला कसा बहर येतो, तें. नाहींतर मला हो असल्या भानगडी समजायचं काय कारण?'

'छे! छे! मला नव्हतं वाटलं अं, असं कांहीं असेल म्हणून. तरीच बरं का चन्द्रकान्ताबद्दल बोलणं निघालं की, पारूची रसवंती अशी खुलायची म्हणता! आणि चन्द्रकान्त वरून तर बराच आव आणतो कीं मजुरांच्या कैवाराचा. एखाद्याला हें खरं देखील वाटायचं नाहीं—'

'अहो, मग असंच असतं. अन् असं कांहीं असल्याशिवाय उगीच

का मजुरांचा कैवार सुचतो एखाद्याला ? बाकी, आपल्याला काय करायचंय म्हणा, लोकांच्या घाणीकडे लक्ष देऊन ? जाऊं द्या. सोडून द्या तो विषय. अन् विसरून जा मी सांगितलं तें.'

पण सुरेशला न राहवून त्यानें अखेर हेमलतेचा विषय काढलाच. तो म्हणाला, 'त्याचं हेमलतेकडे जाणं येणं सुद्धां अलीकडे फार वाढलंय. एकदां काय, कलापूरला काव्यगायनासाठीं म्हणून तिच्याबरोबर बाबासाहेबांच्या मोटारींतनंच गेला. आतां काय तीं साहित्यसंमेलनाला दोघं मिळूनच गेलीं आहेत. तुम्ही ती हकीकत सांगितल्यापासून मला हें सारं अनिष्टच दिसतंय्. बाबासाहेबांना सुचवावं का याबाबत ? हेमलता काय, कॉलेजांत शिकणारी मुलगी; तिला काय कल्पना येणार याची ?'

'छे ! छे ! याबाबत मी काय सांगूं शकणार ? कांहीं झालं तरी या मोठ्या लोकांच्या गोष्टी. आम्ही हेड–क्लार्क झालों म्हणून काय–शेवटीं कारकूनच ! आमच्यासारख्यांनीं अशा बाबतींत काय मत द्यायचं ? आतां तुमची गोष्ट अलाहिदा.' अगदीं सरळपणाचा आव आणीत बबनराव उत्तरला !

मग तो विषय तेवढ्याबरच राहिला.

पण बबनराव निघून गेल्यानंतर पुन्हां सुरेशच्या मनांतील हेमलतेविषयींच्या विचारांना चालना मिळाली. सुरेशनें हेमलतेला पाहिल्यापासून तो तिच्याकडे आकर्षित झाला होता. त्याच्या मनाच्या भराऱ्या सुरू झाल्या होत्या. हेमलता ही बाबासाहेबांची मुलगी असल्यामुळें व बाबासाहेब हे त्याच्या मामाच्या कारखान्यांत एका मोठ्या अधिकाराच्या जागेवर असल्यामुळें त्याच्या भराऱ्या निराधारहि म्हणतां आल्या नसत्या. ज्यावेळीं तो बाबासाहेब व हेमलता यांच्या बरोबर गप्पा मारीत बसे, त्यावेळीं तो आपल्या अमेरिकेला जाण्याच्या, पुढील आयुष्यांतील आपल्या महत्त्वाकांक्षेच्या गोष्टी काढून त्यांच्या मनावर आपली छाप पाडण्याचा प्रयत्न करीत असे. आपल्या मामांची (अर्थात् थोरल्या साहेबांची) आपल्या प्रत्येक विचाराला संमति कशी असते, तसेंच मामांचा हा उद्योगधंद्याचा वाढलेला व्याप त्यांना एकट्याला सांभाळायला अलीकडे

कठीण होऊं लागल्यामुळें आपण अमेरिकेहून लौकर परत येऊन त्यांच्या मदतीला लागावें, अशी त्यांची इच्छा कशी आहे, इत्यादि गोष्टींचें तो त्यांच्याजवळ अगदीं रसाळ वर्णन करीत असे आणि तो हें बोलत असतांना त्याचा बाबासाहेबांच्यावर व हेमलतेवर काय परिणाम होतो, तें सूक्ष्मपणें न्याहाळीत असे.

एकदां ते तिघे असेच बसले असतांना सुरेश त्यांना सांगूं लागला, 'मामांनीं अलीकडेच पुण्याजवळ हजार–बाराशें एकर जमीन घेतल्याचं तुम्हांला माहीत असेलच. ती त्यांनीं परवां एक–दोन शेतीतज्ज्ञांना दाखवली. तेव्हां त्यांनीं ती जमीन उंसाला चांगली असल्याचा आपला अभिप्राय व्यक्त केला. तेव्हांपासून त्यांच्या डोक्यांत तिथं साखरेचं शंभर दीडशें टनांचं एक प्लँट बसवायचं फार घोळतंय. मागल्या खेपेला ते इथं आले होते, तेव्हां माझ्याजवळ ते याबद्दलच बोलत होते. कुठलं तरी तेवढंच एक प्लँट विकाऊ असल्याचं ते सांगत होते. अगदीं 'स्कोडा' मशिनरी आहे म्हणाले. त्यांचं तर म्हणणं कीं अमेरिकेला जायचं रहित करून तूत तीच सारी जबाबदारी मी आपल्या अंगावर घ्यावी. मी त्यांना सांगितलं, अशा परिस्थितींत एकदम ती जबाबदारी स्वीकारण्यापेक्षां एकदां अमेरिकेहून शिक्षण घेऊन आलों म्हणजे बरं नाहीं का––तोंवर तुमचे बाकीचे व्यवहार पुरे होऊं देत. तेव्हां कुठं त्यांना तें पटलं––'

'म्हणजे थोरले साहेब लौकरच स्वतःचा एक कारखाना सुरू करताहेत म्हणा कीं, कुठली मशिनरी विकाऊं आहे ?' बाबासाहेबांनीं विचारलें.

'तें कांहीं माहीत नाहीं मला. 'टाईम्स' मधें कुठं जाहिरात आलीय म्हणत होते खरं.'

'बाकी, त्यांची या वयांतली धडाडी पाहून कौतुक वाटतं अं–' बाबासाहेबांनीं असें म्हटल्यावर सुरेशच्या मनांत आलें—' अहो, थोरल्या साहेबांचं कौतुक वाजवी असलं तरी त्यांनीं एवढी जबाबदारी माझ्यावर सोपवण्याची तयारी दर्शविली, याबद्दल माझ्या मोठेपणाचं कौतुक कांहींच नाहीं का ! '

आणि इतकें सांगण्याचा त्याचा खटाटोप काय मग उगीचच होता !

तसेंच पाहिलें तर, त्याच्या असल्या बोलण्याचा बाबासाहेबांच्यावर थोडाबहुत इष्ट परिणाम होत असे; नाहीं असें नाहीं. पण हेमलतेला मात्र त्यांत कांहीं विशेष वाटल्याचें तिच्या चर्येवरून दिसून येत नसे. हेमलतेसारख्या काव्यवृत्तीच्या मुलीला ह्या औद्योगिक घडामोडींत आणि 'स्कोडा, क्रुप' मशिनरींत काय स्वारस्य वाटणार ? त्यामुळें ह्या घडा-मोडींच्या आडून डोकावणारा त्याचा श्रीमंती बडेजाव तिच्या मनाला भुरळ पाडूं शकत नसे. सुरेशला वाटे कीं, तिच्या मनावर चन्द्रकान्ताचा पगडा असल्यामुळेंच तिची आपल्याविषयीं अशी उदासीन वृति दिसते.

आणि मग तो अस्वस्थ होई व चन्द्रकान्ताचा तिच्या मनावरील पगडा नाहींसा करण्यासाठीं काय करावें याचा तो वेड्यासारखा विचार करीत बसे.

अशा परिस्थितींत बबनरावानें सांगितलेल्या हकीकतीमुळें चंद्रकांताचा अचूक मर्मभेद करणारा बाण आपल्या हातांत आल्यासारखा वाटून त्याच्या मनाला किती समाधान वाटलें असेल !



## १५

# चन्द्रकान्त दूर जाईल ?

चन्द्रकान्त पुण्याहून परत आल्यावर त्याला पहिली धक्का देणारी बातमी समजली ती कंपनीनें जाहीर केलेल्या बोनस संबंधीं !

त्या दिवशीं तो नेहमींप्रमाणें ऑफिसांत गेल्यावर त्याचे सहव्यवसायी दर्शने हलक्या आवाजांत म्हणाले, ' काय चन्द्रकान्त, तुम्हांला समजलं का !--'

' काय बुवा ? मी तर हा आजच थोड्या वेळापूर्वी पुण्याहून आलो. तेव्हां मला काय समजणार ? '

' कंपनीनं गतवर्षीच्या नफ्यापैकीं दोनच महिन्यांचा बोनस जाहीर केलाय्. '

' काय, फक्त दोनच महिन्यांचा ? आश्चर्य आहे ! ' त्याच्या विस्मयाला पारावार राहिला नाहीं. विस्मयाबरोबरच त्याच्या चर्येवर खेद, संताप, निराशा, असे इतर भावहि प्रकटले.

त्याच्या डोक्यांत विचारांचा कल्लोळ माजला.

आणि यांत अस्वाभाविक काय होतें ?

स्वातंत्र्य कालांत राष्ट्रीय सरकारनें निर्नियंत्रणाच्या धोरणाचा अवलंब केल्यामुळें व्यापाऱ्यांना व कारखानदारांना युद्धकालांतहि नफेबाजीची जेवढी संधि प्राप्त झाली नव्हती, तेवढी आतां चालून आली आणि अशा चालून आलेल्या संधीचा फायदा उठवणार नाहीं तो व्यापारी कसला? नियंत्रणें उठवण्याचाच अवकाश कीं वस्तूंचे दर रबरी फुग्यांत हवा भरेल तसतसा फुगावा, त्याप्रमाणें भरमसाट फुगूं लागले. मग त्यांनीं देशहित म्हटलें नाहीं, कीं आपल्या देशबांधवांची स्थिति पाहिली नाहीं ! युद्धकालांतील महागाईनें आधींच हैराण झालेल्या जनतेच्या खिशांतील उरला सुरला पैसा खिसा खरवडून् बाहेर काढण्याचा त्यांनीं जणूं चंगच बांधला ! आपल्या नव्यानेंच अधिकारारूढ झालेल्या सरकारचा जयजयकार करीत त्याच्याच कृपेनें प्राप्त झालेल्या संधीचा भल्या बुऱ्या मार्गानीं पुरेपूर फायदा उकळला. नफ्याचा पैसा हाच जिथें पापावर आधारलेला असतो, तिथें लहान पाप, मोठें पाप असें तारतम्य त्यांनीं दाखविण्याची वास्तविक काय जरूरी ? लहान काय न् मोठें काय, शेवटीं पाप एकच ना—मग मोठेंच कां न् करा ! आणि तसेंच पाहिलें तर ते स्वहित पाहात होते म्हणजे पर्यायानें देशहितच पाहात नव्हते काय ? कारण ते तरी या देशाचेच घटक होते ना ? आणि घटकाचे हित तें देशाचें हित नव्हे काय ? पण सरकारशिवाय एकहि देशबांधवाच्या डोक्यांत ही कल्पना येत नव्हती, याहून कृतघ्नतेची सीमा ती कोणती !

ही निर्नियंत्रणाची पर्वणी साखरेच्या धंद्यालाहि यथाक्रम आली आणि स्वप्नांतहि येणार नाहीं असा साखरेला भाव आला. साखर कारखानदारांनींहि आपण कापड कारखानदारांहून तसूभरहि कमी नसल्याचें सिद्ध करून दिलें. यहामुळें नित्याच्या गजरेची वस्तु झालेली साखर अशी दुर्मिळ होतांच लोकांच्या तोंडचें पाणी पळाल्यासारखें झालें असल्यास नवल नाहीं ! ' अहो, काळजी तरी कशा–कशाची करायची ? इकडे कापड महागलं म्हणून, का धान्य दुर्मिळ झालं म्हणून, का साखर दिसेनाशी झाली म्हणून ? ' अशा प्रकारचे हताशपणाचे व विरक्तीचे सूर कांहींजणांच्या तोंडून निघूं लागले ! कधीं झाला नव्हता एवढा फायदा त्या अल्पावधींत साखर कारखानदारांनीं करून घेतला !

खुद्द लक्ष्मीनगर शुगर मिल्सलाहि लाखों रुपयांचा त्या वर्षी नफा झाला. त्यामुळें चन्द्रकान्ताची कल्पना होती कीं, त्या नफ्यांतून तरी कामगारांना चार–सहा महिन्यांचा बोनस पगार देण्याची मालकांना इच्छा होईल. नाहींतरी, गेलीं दोन–तीन वर्षे निरनिराळया सबबी पुढें करून कारखान्याला कधीं तोटा, तर कधीं थोडासाच फायदा दाखवून ते बोनसच्या व इतर प्रश्नांना मुळांतच सुरुंग लावीत आले होते ! चालू सालीं इतका घसघशीत नफा दिसत असतांहि मालकांच्या औदार्याची मजल कामगारांना दोन महिन्यांपेक्षां अधिक बोनस देण्यापलीकडे जाऊं नये याचें त्याला साहाजिकच नवल वाटलें. त्याला चीड आली. तो संतापला. अतिवृष्टीनंतर नदी, नाले, विहिरी पाण्याचा संचय करण्यास असमर्थ ठरून सर्वत्र पाण्याचा फुगवटा दिसून यावा, त्याप्रमाणें ताळेबंद पत्रकांतील पानापानावर त्या अतिरिक्त नफ्याच्या फुगवट्याचीं त्याला प्रत्यंतरें दिसत होतीं ! त्या अतिवृष्टीचा नियंत्रित वेळीं व नियंत्रित प्रमाणांत पाणी सोडणाऱ्या नळाच्या चावीवर मात्र कांहीं परिणाम होऊं नये, तसेंच बोनस बाबतींतील मालकांचें वर्तन त्याला वाटलें. औदार्य–बुद्धीनें नियंत्रित केलेला तो नळ अतिवृष्टीपासून अगदीं नामानिराळा राहिला !

या बोनसवर साऱ्या कामगारांचे डोळे मोठ्या आशेनें लागलेले होते.

वाढत्या महागाईशीं पुरा पडणारा पगार कंपनीकडून अपेक्षिण्यांत कांहींच अर्थ नव्हता, मग जीवन कंठण्यासाठीं होणाऱ्या जादा खर्चाची थोडीबहुत तरी वजावट होण्यासाठीं बोनसकडे त्यांचे डोळे लागून राहिल्यास नवल काय! विशेषतः साखरेंत कंपनीला मिळणारे पैसे पाहून त्यांच्या आशेला पख फुटले. पण लक्षावधि रुपयांच्या नफ्यापैकीं कांहीं हजार फक्त मजुरांच्या तोंडावर टाकून त्यांचा नफ्यांत किती हिस्सा असतो, तें मालकांनीं सक्रिय दाखवून दिलें. तिकडे सरकार मात्र उत्पादन वाढीसाठीं मजुरांना वरचेवर वेठीला धरीत होते ! मजुरालाहि पोट असतें व तें भरलेलें असेल तरच त्याच्या हातून व्यवस्थित काम होणें शक्य आहे, याचा विचार करतो कोण! बाकी, अशा आणीबाणीच्या प्रसंगीं त्यांनीं देशासाठीं एवढाहि त्याग—उपाशी राहण्याचा—करूं नये काय ?

अशा प्रकारें या घटनेवर विचार करतां करतां चन्द्रकान्ताचें डोकें भणभणून गेलें. अखेर, आज रात्रीं साक्षरता प्रसार वर्गाच्या वेळीं आपल्याला लोकांचें मत अजमावतां येईल आणि त्यांच्या मनावर ह्या घटनेची काय प्रतिक्रिया झाली आहे तें पाहून आपलें पुढील धोरण बांधतां येईल असा त्यानें विचार ठरविला.

रात्रीं वर्ग भरल्यावर एकजण चन्द्रकांताला म्हणाला, 'म्हंजे काय, दोन महिन्यांतच पंधरा न् पंधरा तीसच रुपय मिळनार न्हवं का आम्हांला ? आम्ही रातदिन घाम गाळला त्याचं चीज हेंच व्हय ? खासा न्याव ! '

चन्द्रकान्त बोलण्यापूर्वींच दुसरा एकजण उत्तरला, ' आर, असं कसं म्हंतुस ? बोनुस द्यायचा त्यां त्यांच्या खुशीचा सौदा न्हवं ? देतील तें घेऊनशान गुमान बसाया होवं. न्हाईंजापा दिलं तर काय करनार तुम्हीं त्येंचं ? '

अशा प्रकारचे उलटसुलट संवाद त्याच्या कानांवर पडले. तरी त्याला दिसून आलें कीं, एकंदरींत त्या वार्तेनें तेहि असंतुष्ट झाले होते. कांहींजण चिडलेहि होते. पण पुढें काय करावें याबद्दल सारेच दिङ्मूढ झाले होते. हा प्रश्न धसास लावावा, काय सोक्षमोक्ष व्हायचा असेल तो होवो, असें

बहुतेक सर्वांनाच वाटत होतें. म्हणून त्यांनीं चन्द्रकान्ताला सल्ला विचारला व ' तुम्ही जें ठरवाल तें आम्ही मान्य करूं आणि तुमच्या मागं येऊं ' असें त्याला आश्वासन दिलें.

त्या आश्वासनामुळें चन्द्रकान्ताला बराचसा धीर आला आणि समाधानहि वाटलें. त्यानें सांगितलें—'रात्रंदिवस घाम गाळावा तुम्ही, अन् त्याचा नफा मात्र उठवावा मालकांनीं ह्या गोष्टीची मलाहि चीड येते. वास्तविक ह्या नफ्याचे मालक तुम्हीच आहांत. तेव्हां त्यांतला वाजवी हिस्सा मागणें ही मेहेरबानीची गोष्ट नव्हे. हा तुमचा हक्क आहे. तरी पण आपली ही मागणी प्रभावी होण्यासाठीं आपण आपली संघटना स्थापन केली पाहिजे. तिच्यामार्फत आपली मागणी त्यांच्यापुढं ठेवल्यास ती एकमुखी असल्यामुळं न तिच्या मागं शक्ति असल्यामुळं ती नाकारणं मालकांना जड जाईल. तुम्ही आपल्यांतला दुबळेपणा, भित्रेपणा काढून टाकला पाहिजे. प्रकाशांनीं जें सांगितलं, त्याचं विस्मरण होऊं देतां कामा नये......'

संघटनेची मुहूर्तमेढ २६ जानेवारीस रोवण्याचें ठरलें. ह्याच पवित्र दिवशीं आजवर स्वातंत्र्य मिळविण्याची शपथ जनता घेत आली होती. तेव्हां आर्थिक स्वातंत्र्याच्या संघटनेसाठीं हाच दिवस निवडण्यांत औचित्यहि होतें.

झालें, त्या दिवसापासून चन्द्रकान्ताचा सारा मोकळा वेळ मजूर संघटना स्थापण्याच्या कामांत जाऊं लागला. पुण्याला असतांना प्रकाशांच्या भेटीस गेल्यावेळीं त्यांनीं त्याला मजुरांची संघटना ( युनियन ) स्थापन करण्याबद्दल सांगितलें होतें. तरीपण ती गोष्ट इतक्या तांतडीनें करावी लागेल अशी पुणें सोडतांना त्याला कल्पना नव्हती.

यापूर्वी लक्ष्मीनगरला कसल्याहि प्रकारची संघटना नसल्यामुळें कांहीं कांहीं लोक या संघटनेंत सामील व्हायला विचकत. त्यांना वाटे—आपण या संघटनेंत सामील झालों म्हणजे पोटाला जी ओली कोरडी भाकरी मिळत आहे तीहि एखाद्यावेळीं जायची ! चन्द्रकान्ताला त्या लोकांची ही अडाणी समजूत काढून टाकावी लागे. त्यासाठीं तो त्यांना इतर

ठिकाणच्या कामगार संघटनांच्या हकीकती सांगे. अशा संघटनांचे वर्तमानपत्रांतून येणारे वृत्तांत त्यांना वाचून दाखवी. वर्गाला न येणाऱ्या मजुरांची त्यांच्या घरीं जाऊन गांठ घेई. त्यांच्या शंका कुशंका निरसन करी. त्यांचीं मनें वळवी.

अखेर २६ जानेवारी आली. त्या दिवशीं चन्द्रकान्तानें शाळेच्या पटांगणांत मजुरांची सभा बोलावली. सारें पटांगण मजुरांनीं फुलून गेलें. सुरवातीस चन्द्रकान्तानें साथी प्रकाशांकडून आलेला संदेश वाचून दाखविलाः—

"आपण २६ जानेवारीच्या सुमुहूर्तावर आपल्या कारखान्यावर मजुरांची संघटना स्थापन करीत आहांत ही मोठी आनंदाची गोष्ट आहे. मजुरांचीं गाऱ्हाणीं एकजुटीनें व परिणामकारक रीतीनें मांडण्यासाठीं संघटनेसारखें दुसरें साधन नाहीं. देशांतील प्रतिगामी शक्ति फोफावत असतां कामगारांनीं आपली एकजूट करून त्या शक्तीचा बीमोड करणें हें त्यांचें आजचें महत्त्वाचें कार्य आहे. आपली संघटनाहि स्वतःचे प्रश्न सोडविण्याबरोबरच देशाचें हें महत्त्वाचें कार्य पार पाडण्यासाठींहि यथाशक्ति झटेल अशी मला उमेद आहे. मी आपल्या संघटनेस सुयश चिंतितों."

टाळ्यांचा प्रचंड कडकडाट करून मजुरांनीं ह्या संदेशाचें स्वागत केलें. नंतर चन्द्रकान्तानेंहि या संदेशाच्या अनुरोधानें संघटनेच्या महत्त्वावर चार शब्द सांगितले व 'लक्ष्मीनगर कामगार संघ' स्थापन झाल्याचें जाहीर केलें.

थोड्याच दिवसांनीं संघाच्या कार्यकारी मंडळाच्या बैठकींत चन्द्रकान्तानें बोनसचा प्रश्न मांडला. बरीच चर्चा होऊन कंपनीकडे पाठवायच्या अर्जाचा त्यानें एक मसुदा तयार केला. त्यांत कंपनीला गेल्या पंधरा वर्षांच्या कारकीर्दींत किती नफा झाला—त्यांपैकीं भागीदारांना किती वांटण्यांत आला व मजुरांच्या वांट्याला किती आला—त्याचे आंकडे दिले. त्यावरून त्यानें असें दाखवून दिलें कीं, भागीदारांना आपल्या भांडवलाची भरपाई होऊन वर बोनस शेअर्सहि मिळालेले

आहेत. मजुरांची मात्र दर खेपेस अल्पस्वल्प बोनसवर बोळवण होत आली असून त्यांना राहण्यासाठीं चांगल्या चाळींसुद्धां कंपनीनें बांधलेल्या नाहींत !

नंतर नियंत्रणें उठविल्यानंतरच्या काळावर येऊन या मुदतींत कंपनीला भरमसाट नफा कसा झाला व त्यामुळें साहजिकच मजुरांच्याहि अपेक्षा कशा वाढल्या, पण त्या अपेक्षांना कंपनीच्या निर्णयानें धक्का कसा बसला याचें वर्णन करून त्यानें संघाच्या मागण्या पुढें मांडल्या:—

गतवर्षींच्या नफ्यांतून सहा महिन्यांच्या पगाराइतका बोनस कामगारांना मिळावा

कामगारांच्या पक्क्या चाळी बांधण्यासाठीं त्या नफ्यांतून तरतूद करण्यांत यावी.

अशा प्रकारचा अर्ज कंपनीकडे पाठविल्यावर त्याचें उत्तर येईपर्यंतच्या काळांत आपला संघ अधिकाधिक मजबूत करण्याच्या कार्यांत चन्द्रकान्त व्यग्र झाला.

× × ×

संघाच्या कार्यांत अलीकडे चन्द्रकान्त इतका गढून गेला होता कीं, इतर कोणत्याहि गोष्टीकडे लक्ष पुरवायला त्याला सवड मिळेनाशी झाली. रात्रीं वर्गांचें काम. सकाळीं संघाचें काम. जें कार्य हातीं घ्यायचें त्यांत आपलें मन पूर्णपणें घालायचें अशी त्याची वृत्ति असल्यामुळें एकदा कामगार-संघटनेंत लक्ष गुंतल्यावर इतर कोणत्याहि गोष्टीकडे त्यानें आपलें लक्ष द्विधा होऊं दिलें नाहीं. पहिल्या पहिल्यानें हें त्याला जड गेलें. सकाळीं तासभर का होईना, हेमलतेकडे जाण्याचा त्याचा पूर्वी क्रम असे. त्यामुळें ती वेळ झाली कीं, तो कुणा मजुराबरोबर बोलत असला तरी त्याचें मन हेमलतेच्या बंगल्यावर जाई—तिच्या आसपास घोटाळे. तिच्या सहवासांतील आठवणी काढण्यांत गुंगून जाई. त्या मजुरासमोरून उठून तिच्या भेटीला जावें असा क्षणभर त्याच्या मनाला मोह पडे. पण लगेच तो भानावर येई. आपल्या मनाची निर्भर्त्सना करी. आणि तें हातीं घेतलेल्या कामांत गुंतवी.

नियमितपणें येणारा चन्द्रकान्त असा अकस्मात यायचा बंद झाल्या-वर हेमलतेची स्थितिहि मोठी चमत्कारिक झाली. आज तो या कामा-निमित्त आला नसेल, उद्यां त्या कामानिमित्त आला नसेल—अशी मनाची समजावणी करण्यांत तिचे पहिले कांहीं दिवस गेले. पण तो कामगार संघटना स्थापन करण्याच्या नादांत गुंतलेला आहे हें तिच्या कानांवर येतांच तिचें मन कांहींसें उदास व हताश झालें. आपला चन्द्रकान्त आपल्यापासून दूर जाईल कीं काय अशी चिंता तिच्या मनांत उत्पन्न झाली. तिला न राहवून तिनें एकदोनदां गणूला त्याच्याकडे पाठवून त्याला बोलावून आणण्यास सांगितलें. मग चन्द्रकान्तानें तिची एकदां उभाउभी भेट घेऊन आपण कोणत्या महत्त्वाच्या कार्यांत गुंतलों आहोंत व त्यामुळें आपल्याला सध्यां दुसऱ्या कशालाहि सवड कशी होत नाहीं, याचें वर्णन केलें.

मकरसंक्रांतीच्या दिवशीं मात्र तो मुद्दाम सवड काढून तिच्या बंग-ल्यावर गेला. त्याला पाहतांच हेमलतेच्या चर्येवर प्रफुल्लित कमलाची टवटवी आली. न राहवून तिच्या तोंडांतून शब्द बाहेर पडले—

‘ आज अखेर चन्द्र उगवला म्हणायचा ! ’

‘ मग आतां तरी सारं किल्मिष लोपून जायला कांहीं हरकत नाहीं.’ चन्द्रकान्तानेंहि स्निग्धपणें उत्तर केलें.

‘ त्यासाठीं रोज चंद्रोदय व्हायला हवा. एक दिवस चंद्र उगवल्यानं कांहीं महिन्याचं किल्मिष नाहींसं होत नाहीं. ’

‘ चन्द्राला तुमचं किल्मिष काढण्याशिवाय दुसरं कांहीं कार्यच नाहीं वाटतं ! ’

यानंतर त्यांचें कांहीं वेळ असेंच मधुर बोलणें चाललें होतें. बरेच दिवसांनंतर दोघांचीहि मनमोकळी भेट झाल्यामुळें दोघेंहि उल्हसित झालीं होतीं. हेमलता तर विशेषच आनंदित दिसत होती. ‘ चन्द्रकान्त आपल्याला विसरला नाहीं ’ या कल्पनेनें तर तिच्या उल्हासाला विशेष बहर आला नव्हता !

चांदीच्या वाटींतील हलवा चन्द्रकान्ताच्या हातावर ठेवतांना त्याच्या

हाताचा तिच्या बोटांना स्पर्श होऊन दोघांचींहि शरीरें रोमांचित झालीं. चन्द्रकान्तानें कितीतरी वेळ तिचा तो सुकुमार हात आपल्या हातांत धरून ठेवला!

त्या वेळीं दोघांच्या नेत्रांतून अश्रुधारा ओघळतांना पाहायला जवळ-पास कुणी नव्हतें हें एकपरीनें बरेंच झालें! नाहींतर ते अश्रु सुखाचे कीं दुःखाचे, कीं सुखदुःखमिश्रित—याचा उलगडा त्याच्या मनाला झाला नसता!



# १६

# तो चन्द्रकान्त आणि हा चन्द्रकान्त!

चन्द्रकान्त आपल्याला विसरला नसला तरी तो आपल्यापासून दूर जाईल कीं काय अशी हेमलतेला जबरदस्त शंका येण्यासारखी गोष्ट नंतरच्या पांचसहा दिवसांनींच घडली.

त्या दिवशींहि चन्द्रकान्त मुद्दाम सबब काढून तिच्याकडे आला होता.

पुण्याच्या ‘उषःकाल’ ह्या सुप्रसिद्ध बोलपट कंपनीकडून त्याला पद्यलेखकाच्या जागेकरितां बोलावणें आलें होतें. त्याची इच्छा असल्यास त्याला ज्या बोलपटासाठीं बोलावलेलें होतें तो संपल्यानंतरहि त्याच्याशीं कायमचा करार करण्यास कंपनी तयार होती. त्याबाबत प्राथमिक बोलणीं करण्यासाठीं त्यानें पुण्यास येण्याबद्दल कंपनीनें त्याला विनंति केलेली होती. उषःकालसारख्या प्रख्यात कंपनीकडून पद्यलेखना-बद्दल बोलावणें येणें ही खरोखर अभिमानास्पद गोष्ट होती. आज तिचा दर्जा हिंदुस्थानांतील श्रेष्ठ बोलपट कंपन्यांच्या बरोबर गणला जात होता. अशा वेळीं चन्द्रकान्ताच्या जागीं दुसरा कुणी असता तर त्यानें यत्-

किंचित्‌हि वेळ न दवडतां कंपनीकडे धांव घेतली असती! असली संधि यावी म्हणून जिथें धडपड चाललेली असते, तिथें आयती चालून आलेली संधि स्वीकारण्याच्या बाबतींत हयगय कोण करील?

पण चन्द्रकान्त हा त्या वर्गांतील नव्हता.

अर्थात् त्यालाहि या आमंत्रणामुळें आनंद झाला नाहीं किंवा अभिमान वाटला नाहीं, असें मुळींच नव्हे. पण त्याच्यापुढील प्रश्न निराळा होता. बोलपट कंपनींत जाण्यानें त्याला आर्थिक स्वास्थ्य लाभणार होतें व प्रसिद्धीहि खूप मिळाली असती. पण ह्याहून तिसरी एकहि गोष्ट साध्य होईल असें त्याचें मन सांगत नव्हतें. उलट, बाकी साऱ्या गोष्टींची हानीच होईल हें त्याला स्पष्ट दिसत होतें. ज्या आर्थिक संपन्नतेच्या अभावीं त्याला आपल्या महत्त्वाकांक्षा सोडून द्याव्या लागल्या होत्या, मानखंडना पत्करावी लागली होती, ज्यामुळें त्याच्या घराला अवकळा प्राप्त झाली होती, ती धुऊन निघण्याची संधि अचानकपणें आलेली पाहून त्याला कांहीं काल संभ्रम झाल्यास नवल नव्हतें! पण तो एक जागृत सदसद्विवेक—बुद्धीचा, ज्वलंत ध्येयवृत्तीचा तरुण होता. वैयक्तिक सुखाचा आणि स्वास्थ्याचा हा मोह फार वेळ त्याच्या मनाला गुंगवून ठेवूं शकला नाहीं आर्थिक संपन्नतेहूनहि कांहीं निराळीं ध्येयें त्यानें कळूं लागल्यापासून आपल्या मनापुढें ठेवलेलीं होतीं. चार चौघांहून कांहींतरी वेगळें जीवन आपल्याला घालवायचें आहे, कांहींतरी वेगळें आपल्याला मिळवायचें आहे, असें तो लहानपणापासून आपल्या मनाला शिकवीत आला होता. बोलपट कंपनींत जाण्यानें तीं त्याचीं सारीं ध्येयें धुळीला मिळालीं असतीं. शिवाय, ज्यांच्यांत तो आजवर वावरला होता, ज्यांच्या दुःखानें तो दुःखी झाला होता, ज्यांना सुखाचे दिवस यावे म्हणून तळमळीनें तो कांहीं करूं इच्छित होता, ज्या मार्गावरून तो त्यांना घेऊन नुकताच चालूं लागलेला होता, त्यांना वाटेंतच सोडून त्यानें एकट्यानेंच ऐषारामांत राहायचें? छे! छे! मग त्याची आजपर्यंतची तळमळ काय वेगडी होती?

आणि तो त्यांना असा अर्ध्या वाटेवर सोडून गेल्यावर साथी

प्रकाशांना तरी काय वाटलें असतें ? त्यांनीं त्याच्याबद्दलच्या केलेल्या साऱ्या अपेक्षा फोल ठरल्यावर त्यांना किती दुःख झालें असतें !

प्रकाशांची आठवण येतांच चन्द्रकान्ताच्या हृदयांत प्रकाश ओसंडून गेला. त्यांचें त्यागमय जीवन त्याला आठवलें. राष्ट्रसेवेसाठीं त्यांनीं सुखमय प्राध्यापक-पदाचा राजीनामा दिला होता. सुखमय जीवनाचा त्यांना यत्‌किंचित्‌हि लोभ वाटला नाहीं ! किंबहुना ज्याला आयुष्यांत कांहीं मोठें कार्य करून दाखवावयाचें आहे, त्यानें असल्या सुखाचा त्याग करणेंच जरूर असतें काय ?

आपण आज मजूर संघटनेचें कार्य हातीं घेतलें आहे. मजुरांनीं आपल्यावर किती विश्वासानें भार टाकला आहे ! त्यांची वंचना करायची ? आज त्यांच्यावर होणारा अन्याय घडघडीत दिसत असतां तिकडे आपल्या स्वार्थापायीं डोळेझाक करायची ? त्यांना त्याचा प्रतिकार करण्यासाठीं तयार करायचें नाहीं ? हें सारें कशासाठीं ? वैयक्तिक सुखासाठीं !

छे ! छे ! ह्या चन्द्रकांताच्या हातून तरी तें होणार नाहीं !

अशाप्रकारें विचारांच्या आवर्तांत सारखा भ्रमत असतांना हेमलतेचें मत अजमाविण्यासाठीं, तिजकडून याबाबत आपल्याला कितपत प्रोत्साहन मिळतें आहे याचा अंदाज घेण्यासाठीं, मोठ्या आशेनें तिच्याकडे आला होता. चंद्रकांताला पाहतांच तिनें त्याचें पूर्वीसारखेंच हर्षभरानें स्वागत केलें होतें आणि त्यानें दिलेलें बोलपट कंपनीचें पत्र वाचून तर तिचा हर्ष असीम वाढला होता.

'संमेलनांतील आपल्या गौरवाचा परिणाम दिसतोय हा. मग काय—पाठविलंत कीं नाहीं उत्तर ?'

'नाहीं अद्याप. काय उत्तर पाठवावं याचा विचार करतोय.'

'कां, इतकं कसलं कोडं पडलंय त्यांत ?'

'कोड्याहूनहि हें बिकट आहे.'

'म्हणजे, नकार द्यायचा विचार आहे कीं काय ?' तिच्या स्वरांत तीव्रता होती.

' हुं. '

तिच्या चर्येवर असंतोषाची छटा स्पष्टपणें उमटलेली चन्द्रकान्ताला दिसून आली. ती पाहून चन्द्रकान्त म्हणाला,

' मी हें आमंत्रण स्वीकारण्यानं माझं ध्येय मला सोडावं लागेल, अशी भीति वाटते. ध्येयवादी माणसाला आपलं ध्येय प्राणाहून प्यार असतं!'

' कसलं ध्येय ? काव्य-लेखनाचं ? त्याला तर तिथं उलट अधिकच वाव मिळेल. '

' काव्य-लेखन ? हं. तुलासुद्धां अजून काव्य आणि पद्य यांतला फरक समजूं नये म्हणजे नवल आहे ! माझ्या हातून पद्य-लेखन खूप होईल, पण त्यामुळं माझं काव्य संपुष्टांत येईल. हें तर झालंच. शिवाय मी मजूर संघटनेचं कार्य नुकतंच सुरू केलं आहे, तेंहि मला अर्धवट सोडावं लागेल. माझ्या काव्य-लेखना इतकीच मजूर चळवळ मला प्यार आहे. '

' तुम्हांला मजूर चळवळ प्यार आहे न् माणसं प्यार नाहींत ? माझं प्रेम प्यार नाहीं ? '

' तुझं प्रेम प्यार आहे. पण ध्येयाच्या आड येणारं प्रेम प्यार नाहीं.'

' मजूर-चळवळीचं कसलं तुमचं ध्येय ? काव्य-लेखनाचं म्हटलं, तर एक असो. संमेलनाहून आल्यावर मला आपलं वाटायचं कीं, समेलनांत झालेला एवढा गौरव पाहून तरी तुम्ही आपलं सारं लक्ष काव्य-लेखनाकडे वळवाल, म्हणून. माझी आपली खुळी समजूत कीं, मला हवे तसे चन्द्रकान्त आतां मला दिसतील म्हणून. पण इथं आल्यापासून पाहतें तों, उलट तुमचा मजुरांकडला ओढा वाढायलाच लागला. तुम्हांला इकडे यायला सुद्धां सवड होईनाशी झाली. आतां तर ही सोन्यासारखी संधि तुम्ही त्यापायीं दवडायला निघालांत ! खरंच चन्द्रकान्त, मी तुम्हांला कसं सांगूं ? तुम्हांला माझ्या मनाची कल्पना नाहीं येत ? '

' हेमा, तुला वाटतं—तुझ्या मनाची कल्पना मला येत नाहीं. पण तुला तरी माझ्या मनाची कल्पना येतेय् का ? माझ्या मनाची वाढ ज्या परिस्थितींत झाली तिची तुला अजिबात झळ लागली नसल्यानं तुला माझ्या तळमळीचं महत्त्व वाटत नाहीं. मी कवि असल्यामुळंच कीं

काय, माझं मन तीव्र संस्कारक्षम असल्यानंच कीं काय, माझ्या मनावर लहानपणासून जे परिणाम घडत आले तसतसा माझ्या मनाला व विचारांना आकार येत गेला. त्यांतल्या त्यांत इथं आल्यापासून जें मी पाहिलं—सध्यां जें जीवन मला सभोंवती पाहायला मिळतं, तें मला स्वस्थ बसूं देत नाहीं. त्याला मी तरी काय करूं ? माझी कल्पना होती—वेडी कल्पना होती कीं—तूं माझ्याशीं समरस होशील. माझ्या ध्येयाच्या वाटचालींत सहचरी म्हणून तुझी सोबत मला घडेल. पण तुझ्या—माझ्यांत अंतर आहे ! फार अंतर आहे ! न तुटणारं अंतर आहे याची आज मला जाणीव झाली. इकडे येते वेळीं मला वाटलं होतं, तूं माझ्या निर्णयाला पाठिंबा देशील, त्याचं स्वागत करशील, मला प्रोत्साहन देशील, पण—नाहीं—माझी वाटचाल मला एकट्यालाच करायला हवी....’

हें बोलत असतां, विशेषतः शेवटचें वाक्य बोलत असतां त्याची चर्या केविलवाणी दिसूं लागली आणि नकळत त्याचे नेत्रांतून दोन अश्रु ठिबकले !

पण लगेच त्याच्या चर्येवर व डोळ्यांत एक प्रकारचें तेज लकाकलें. मुद्रा कांहींशी करारी दिसूं लागली. आणि ‘ बरं, अच्छा हेमा——’ असें म्हणून त्यानें चटकन् तिचा निरोप घेतला.

चन्द्रकान्त दृष्टीसमोरून जातांच एखादा मनुष्य स्वप्नांतून जागा होऊन त्यानें आजुबाजूला चमत्कारिक नजरेनें पहावें तसें हेमलतेनें सभोंवार पाहिलें. कां न कळे, तिचेहि डोळे भरून आले व तिची दृष्टि अंध झाली. तिनें एकदां डोळे टिपले तरी पाणी खळेना. ती खुर्चीवरून कशीबशी उठली आणि आपल्या खोलींतील बिछान्यावर तिनें अंग लोटून दिलें. उशींत तोंड खुपसून ती मुसमुसून हुंदके देऊं लागली.

कलापूरला रोटरी क्लबाचा कांहीं कार्यक्रम असल्यामुळें तिसऱ्या प्रहरींच बाबासाहेब तिकडे गेले होते. आणि आपल्याला परत यायला कदाचित् वेळ होईल तरी वाट पाहूं नकोस—म्हणून जातांना त्यांनीं हेमलतेला बजावलें होतें.

बाहेर अंधार अधिकाधिक दाट होत होता. रस्त्यावर व पलीकडच्या

चाळींतून दिवे लागलेले दिसत होते. परंतु आपण उठून आपल्या खोलींतला दिवा लावावा, अशी तिला इच्छा झाली नाहीं. चन्द्रकान्त आपल्यापासून दूर जाईल कीं काय ही आपली भीति खरी ठरली, आपल्या हृदयांतला प्रकाश लोपला, आतां बाहेर कितीहि उजेड करून काय करावयाचें आहे—असा विचार तिच्या मनांत आला. ती तशीच कांहीं तरी भरकटत पडून राहिली. मध्यंतरीं माई एकदां दिवाणखान्यापर्यंत येऊन तेथूनच—' हेमा नाहीं दिसत. कुठं बाहेर गेलीय् वाटतं ' असें पुटपुटून गेल्याचें तिला ऐकूं आलें. कांहीं वेळानें कारखान्याचा कर्णकटु भोंगा तिच्या कानावर आला. आणि नंतर रस्त्यावरून जाणाऱ्या येणाऱ्या मजुरांचीं मोठमोठ्या आवाजांतलीं बोलणीं तिला ऐकूं येऊं लागलीं. आठ वाजले होते. तरीहि ती तशीच पडून राहिली. तिला उठावेसेंच वाटेना. मग पारू आली. तिनें खोलींतील बटण दाबून उजेड केला. हेमलतेला पाहतांच ती उद्गारली—' ऑं—ताईसाब, तुम्हीं हैता व्हय ? माई समजल्या कीं तुम्ही कुटं फिरायाच गेलां जनुं. आन असं येरवाळीच पडलायसा. डोस्कंबिस्कं न्हाईंना दुखत ? '

' हं. '

' मग बाम चोळूं का ? '

' नको आतां कांहीं. कमी आलंय्. आणखी थोडा वेळ अशीच पडून राहते म्हणजे थांबेल. '

' मी जात्यें मग. '

' तेवढा दिवा मालवून जा जातांना. '

तिचा चन्द्रकान्ताशीं परिचय झाल्यावेळेपासूनचे एकेक प्रसंग चित्रपटासारखे पडल्या पडल्या तिच्या नजरेपुढून जात होते. थोडे दिवसांपूर्वी ती ज्या हिंदोळ्यावर बसून मोठ्या आनंदानें झोके घेत होती, तो हिंदोळा तुटून ती खालीं पडली होती व तिच्या हृदयाला जबर वेदना होऊं लागल्या होत्या. प्रीतीच्या प्रभावानें चन्द्रकान्ताचें मन आपण जिंकूं शकूं, त्याला राजकारणाच्या रुक्ष, अनिश्चित वातावरणांतून काढून काव्याच्या नंदनवनांत रमवूं शकूं, ही तिची कल्पना फोल ठरली होती. या गोष्टीचें

तिला मनस्वी दुःख झालें. आपली प्रीति लाथाडून तो दूरदूर चालल्याचा तिला भास होऊं लागला.

आपल्या प्रीतीपेक्षां त्याला मजूर चळवळीचें आकर्षण अधिक आहे काय ? का आपल्यावरील त्याची प्रीतीच तितकी उत्कट नव्हती ?— असा विचार तिच्या मनांत आला. लगेच तिला पुण्याच्या बागेंतील व संक्रांती दिवशींचा असे दोन प्रसंग आठवून त्याच्या प्रीतींत जिव्हाळा नव्हता, ती वरवरची होती, असें तिला म्हणवेना.

मग त्याला खरोखरच आपल्या प्रीतीपेक्षां ध्येयाचें—मजूर चळवळीचें —महत्व अधिक वाटतें, असेंच नाहीं का ?

पुन्हां तिच्या मनांत आलें—छे ! प्रीतीची महती अशी नाहीं ! भावनेच्या भरांत चन्द्रकांत कांहींतरी म्हणाला, झालें. त्याला आपली चूक कळून येऊन तो आपल्याकडे परत येईल. आपली प्रीति त्याला खास आपल्याकडे ओढून आणील !

तिच्या अस्वस्थ मनाला या विचारानें थोडा धीर आला. तिचें कांहींसें समाधान झालें.

× × ×

चन्द्रकान्त हेमलतेपासून निघाला त्यावेळीं त्याचें मन अतिशय भारावलेलें होतें. त्याला कांहीं वेळ एकांत हवा होता. त्यानें सरळ टेकडीचा रस्ता धरला. सूर्यास्त होऊन बराच वेळ झाला होता. सारें वातावरण कसें धूसर होऊन गेलें होतें. तो टेकडीच्या रस्त्याला लागल्यावर त्यानें डाव्या बाजूला पाहिलें. पूर्वी तेथें सळसळणारा ऊंस नुकताच तोडला गेला असावा. कारण त्याचा पाचोळा अद्याप तसाच शिवारभर विखुरलेला दिसत होता. चन्द्रकान्ताला रस्त्याच्या दुसऱ्या बाजूला वळून जावयाचें असल्यामुळें तो तिकडे पाहूं लागला. तों त्याला पंधरा वीस उंसाच्या गाड्यांची मालिका लागलेली दिसली. शिगोशिग भरलेल्या गाड्यांना जोडलेले ते बैल त्या अवजड ओझ्यानें व वाटचालीनें मेटाकुटीस येऊन कसेतरी पाय ओढीत असल्याचें त्याला दिसलें. चन्द्रकान्तानें त्या गाडयांतून वाट काढण्यापूर्वीच एक माल ट्रक धुळीचे लोट

उडवीत वेगानें आला व त्यानें चन्द्रकान्ताला गुदमरून सोडलें ! रस्त्या-वरील ती मनस्वी धूळ पाहून चंद्रकांताच्या मूळच्या अप्रसन्नतेंत भरच पडली. गाड्यांच्या बेसुमार रहदारीमुळें रस्त्यावर धूळच धूळ झाली होती. रस्त्याच्या कडेला असणाऱ्या झुडुपांच्याकडे चन्द्रकान्ताचें लक्ष गेलें, तेव्हां त्याला त्यांच्या हिरव्या पानांवर धुळीचे तांबूस थर चढून त्यांना वाळलेल्या पानाप्रमाणें करडा रंग आल्याचें दिसलें !

चन्द्रकान्त टेकडीवर आला. टेकडी अगदीं निर्मनुष्य होती. निर-निराळ्या कामामुळें त्याला अलीकडे टेकडीवर यायला झालें नव्हतें. त्याला अकस्मात् पावगी, दर्शने यांच्यासह आल्यावेळचा प्रसंग आठवला. पावगीचें तें विनोदप्रचुर बोलणें आठवलें.

‘ तुम्हांला ती चन्द्रकान्त मण्याची गोष्ट माहीत आहे कीं नाहीं ? एरवीं अभंग असणारा तो मणि चन्द्रप्रकाशांत पाझरूं लागतो, म्हणतात. ह्या चन्द्रकान्तालाहि एखादी चन्द्रमुखी भेटूं द्या, मग पहा हा कसा पाझरेल तो ! ’

जणूं कांहीं पावगी आपल्यासमोर बसून बोलत आहे असाच त्याला भास झाला. त्यावेळीं ह्या बोलण्यानें त्याच्या हृदयाला गुदगुल्या झाल्या होत्या, त्याच्या मनांत हुरहुर निर्माण झाली होती, पण आतां त्या आठवणीनें त्याच्या हृदयांत कालवाकालव झाली. तथापि त्यानें आपल्या मनाचें समाधान केलें—छे ! कांहींतरी कोटि केली झालें त्यानें. चन्द्र-प्रकाशांत पाझरणारा तो चन्द्रकान्त निर्जीव मणि आहे. हा चन्द्रकान्त स्वतःचे विचार, भावना असलेला माणूस आहे ! ह्याच्यापुढें कांहीं ध्येयें आहेत. प्रीतीनें पाझरून नष्ट होण्याइतकें याचें व्यक्तिमत्व ठिसूळ नाहीं !

पण लगेच त्याचें दुसरें मन म्हणालें—चन्द्रकान्त मणि तरी कुठें ठिसूळ असतो ? तोहि कठिणच असतो. तेथें ठिसूळ, कठीण असा प्रश्न नाहीं. चन्द्रप्रकाशाच्या प्रभावाचा तो परिणाम आहे. प्रीतीचाहि प्रभाव तसाच नाहीं का ? एरवीं कितीहि कणखर, खंबीर असणारा माणूस प्रीतीच्या बिसतंतूनीं बांधला गेल्यावर नरम येतोच ना ?

परंतु त्याला पहिल्या मनानें अडविलें—पण खरी प्रीति ध्येयाच्या आड

येते ! व्यक्तित्वाचा कोंडमारा ती करते ? प्रीति ही जीवनांतील एक अपरिहार्य घटना म्हटल्यावर ती जीवनाचा मार्ग निरुद्ध करूं शकेल काय? तिनें तसें करावें काय ? जीवन विकासाच्या आड तिनें यावें काय ? आणि हेमलतेचें माझ्यावर प्रेम आहे म्हणजे माझ्या व्यक्तिमत्वावर प्रेम आहे ना ? माझ्या अंगांतील गुणांवर प्रेम आहे ना ? का, त्या व्यक्तिमत्वाच्या, त्या गुणांच्या जोरावर मी जें सुख स्वास्थ्य मिळवूं शकेन असें तिला वाटते त्या कल्पनेवर तिचें प्रेम आहे ? माझ्या ध्येयाच्या विक्रयावर जें सुख विकत घेतां येईल तें तिला हवें आहे. ज्यामुळें व्यक्तित्वाचा ऱ्हास होईल तें करण्याचें उत्तेजन देणारी प्रीति–ही प्रीति कसली ? जें स्वास्थ्य शोधतें, सुख शोधतें, पण हृदय शोधीत नाहीं—तें खरें प्रेम कसें म्हणावें ! मग काय हेमलतेचें प्रेम हें खरें प्रेम नाहीं ? तो केवळ आभास आहे ? तें मृगजळ आहे ! या आभासाला आपण फसलों ! ह्या मृगजळामागें आपण तृषेनें धांवलों ? वंचनेशिवाय ह्यापासून आपल्या पदरीं दुसरें काय पडणार ? ही वंचना आपण अशीच चालूं द्यायची ? हा मोह आपण टाळायला नको ? आपल्या ध्येयाच्या आड येणारा बोलपट कंपनीचा एक मोह आपण टाळला, तसाच हा सुद्धां टाळायला हवा. महत्प्रयासानें टाळायला हवा. आपल्याला प्रीति हवी आहे. पण आपल्या व्यक्तित्वाचा होम करणारी प्रीति आपल्याला नको आहे. परस्परांच्या प्रीतीपासून परस्परांच्या व्यक्तित्वाचं विकसन झालं तरच ती खरी प्रीति–निदान आपल्याला तरी अशा स्वरूपांतली संजीवक प्रीति हवी आहे हालाहलासारखी दाहक आपल्याला नको !

बस्स. ठरलें. आपलें मन आपण आवरलें पाहिजे. असल्या प्रीतीपासून आपण आपली पाठ निश्चित फिरविणार. हेमलतेच्या हृदयांत जर प्रीतीची खरी ज्योत तेवत असेल, तर ती येईल आपल्या जीवनमार्गावर आपली सहचरी व्हायला.

आणि समजा ती नाहीं आली तरी—

तीच काय, कुणी जरी आलें नाहीं तरी आपला ध्येयमार्ग आपण एकटयानें चालून जायचा हें आपण ठरविलेलें आहेच !

## १७

# उन्हाळ्यांतील ती भयंकर दुपार !

यंदा रविरायानें उन्हाळ्याच्या अगदीं प्रारंभापासूनच कडकपणा धारण केल्यासारखा दिसत होता. धरतीमातेकडून असा कोणता अपराध झाला होता न कळे—कीं ज्यामुळें तिच्यावर तो असा कोपायमान झाला होता ! उन्हाळ्याच्या दिवसांत शीतल जागेंत बसलेल्या माण-साच्या जिवाची सुद्धां सारखी उलघाल उलघाल चाललेली असते, तर लक्ष्मी-नगरला त्या पत्र्यांच्या चाळींत राहणाऱ्यांची काय स्थिति होत असेल याची कल्पना करतां येणें शक्य नाहीं, देतां येणें शक्य नाहीं, तिचा अनुभवच पाहिजे !

ऐन दुपारची वेळ झाली आहे. वारा अजिबात बंद आहे. रणरणतें ऊन बाहेर बघूं देत नाहीं. चुलीवरील तव्याप्रमाणें बाजूचे तापलेले पत्रे चटके देत आहेत. आंत बायका व लहान अर्भकें त्या उकड हंडींत शिजत आहेत. पातळाच्या नाहींतर लुगड्याच्या पदरानें अंगावरला घाम निपटीत आहेत. हुश्श—हुश्श करीत तळमळत आहेत ! पुरुष मंडळी कामानिमित्त बाहेर आहेत म्हणून या शिक्षेतून सुटलेले आहेत !

लक्ष्मीनगरला राहणाऱ्यांचा हा दरवर्षीचा अनुभवच आहे.

गतवर्षी पार्वतीचा लक्ष्मीनगरचा पहिला उन्हाळा. शेतकाम करणा-राला उन्हाळा, पावसाळा न् हिंवाळा तिन्ही ऋतु सारखे असले तरी उन्हाळ्यांतल्या भर दुपारीं सुद्धां शेतकऱ्याच्या फोपींत किंवा मोटवणा-वरील विशाल आंब्याच्या किंवा वडाच्या झाडाखालीं असलेल्या गार सावलींत महाबळेश्वराचा अनुभव घेतां येतो ! सासरीं आल्यापासून अन् विशेषतः अलीकडे दुर्दैवाचे फटकारे बसल्यापासून पार्वतीची रया राहिली नसली तरी तिचे माहेरचे दिवस सुखांत गेलेले होते. त्यामुळें गतवर्षीच लक्ष्मीनगरच्या उन्हाळ्याचें रुक्ष, भयानक स्वरूप पाहून तिची पुरती खात्री झाली होती ! यंदा तर तिला दिवस गेलेले अन् त्यांत प्रारंभापासूनच

उन्हाळयानेंहि आपलें असें उग्र स्वरूप धारण केलेलें ! दुपारच्या त्या उन्हानें तिला चक्कर आल्यासारखें होई व तिचें डोकें दुखूं लागे. जिवाची अगदी काहिली होई ! तिची ही अवस्था पाहिल्यावर शंकरनें तिला पिंपळगांवास पाठवून देण्याचें ठरविलें. नाहींतरी महिना–दोन महिन्यांनीं तिला तिकडे पाठविणें भागच होतें. त्याच्या आधींच जाईना का तिकडे म्हणजे या दिवसांत तिचे असे हाल तरी व्हायला नकोत–मग स्वतःलाच काय त्रास सोसावा लागेल तो लागो, असा शंकरनें विचार केला. चंद्रकान्तापाशीं गोष्ट काढल्यावर त्यानेंहि त्याला असाच सल्ला दिला. चार दिवसांनीं तेवढी रात्रपाळी संपली .कीं, ' ऑफ 'ला जोडून तो आणखी दोन दिवस रजा घेऊन (खाडे करून) पारूला पिंपळगांवास पोंचवून येणार होता.

पहिलें चुंबन, पहिलें मूल, पहिलें गर्भारपण–साऱ्याच पहिल्या गोष्टींचें महत्त्व कांहीं न्यारेंच असतें ! पारूला इतक्या उशिरां का होईना दिवस गेल्याचें कळल्यावर शंकरच्या आईनें त्याला पत्रांवर पत्रें धाडून तिला लौकर पाठविण्याबद्दल कळविलें. डोहाळजेवण न् कांहीं न् कांहीं करण्याची त्या जुन्या काळच्या म्हातारीची हौस होती !

शंकरच्या या बेतामुळें म्हातारीची ती इच्छाहि पुरी होण्याचा योग होता.

पार्वती एक एक दिवस मोजीत होती.

उन्हाळयाचे आधींच लांब असलेले दिवस तिला अधिकच लांब व कंटाळवाणे वाटूं लागले होते.

टळटळीत दुपारची वेळ. तोंड बाहेर काढवत नव्हतें. त्या अंगावरून या अंगावर, ह्या अंगावरून त्या अंगावर होत तळमळत शंकर पथारीवर पडला होता. रात्रपाळीचें जागरण करूनहि त्याचा डोळयाला डोळा लागत नव्हता. बाबासाहेबांच्या बंगल्यावर कुणी पाहुणे आले होते म्हणून पार्वती त्यांच्या बंगल्यावर गेली होती. त्या रखरखीत उन्हांतून धापा टाकीत ती परत आल्याचें शंकरनें पाहिलें. आल्या आल्या तिरीमिरी येऊन ती उभ्या

उभ्याच धाडकन् जमिनीवर पडली. 'इतक्या उन्हाचं धापा टाकीत यायचं काय नडलं होतं ?' हे शंकरचे शब्द त्याच्या तोंडातच राहिले ! अनवधानानें ती पोटावरच पडल्यामुळें त्याला जबर मार बसला असावा. कारण एकाएकी तिच्या पोटांतून तीव्र कळा येऊं लागल्या. त्या तिला असह्य होऊन ती विव्हळूं लागली. तिला कांहीं सुचेना, कांहीं समजेना. कुणाला तरी बोलावून आणायला तिनें शंकरला सांगितलें. तिची ही चमत्कारिक अवस्था पाहून शंकरनें अंगांत कसाबसा शर्ट अडकविला व तितक्यांत शेजारची एक बाई 'काय ग पारू, काय हुतंय्' म्हणून चौकशी करायला आली होती, तिला तिच्याजवळ बसायला सांगून तो बाहेर पडला. त्याचे पाय दवाखान्याच्या रोखानें जाऊं लागले. बोलून चालून कारखान्यानें ठेवलेला दवाखाना तो ! तिथें प्रथमोपचाराचें सामान अन् थंडीतापावरलें कांहीं मामुली औषध सांपडलें तर सांपडायचें ! तिथें हवें तें औषध मिळणें जसें मुष्किल, तसेंच तिथें हमखास डॉक्टर भेटणेंहि मुष्किल. कंपौंडरच्या हवालीं त्या दवाखान्यांतल्या चार बाटल्या करून ते बहुधा कंपनीचे जे निरानिराळे शेती-विभाग होते, तिकडे जातों म्हणून सांगून गेलेले असत. ते मग खरेंच तिकडे जात, कीं खाजगी प्रॅक्टिस चालवीत तें एक त्यांना किंवा त्यांच्या कंपौंडरलाच माहीत ! अर्थात् आताहि शंकर दवाखान्यांत गेल्यावर ते तिथें नव्हतेच, पण एका खुर्चीवर पेंगत बसलेल्या त्यांच्या प्रतिनिधीनें—कंपौंडरनें—त्यांच्या जाण्याचें ठराविक ठिकाण व चार पांच वाजेपर्यंत परत येतील असा वायदा शंकरला सांगितला. बेड्यागत किंचित्काल शंकर स्तब्ध राहिला. नंतर डोक्यांत कांहीं कल्पना आल्यासारखें करून तो ऑफिसकडे धांवला; पण मग रविवार असल्याचें लक्षांत येऊन तो चन्द्रकान्ताच्या चाळीकडे वळला.

चन्द्रकान्त घरींच होता. घाबऱ्या घाबऱ्या येऊन शंकरनें ती हकीकत सांगतांच त्याच्याहि काळजांत धस्स् झालें. ऐन दुपारच्या वेळीं शंकर आलेला पाहून सत्यभामाबाईहि बाहेर आल्या. त्यांना सारी हकीकत कळतांच 'समोरच्या चाळींत कऱ्हाडकरांचं बिऱ्हाड आहे, त्यांची मुलगी नुकतीच पुण्याहून आल्याचें व ती नर्स असल्याचें' त्यांनीं चन्द्र—

कान्ताला सांगितलें. चन्द्रकान्तानें आईला पार्वतीकडे जाण्यास सांगून तो शंकरला घेऊन कऱ्हाडकरांच्याकडे गेला.

चन्द्रकान्ताला पाहतांच कऱ्हाडकर उद्गारले, 'या चन्द्रकान्त, अगदीं उन्हाचं इकडे कुठं येणं केलंत ? कांहीं युनियनचं वगैरे काम ?'

'छे, छे ! तुमच्याकडे नर्सिंगच्या कोर्स झालेल्या कुणी पाहुण्या बाई आहेत ?'

'हो. आमची मुलगीच ती !' असें म्हणून त्यांनीं आंतल्या दरवाजाकडे तोंड करून 'श्यामा, श्यामला—हें बघ इकडे बाहेर ये. तुझ्याकडे चन्द्रकान्त शहाणे कशाला आलेत—' असें म्हणून आपल्या मुलीला हांक मारली.

थोड्याच वेळांत सुमारें वीस—एकवीस वर्षांची एक तरुणी नॅपकिननें चेहरा पुशीत बाहेर आली. तिचा बांधा सडपातळ असून वर्ण साधारणपणें काळ्यांत जमा होणारा होता. तोंडावर देवीचे पुसट वण दिसत होते. सर्व साधारणपणें ती कुरूपांतच गणली गेली असती. चन्द्रकान्ताचें लक्ष तिच्या डोळ्याकडे गेलें. त्यांत त्याला एक प्रकारचा करुण भाव दिसून आला. का कुणास ठाऊक, तिला पाहतांच चंद्रकांताचें मन क्षणमात्र चरकलें.

ती बाहेर येतांच कऱ्हाडकर तिला म्हणाले, 'हे चन्द्रकान्त शहाणे आलेत तुझ्याकडे—'

'आपणच कवि चन्द्रकान्त ना ? भेटीचा योग किती अचानक जुळून आला—' नमस्कारासाठीं हात जोडतांना ती चन्द्रकान्ताला उद्देशून म्हणाली. तिला प्रति-नमस्कार करून 'हं.' एवढेंच म्हणून चन्द्रकान्तानें आपल्या येण्याचें कारण तिला थोडक्यांत सांगितलें. तें ऐकत असतां 'चू चू' असा खेदोद्गार मुखावाटें काढून 'इतक्यांत येतेंच तुमच्याबरोबर' सांगून ती लगबगीनें आंत गेली. तिच्या कर्तव्यतत्परतेमुळें तो तिच्याकडे आदरमिश्रित कौतुकानें पाहात असतां त्याचें लक्ष तिच्या भरदार, सैल अंबाड्यानें वेधून घेतलें. निसर्गानें एवढी तरी सौंदर्याची खूण तिच्याजवळ ठेवलीय् म्हणायची—असा विचार त्याच्या मनांत तरळून गेला.

दरम्यानच्या वेळांत कऱ्हाडकरांनीं चन्द्रकान्ताशीं बोलणें सुरू केलें.

' काय चन्द्रकान्त, तुमच्या युनियन्च्या अर्जाला कंपनीकडून कांहीं उत्तर ? '

' अद्याप कांहीं नाहीं. त्यावरून बहुतेक लौकरच कांहींतरी पुढली Step ( पायरी ) युनियन्ला घ्यावी लागेलसं दिसतंय्. ठरेल लौकरच काय तें. सुखासुखीं निकाल लागण्याचीं चिन्हं मात्र नाहींत. '

हें त्यांचें बोलणें चाललें आहे तोंच एक छोटीशी कातडी बॅग घेऊन श्यामला बाहेर आली व चन्द्रकांताकडे पाहून ती म्हणाली, ' हं, चला. '

' तुम्ही छत्री नाहींत घेतली बरोबर ? ऊन कोण मी म्हणतंय ! ' दाराबाहेर पडल्यावर चन्द्रकान्त तिला सहजच म्हणाला.

' इथल्या इथं जायला कशाला छत्री ? तेवढयानं कांहीं मी वितळा-यची नाहीं ! '

तिच्या उत्तरांतून डोकावणारी स्वतःबद्दलची कांहींशीं बेपर्वाई चन्द्र-कान्ताला जाणवली.

नंतर सारेजण थोडा वेळ स्तब्धतेंत चालले. मग श्यामलेनें बोलावयास सुरुवात केली—' तुम्ही परवाच्या साहित्यसंमेलनासाठीं पुण्याला आला होतां, नाहीं ? वर्तमानपत्रांत वाचलं मी. पण कामाच्या न् इतर भानगडींत कांहीं तिकडे फिरकायला झालं नाहीं मला. '

' तुम्ही पुण्याला कुठं ससूनमध्यें असतां ? '

' हं. नवीनच लागलेंय, वर्ष झालं. '

हें बोलत असतांनाच ते शंकरच्या खोलीजवळ आले.

खोलींत आणखीहि बायका जमा झाल्याचें दिसत होतें. त्यांना येतांना पाहतांच सत्यभामाबाई बाहेर आल्या, व त्यांनीं चन्द्रकान्त आणि शंकरला दुसरीकडे कुणाकडे तरी थांबायला सांगून श्यामलेला एकटीलाच आपल्याबरोबर घेऊन गेल्या.

श्यामलेनें खोलींत पाऊल टाकतांच बायाबापडया कुणी पाळच्या उशाशीं बसून तर कुणी उभ्यानेंच खेदोद्गार काढीत असलेल्या तिला दिसल्या. पाळचें विव्हळणें अद्याप चालूंच होतें. रक्तानें डागळलेलीं दोन-

तीन चिरगुटें पलीकडे पडलेलीं दिसत होतीं. श्यामलेच्या लक्षांत सारा प्रकार येऊन चुकला. किंचित् खिन्न मुद्रेनें पारुच्या केविलवाण्या नजरेकडे तिनें पाहिलें.

सुमारे अर्ध्या तासानंतर श्यामलेनें बाहेर येऊन चन्द्रकान्ताला व शंकरला हलक्या आवाजांत झालेला प्रकार सांगतांच ' काय गर्भपात ! च् च् च्' एवढेच उद्गार चन्द्रकान्ताच्या मुखावाटे बाहेर पडले. शंकरला आपला दुःखावेग आवरणें कठीण गेलें. संयम करूनहि एक अस्पष्ट हुंदका त्याच्या तोंडातून बाहेर पडलाच!

थोडे दिवस पार्वतीला दुसरीकडे कुठेंतरी पाठविण्याबद्दल श्यामलेनें सुचविलें. त्यामुळें हवापालट झाल्यासारखें होऊन तिच्या मनालाहि त्यामुळें विरंगुळा वाटेल, असें श्यामला म्हणाली. नाहींतरी चार दिवसां-नंतर ती पिंपळगांवास जाणार होतीच. तेव्हां तिथेंच तिनें थोडे दिवस जाऊन रहावें, असें ठरलें. गांवाला जाण्याइतपत तिची तब्येत सुधारे-पर्यंत दोन तीन दिवस तिला आपणांकडे ठेवण्याबद्दल चन्द्रकान्तानें सांगितलें. सत्यभामाबाईनींहि त्याचें म्हणणें उचलून धरलें. नाहींतर, कलापूरच्या सरकारी दवाखान्यांत ठेवण्याचा दुसरा मार्ग श्यामलेनें सुचविला. पण चन्द्रकान्तानें तो लगेच मोडून काढला आणि तिला प्रवासाची दगदग सहन होईल असें वाटेपर्यंत तिनें खुशाल आपल्याकडे रहावें व श्यामलेनें तिच्या तब्येतीची काळजी घ्यावी असें सांगितलें.

सर्वांनीं ह्या गोष्टीला मान्यता दिली.

पार्वतीच्या गर्भपाताची ही हकीकत लक्ष्मीनगरला ज्याच्या त्याच्या तोंडीं झाली. प्रत्येकजण दुसऱ्याजवळ बोलतांना याबद्दल हळहळ व्यक्त करूं लागला. कंपनीनें कामगारांकरितां चांगल्या चाळी बांधण्याच्या कामांत केलेल्या दिरंगाईचा हा परिणाम—असेंहि कुणी कुणी आपापसांत बोलतांना कुजबुजूं लागले. अजून तरी कंपनीचे डोळे उघडावे आणि कामगारांच्या चाळीचा प्रश्न हातीं घ्यावा अशी लोकांची भूमिका होऊं लागली.

या घटनेमुळें ज्यांच्या अनुकंपेला भर न येतां कुत्सितपणाला बहर

आला, अशा कांहीं व्यक्ति तिथें होत्याच. कारण, त्या प्रसंगाच्या दुसरे दिवशीं ऑफिसांत बबनराव-सुरेश यांची गांठ पडल्यावर बबनराव त्याला म्हणाला, ' काय, तुमच्या कानांवर आलंच असेल कालचं तें Abortion ( गर्भपात ) प्रकरण ? आतां त्या पार्वतीचा मुक्काम म्हणे चन्द्रकान्ताच्या घरीं आहे. '

' हं. ऐकलं खरं असं. '

' मग आलं कीं नाहीं प्रत्यंतर मीं सांगितलं त्याचं ? उगीच का एखाद्याला एखादीबद्दल इतका कळवळा येतो तो ? '

हें बोलतांना त्यानें ज्या पद्धतीनें डोळे मिचकावले व छद्मी हास्य केलें, ती एखाद्या अभिजात Villain ( खल-पुरुष ) लाच शोभून दिसली असती !

पारूबरोबर शंकरहि चन्द्रकान्ताकडे राहायला गेला.

त्या रात्रीं तो कामावर गेला नाहीं. त्याला अगदीं वेड्यासारखें झालें. तो नीट जेवला नाहीं, कीं चन्द्रकान्ताशीं दोन गोष्टी धड बोलला नाहीं. त्याचें कशांतच लक्ष लागेना. त्याची ही स्थिति लक्षांत घेऊन चन्द्रकान्तानेंहि त्याला उगीच फारसें छेडलें नाहीं. रात्रीं अंथरुणावर पडल्यावरहि शंकरच्या डोळ्यांपुढून आपल्या उध्वस्त स्वप्नसृष्टीचे देखावे जात होते. त्यामुळें त्याला लौकर झोप लागली नाहीं.

तिकडे पार्वतीची स्थिति तर त्याच्याहूनहि अनुकंपनीय झाली होती ! तिचें दुःख केवळ शारीरिकच नव्हतें, तर मानसिकहि ! किंबहुना मानसिकच अधिक. शारीरिक दुःख ती एक दोन दिवसांत विसरली असती. पण मानसिक दुःख ? छे ! तें लवकर विसरलें जाईल असें तिला वाटेना. त्या कल्पनेनेंच कीं काय, मधूनमधून कण्हण्याबरोबर तिला हुंदकेहि येत होते. सत्यभामाबाईंना पहिल्यानें वाटलें कीं तिचें कांहीं दुखतखुपत असेल व तें असह्य झाल्यामुळेंच ती तसें करीत असेल, म्हणून त्यांनीं त्या दृष्टीनें तिच्या सांत्वनाचा प्रयत्न केला. पण नंतर त्यांच्याहि ध्यानांत यायला वेळ लागला नाहीं कीं, ही वरचेवर हुंदके द्यायला लावणारी जखम

शारीरिक नसून मानसिक आहे. ही दोन दिवसांनीं विसरली जाण्यासारखी नसून कदाचित् दोन वर्षेंहि घर करून राहील !

पार्वतीच्या डोळ्यांपुढेंहि वरचेवर मागील आठवणी उभ्या राहात. शंकरबरोबर केलेले सुखसंवाद, पाहिलेलीं सुखस्वप्नें आठवत आणि तिचे डोळे पाण्यानें भरत ! कालपर्यंत तिला आपण पिंपळगांवला गेल्यावर आपल्या सासूबाई न् मामंजी आपलें कसें स्वागत करतील, काय कौतुक करतील, याचीं मनोहर चित्रें दिसत होतीं. पण आतां त्यांना आपलें तोंड कसें दाखवायचें, आपणाला ह्या स्थितींत पाहिल्यावर त्यांना किती खेद होईल, याचीं चित्रें तिला व्यथित करूं लागलीं.

पार्वती दोन तीन दिवस चन्द्रकान्ताकडे होती तोंपर्यंत तिची तब्येत पाहण्याच्या निमित्तानें श्यामलेच्याहि चन्द्रकान्ताच्या घरीं रोज फेऱ्या होऊं लागल्या. संघाच्या कामानिमित्त चन्द्रकान्ताचा सकाळचा बहुतेक वेळ बाहेरच जाई, त्यामुळें सकाळीं. तिची व चन्द्रकान्ताची गांठ पडत नसे. पण रात्रीं ती पुन्हां पारूबरोबर किंवा सत्यभामाबाईच्याबरोबर गोष्टी बोलण्यासाठीं येऊन बसली म्हणजे तिची चन्द्रकान्ताची भेट होई. चन्द्रकान्त रात्रींच्या वर्गांचें काम उरकून नऊ–साडेनऊपर्यंत परत येई. तरी यांच्या गप्पा चाललेल्याच असत. पार्वतीच्या मनालाहि तेवढाच विरंगुळा वाटतो, म्हणून सत्यभामाबाई तिला आग्रहानें बसवून घेत.

आणि नंतर पार्वती गेल्यावरहि सत्यभामाबाईच्या आग्रहाखातर ती पूर्वींप्रमाणें त्यांच्याकडे येत राहिली.

एके दिवशीं रात्रीं चन्द्रकान्त रात्रीच्या वर्गांचें काम उरकून परत घराजवळ आल्यावर घरांतून त्याला अति मधुर, कोमल आवाजांत कुणी तरी गाणें म्हणत असल्याचा आवाज ऐकूं येऊं लागला. श्यामलेचा आवाज त्यानें ओळखला. म्हणून गाणें संपेपर्यंत तो बाहेरच थांबला. ती म्हणत असलेल्या ' द्रौपदीच्या धांव्यां'तील सूर त्याच्या हृदयाला भेदून गेले ! हें देवादिकांचें गाणें तिनें बहुधा आईच्या आग्रहाखातर म्हटलें असावें, असा चन्द्रकान्तानें सहजच तर्क केला. पण तो मुग्ध झाला तें त्या मधुर आवाजानें ! गाणें ऐकत असतां त्याच्या मनांत आलें–'अशा गुणी

मुलीला असं सामान्य रूप लाभावं, किंबहुना अशी कुरूपता पदरीं पडावी हा काय विचित्र दैवाचा खेळ म्हणावा !

गाणें संपल्यावर तो आंत गेला. तेव्हां न राहवून तो श्यामलेला म्हणाला, 'वाः, तुम्ही आपला हा गुण इतके दिवस सर्वांपासून दडवून ठेवला होता म्हणायचा !'

चन्द्रकान्ताच्या ह्या उद्‌गारानें अन् विशेषतः त्यानें आपलें गाणें ऐकलें ह्या जाणिवेनें श्यामला गोरीमोरी झाली. किती निस्संकोचपणें म्हटलें होतें तिनें तें गाणें !

नंतर सत्यभामाबाईहि म्हणाल्या, 'पहा ना काय गोड आवाज आहे तो. आणि अलीकडच्या मुलींना देवादिकांचीं गाणीं ऐकून देखील माहीत नसायची, मग म्हणणं कुठलं आलंय ?'

'मलासुद्धा हें आईनं लहानपणीं शिकवलेलं. तिनंच एखाद्यावेळीं म्हणायला सांगितलं तर तेवढ्यापुरतं म्हणायचं. त्यानंच तें मधूनमधून चुकत होतं. आज तुमच्यामुळं कितीतरी दिवसांनीं त्याची पुन्हां उजळणी झाली.'

'मग रोज येऊन मला तुम्ही म्हणून दाखवत जा कशा. म्हणजे तुमचीहि उजळणी होईल न् माझंहि मन रमेल.'

'हो. हो. म्हणेन कीं. न म्हणायला काय झालं ? पण खरंच, तुम्ही मला 'अहो, जाहो' नका म्हणत जाऊं. मला तुम्ही माझ्या आई-सारख्या, तेव्हां मला तुम्ही आपलं एकेरी नांवानं श्यामाच म्हणत जा.'

श्यामलेची सत्यभामाबाईंना चांगलीच सोबत होऊं लागली. ती एखाद्यावेळीं बसल्याबसल्या त्यांना कामाधामांतहि मदत करी.

एके दिवशीं सत्यभामाबाईंना थोडें बरें नव्हतें तर त्यांना श्यामलेनें चुलीपुढून उठायला लावून स्वतः भाकरी केल्या. कशा अगदीं पातळ, सुरेख पोळीसारख्या !

चन्द्रकान्त जेवायला बसल्यावर पानांत वाढलेली ती भाकरी पाहून त्यानें म्हटलें, 'आई, आज भाकरी वेगळ्याच दिसताहेत. तुझ्या हातच्या दिसत नाहींत. कुणी केल्या आहेत ?'

' नाहीं बाबा, मीं नाहींत केलेल्या. ह्या श्यामानं केलेल्या आहेत. मघां मला थोडी कसकस आल्यासारखी वाटली तर मला तिनं चुलीपुढनं उठवून आपण स्वतः बसली. '

' तरीच इतक्या चांगल्या झाल्या आहेत बरं का. ' चन्द्रकान्त थट्टेनें म्हणाला.

' तर, तर, तुला आतां माझ्या हातच्या भाकरी कुठल्या गोड लागायला ! तरी मी मागं लागलेंयू कीं तुला आपली बायको आण, बाबा. पण तूं कुठं ऐकतोस ? '

हळू हळू श्यामलेच्या वागण्यांत मोकळेपणा येऊं लागला. सुटीदिवशीं एखाद्यावेळीं चन्द्रकान्त घरीं असला म्हणजे ती त्याच्याबरोबरहि बोलत बसे, चर्चा करी. एकदां तिनें कामगार संघाच्या माहितीबद्दल उत्सुकता दर्शवितांच चन्द्रकान्तानें सारी हकीकत तिला सांगितली व हा लढा किती महत्त्वाचा आहे, मजुरांवर सध्यां अन्याय कसा होतो आहे, त्यांची परिस्थिति कशी हलाखीची आहे—ह्या साऱ्या गोष्टी तिला निवेदन केल्या. श्यामलेलाहि ती हकीकत ऐकून हळहळ वाटली.

ती चन्द्रकान्ताला म्हणाली, ' तुमच्या साक्षरता प्रसार वर्गांचं काम मला करतां येईल का ? मी इथं आहे तंवर करीत जाईन. तेवढीच तुम्हांला मदत झाली. नाहींतरी तुम्हांला नोकरी, साक्षरता प्रसार वर्ग न् संघाचं काम यांतनं अजिबात फुरसत मिळतच नाहीं. शिवाय तेवढंच समाजकार्यहि हातून झालं '

' तुमचा व्यवसाय एकपरी समाजकार्यच आहे कीं, आणि तुम्हांला माझ्या मदतीला यायचंच असलं तर त्यांत मला आनंदच वाटेल.'

' तर तर. तुला आनंद वाटणारच. तूं एक चोवीस तास बाहेर असतोसच. श्यामामुळं मला थोडा कुठं आधार मिळाल्यासारखा वाटतोयू तर तिलाहि जा घेऊन आपल्याबरोबर. नाहीं ग श्यामा. तूं त्याच्या नादीं नको लागूंस. ' सत्यभामाबाई म्हणाल्या.

' असं कसं म्हणतां आई ? मी चन्द्रकान्तांना मदत केल्यानं त्यांना थोडा विसावा नाहीं का मिळायचा ? आणि समाजसेवेची चालून

आलेली संधि माझ्यासारखीनं कां दवडावी ? तेवढा वेळ सोडून बाकीच्या वेळीं येईनच कीं मी तुमच्याकडे. मग तर तुमची कांहीं हरकत नाहीं ?'

तिच्या कोमल, मायाळू अंतःकरणाचें चन्द्रकान्ताला दर्शन होऊन त्याला आनंद वाटला.

ज्या गुणांच्या जोरावर कोणत्याहि महत्वाकांक्षी तरुणाचा संसार जिनें मोठ्या सुखानें थाटून दिला असता तिच्या तोंडून समाजसेवेचे असे विरक्तीपर उद्‌गार बाहेर पडावे याच्या मुळाशीं कुरूपतेमुळें लाभलेली अवहेलना तर नसेल ना—असाहि एक विचार त्याचवेळीं त्याच्या मनांत चमकून गेला !



# १८

# चन्द्रकान्त दूर गेला !

श्यामलेनें सहकार्याची इच्छा दर्शविल्यानें चन्द्रकान्ताला आनंद झाला. त्याला आपलें सारें लक्ष आतां युनियन् ( संघा )च्या कार्यांत घालणें शक्य होणार होतें. श्यामलेचा व आपला फार दिवसांचा परिचय नसतांनासुद्धां तिनें आपण होऊन आपल्या कार्याबद्दल आस्था दाखवावी, ह्याचें त्याला नवल वाटलें. त्याच्या डोळ्यापुढें एकदम हेमलतेची मूर्ति उभी राहिली. मागील खेपेस तो हेमलतेकडे गेला असतांना त्यांच्यांत झालेल्या संभाषणावरून तिच्या-आपल्यांतील अंतर कमी होण्याची त्याची आशा मावळली होती. त्यामुळें आपल्या मनाला हेमलतेच्या विचारापासून तो शक्य तोंवर दूर ठेवूं लागला होता. आधीं संघाच्या कार्यामुळें त्याच्या मनाला भटकायला फारशी सवड मिळत नसेच, पण मनाचें सुप्रसिद्ध चंचलत्व त्याला मधून मधून दगा देई व तें हेमलतेकडे धांव घेई. तिच्या सौंद-

यांनें एका काळीं तो लुब्ध झाला होता व त्याच्या कवितेवर तिनें दाखविलेल्या प्रीतीनें त्याला आनंद वाटला होता. पण अलीकडे तिच्या व्यक्तित्वाचें तें संकुचित, एकांगी स्वरूप अधिकाधिक दृष्टीस पडून तो तिच्यापासून दूर जाऊं पाहात होता. तिचा मोह टाळण्याची तो आपल्या मनाला शिकवण देत होता. हिरव्यागार पिकांत घुसून त्याचा नाश करणाऱ्या जनावराला जितक्या तत्परतेनें हुसकावें, तितक्या तत्परतेनें तो आपल्या मनांतून हेमलतेचा विषय काढून टाकीत असे.

ह्यावेळीं त्याच्या मनापुढें हेमलतेची मूर्ति उभी राहिली ती श्यामलेशीं तुलना करण्याच्या दृष्टीनें. ज्या तऱ्हेच्या सहकार्याची अपेक्षा तो हेमलते-कडून करीत होता व जी त्याची अपेक्षा तिनें निष्फळ ठरविली, तेंच सहकार्य श्यामलेनें अनाहूतपणें करण्याची तयारी दर्शविल्यामुळें साहाजिकच त्याला नवल वाटलें. दोघींच्या वृत्तींतील काय हा फरक ! पण पुन्हां त्याच्या मनांत आलें—ह्या फरकाच्या मुळाशीं त्या दोघींची ज्या भिन्नभिन्न परिस्थितींत वाढ झाली, ती परिस्थितीच नाहीं का ? एक मातृसुखाची गोष्ट सोडली तर हेमलतेला आपल्या मनांतील कसलीहि इच्छा किंवा महत्त्वाकांक्षा कधीं दडपून ठेवावी लागली नाहीं किंवा तिला कसली मुरड घालण्याचीहि पाळी तिच्यावर कधीं आली नाहीं. त्यामुळें तिच्या मनावर कांहीं आघात होण्याचें किंवा तिला कांहीं दुखण्या-खुपण्याचें कारण नव्हतें.

पण श्यामलेची गोष्ट तशी नव्हती. तिची हकीकत त्याला आठवली.

श्यामलेजवळ रूपसंपदेचा अभाव असला तरी बुद्धिमत्तेच्या बाबतींत ती आपल्या दोन्ही थोरल्या भावांहून सरस होती. तिच्याहून नऊदहा वर्षांनीं मोठा असलेला अविनाश एकेका यत्तेंत दोन दोन वर्षे मुक्काम करीत कसाबसा मॅट्रिकच्या धक्क्यापर्यंत गेला. पण पुढें युनि-व्हर्सिटीच्या सागरांतून उत्तीर्ण होण्याचें कांहीं साधन दिसेना, तेव्हां त्यानें तो नादच सोडून दिला. तिच्याहून दोन तीन वर्षांनीं मोठा असलेला रमेश त्याच्याइतका कमी बुद्धिमत्तेचा नसला तरी श्यामलेशीं तुलना करतां तोहि तिच्यापुढें फिका पडत असे. बरें, कऱ्हाडकरांनीं

आपल्या मुलांच्या शिक्षणाबाबत पैसा खर्चायची कांहीं हयगय केली होती म्हणावी, तर तसें बिलकुल नव्हतें. त्यांना रेव्हेन्यू खात्यांत नोकरी होती व तीनिमित्त त्यांना पुणें जिल्ह्यांतील निरनिराळ्या तालुक्यांच्या गांवीं–बदली होईल तसतसें–हिंडावें लागे. प्रत्येक ठिकाणीं मुलांच्या शिक्षणाची चांगली सोय असेच असें नाहीं. तेव्हां त्यांनीं अविनाश इंग्रजी शिकूं लागल्यावर पुण्याला कायमचें बिऱ्हाड केलें व तेथें आपल्या आईला ठेवून दिलें. दरमहा लागेल तशी वडिलांकडून खर्चाला मनीऑर्डर येई व वृद्ध आजीचा आपल्या नातवावर दाब तो कितीसा राहणार ? त्यामुळें पुण्याच्या त्या मोकळ्या वातावरणांत अविनाश स्वच्छंदी बनला. त्याच्या वागण्याला अन् चैनीला ताळमेळच राहिला नाहीं. आणि या गोष्टींतच सारें लक्ष गुंतवल्यावर अभ्यासांत कुठलें लक्ष राहायला ! रमेशहि पुढें त्याला येऊन मिळाला.

नंतर कऱ्हाडकरांनींहि पेन्शन घेतलें व ते सारेच पुण्याला येऊन राहिले. अविनाशनें तोंवर मॅट्रिकच्या भिंतीवर दोनतीन वेळां टकरा घेतल्या होत्या व पुन्हां त्या फंदांत न पडण्याचीहि त्यानें मनाशीं खूणगांठ बांधली होती. कऱ्हाडकरांनीं एकंदर परिस्थितीचा अंदाज घेऊन त्याचें लग्न करून टाकलें व घरांत सून आणली. लग्न झाल्यावर तरी अविनाशचें मन स्थिरावेल व तो कुठें नोकरी-चाकरी धरील ही त्यांची अटकळ फोल ठरली. पेन्शनमुळें निम्म्या झालेल्या आपल्या मिळकतींत अविनाशचाहि संसार चालविण्याची जबाबदारी त्यांच्या अंगावर पडली. रमेशहि त्याच सुमारास मॅट्रिक झालेला. अविनाश नाहीं शिकला निदान याची कॉलेजांत जायची इच्छा आहे तर जाईना का, असा विचार करून रमेशच्या पुढील शिक्षणाला कऱ्हाडकरांनीं संमति दिली. श्यामला त्यावेळीं हुजूरपागेंत सहाव्या इयत्तेंत होती. तिचा अभ्यासांत वर नंबर असे. आणि गायन, चित्रकला यांत तिला बक्षिसें मिळालीं होतीं. पण वाढत्या खर्चापायीं तिचें शिक्षण बंद ठेवण्याचें कऱ्हाडकरांनीं ठरविलें. 'नाहींतरी, लौकरच लग्न होऊन तू सासरीं जाशील आणि मग काय चुलीपुढंच बसायचं, मग आणखी शिकून तरी काय

करायचंय ? शिकलीस एवढं पुष्कळ झालं,' अशी आईनेंहि तिची समजूत काढली. श्यामलेच्या मनांत खूप शिकायचें होतें. आपल्या भावांच्या शिक्षणापायीं वडिलांनीं इतका पैसा खर्च करावा, पण आपल्याला धड मॅट्रिकपर्यंत सुद्धां जाऊं देऊं नये, याचें तिला फार वाईट वाटलें. तिचें नांव शाळेंतून काढलें त्या दिवशीं ती अंथरुणावर पडल्यावर मुसमुसून रडली.

ती शाळेंतून निघण्यापूर्वींच तिला लग्नाच्या बाजारांत दाखविण्याचे समारंभ सुरू झाले होते. पण जिथें तिथें तिचें रूप आडवें येई. मात्र तिच्या बुद्धिमत्तेकडे, कलाचातुरीकडे, टापटिपीकडे कुणाचेंहि लक्ष जात नसे. असे फासे वरचेवर पाहिल्यावर तिला वाटूं लागलें—सध्यांच्या जगांत बायकांना एक सौंदर्य असलें म्हणजे बाकी कांहीं नसलें तरी चालेल—पण एक सौंदर्य नसलें आणि बाकी सारे गुण जरी असले तरी व्यर्थ ! तिचा वर्ण सांवळा म्हणजे काळ्याकडे झुकणारा होता, तिच्या नाकाच्या निर्मितीच्या वेळीं ब्रह्मदेवापुढें चाफेकळी नव्हती, किंवा ती नऊ दहा वर्षांची असतांना तिला आलेल्या देवींनीं जातांना तिच्याजवळ आपली चिरस्मृति ठेवली होती—ही सारी टीका खरी असली तरी त्या गोष्टीला तिचा काय इलाज होता ? तिच्याजवळ जें होतें, त्याकडे कुणाचें लक्ष जात नव्हतें पण तिच्याजवळ जें नव्हतें त्याबद्दल जो तो तिची हेटाळणी करीत होता ! त्यामुळें तिच्या अंगांतील गुण मातीमोल होण्याची अन् पाणीदार डोळ्यांतील पाणी सांडूनच आटून जाण्याची मात्र भीति होती !

वरचेवर नकार मिळाल्यानें तिला असें वाईट वाटत होतेंच. शिवाय तिच्या आईवडिलांना आतां तिच्या लग्नाची मोठी काळजी लागून राहिली. कुणाला दाखविण्याचा प्रश्न निघाला कीं, श्यामला आपण होऊनच नाखुषी दाखवूं लागली.

शाळेंत गेल्यानें मन कशांत तरी गुंतलेलें राहतें या विचारानें तिचे आईवडील तिला पुन्हां शाळेंत जाण्याबद्दल आतां आग्रह करूं लागले. पण तिची आतां शिकण्याची तीव्रता कमी झाल्यामुळें असो कीं त्यांत कांहीं तथ्य वाटत नसल्यामुळें असो—तिला पुन्हां शाळेंतहि जावें असें वाटेना.

अखेर मनाशीं कांहीं निश्चय करून व कांहींशा त्राग्यानेंहि तिनें नार्सिंगचा कोर्स घेतला.

एक प्रकारें महागाईच्या दिवसांत त्यामुळें वडिलांना व भावाच्या शिक्षणाला मदतच होणार होती. कारण मध्यंतरीं वाढत्या महागाईनें जेरीस येऊन तिच्या वडिलांनीं—कन्हाडकरांनीं—थोरल्या साहेबांच्या ओळखीनें लक्ष्मीनगरच्या ऑफिसांत नोकरी मिळवली होती. अविनाश उद्योग करो न करो, आपले हातपाय चालतात तोंवर आपण काम करावें असा त्यांनीं विचार केला असल्यास न कळे! अविनाशला सुद्धां त्यांनीं तिथें नोकरी मिळवून दिली असती, पण त्याला पुणें सोडायला नको होतें!

अर्थात् ही सारी हकीकत चन्द्रकान्ताला एकट्या श्यामलेकडूनच समजली, असें नव्हे. कांहीं त्याला आईनेंहि सांगितली. चित्रपटाचे मागले पुढले भाग सुसंगत जुळवावे, तसें त्याच्या स्मृतीनें ती नीट जुळवली.

चन्द्रकान्ताच्या मनांत आलें—साहजिकच अशा मुलींच्या मनांत समाजाचे संकुचित विचार, अनिष्ट रूढि, एकाचे जिवावर दुसऱ्यानें चैन करण्याच्या निलाजऱ्या संवयी या गोष्टींबद्दल चीड आल्यास नवल नाहीं. ज्याला अन्यायाचे चटके बसतात तोच त्याच्याविरुद्ध पोटतिडिकेनें ओरडतो. जो अन्याय करतो, तो त्याची दखल कशाला घेईल? हेमलतेची भूमिका कांहीं अंशीं दुसऱ्या प्रकारची आहे. त्यामुळें तिला प्रचलित समाजव्यवस्थेबद्दल तिटकारा वाटणें तर दूरच, पण ह्या समाजाजवळ तडकाफडकीं बदललें पाहिजे असें कांहीं आहे याची कल्पना तिला येणें शक्य नव्हतें. आणि त्यामुळेंच कीं काय, चन्द्रकान्ताची समाजसेवेची तळमळ तिच्या हृदयाला जाऊन भिडत नव्हती!

दोघींच्या मनोवृत्तींतला हा फरक त्याच्या लक्षांत येतांच हेमलता आपल्या सहकार्याला कां आली नाहीं याचें त्याला नवल वाटलें नाहीं. तरी त्या कल्पनेनें त्याच्या हृदयांत कोठेंतरी बारीकशी कळ उठल्याशिवाय राहिली नाहीं.

मागील भेटीनंतर चन्द्रकान्त तर हेमलतेच्या भेटीस गेला नव्हताच,

पण तिनेंहि त्याच्याकडे कुणी चौकशीला देखील पाठविलें नाहीं. तेव्हां त्याला कांहींसा खेद वाटला होता व त्यानें आपला पूर्वीचा निश्चय कायम केला होता.

आणि या व्यक्तिगत बाबींकडे लक्ष द्यायचें म्हटलें तरी चन्द्रकान्ताला शक्य झालें नसतें. संघातर्फे कंपनीकडे धाडलेल्या अर्जाला महिना होऊन गेला तरी कांहीं उत्तर कंपनीकडून आलेलें नव्हतें. त्यावरून कंपनीची या प्रश्नाबाबत काय भूमिका होती याचा अंदाज त्याच्या मनाला यायला वेळ लागला नाहीं. यासाठीं जास्त दिवसगत होऊं देणें अनेक कारणासाठीं अयोग्य होतें. एकतर हा मार्च महिना चालू होता. म्हणजे कंपनीचा गळिताचा हंगाम आणखी दोन–अडीच महिन्याहून अधिक चालणें शक्य नव्हतें. आणि एकदां हंगाम संपला कीं कंपनीचें काम झालें. कामगारांची पांगापांग झाली. कंपनीलाहि पुढील हंगामापर्यंत कामगारांची फिकीर करण्याचें कारण नव्हतें. तेव्हां संप किंवा कोणत्याहि पुढल्या मार्गाचा अवलंब करायचा तो हंगाम संपण्यापूर्वीच करायला हवा होता. तरच उपयोग होण्याचा संभव होता. नाहींतर पुढें आक्टोबर नोव्हेंबरपर्यंत थांबावें लागणार होतें. आणि छे ! तें मग शक्य नव्हतें !

एकदां एखादी गोष्ट करण्याचें दिरंगाईवर पडलें कीं पडलेंच. तेव्हां जोंपर्यंत हा प्रश्न ताजा आहे, कामगारांचीं मनें अनुकूल होऊं लागलीं आहेत, तोंवरच त्याचा निकाल लावला पाहिजे. लोखंड तापलेलें दिसतें आहे, तोंवरच त्यावर घाव घालण्यांत हंशील !

शिवाय, पारूवरील गर्भपाताच्या दुर्दैवी प्रसंगामुळें कामगारांच्या धुमसत असलेल्या असंतोषाच्या आगींत तेलच पडल्यासारखें झालें. ती घटना जितकी दुर्दैवी, तितकीच संतापजनक. कामगारांच्या चाळीबाबत कंपनीनें दाखविलेल्या अनावस्थेचा तो भीषण परिणाम होता !

असा सारा विचार करून चन्द्रकान्तानें कामगारसंघाच्या वतीनें सभा बोलावली. व कामगारांच्यापुढें सारी परिस्थिति ठेवून संपाची अपरिहार्यता दाखवून दिली. त्यांचें मत विचारतां त्यांनींहि एकजात हात खडे करून आपली अनुकूलता दर्शविली.

तेव्हां चन्द्रकान्त म्हणाला, 'आपण एकमुखानं घेतलेला हा संपाचा—हा लढयाचा—निर्णय पाहून आपण एक जबाबदारी अंगावर घेत असतांनाहि मला आनंद झाला आहे. आनंद अशासाठीं कीं, इतके दिवस निमूटपणं राहणाऱ्या लक्ष्मीनगर साखर कारखान्यांतील मजुरांना आपल्यावरील अन्यायाची आता जाणीव होऊं लागली आहे व त्याच्या प्रतिकारासाठीं ते एकजुटीनं तयार होत आहेत या कल्पनेनं. तुम्हीं आपली 'मुकीं बिचारीं कुणी हका' ही वृत्ति सोडल्यामुळं. सामोपचारानं जिथं प्रश्न मिटत नसेल तिथं शांततामय लढ्यानं—सत्याग्रहान—तो मिटविण्याच आदर्श आपल्याला आपल्या राष्ट्रपिताजींनीं—गांधीजींनीं—घालून दिलेल आहे. आपणाहि त्यांच्याच मार्गाचं अवलंबन करीत आहोंत.

आपण हा जो शांततामय लढा हातीं घेत आहों, तो यशस्वी करण्याची जबाबदारीहि तितकीच मोठी आहे. मनांत कोणतीहि शंक न आणतां, भीति न बाळगतां, एकजुटीनं जर उभे राहिलांत, तर मालकांना तुमच्या विरुद्ध जाण्याची मुळींच ताकद नाहीं, हें पक्कं लक्षांत ठेवा. पण कसल्याहि फुटीर वृत्तीला, भिडेला, किंवा लालुचीला बाव दिलात तर मात्र त्यांत केवळ तुमचाच नाश न् अनहित नाहीं, तर साऱ्य कामगारांचीच ती पर्यायानं बदनामी आहे. त्यांच्या हातांतील ह्य शस्त्राची बदनामी आहे.

पण माझी खात्री आहे कीं, आपली ही नव्यानंच जन्माला आलेल युनियन् अंजनीच्या बालकाप्रमाणं—त्या मारुतीरायाप्रमाणं—सूर्याचा ग्रास करण्याचा पराक्रम करून दाखवील...'

ह्या वाक्याबरोबर टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला.

एक ःप्रिल ही संपाची तारीख ठरली. त्याप्रमाणें कंपनीला कळविण्यांत आलें. माणसाला शक्तिसंचयापेक्षांहि ती अजमाविण्याचा प्रसं आला कीं अधिक आनंद वाटतो कीं काय कोण जाणे ! इतके दिव चन्द्रकान्ताच्या पुढें कामगार संघ बळकट करण्याची गोष्ट होती. आतां त्य संघाला आपली शक्ति दाखवून द्यायची होती, त्यामुळें चन्द्रकान्तालाहि ए

बेगळाच हुरूप चढला. Great is the Joy of Battle (लढाईचा आनंद कांहीं औरच असतो.) ह्याची प्रचीति त्याला आली.

तो सारा वेळ संघाच्या कार्यांत वेचूं लागला. संप यशस्वी करणें हेंच एक ध्येय आतां त्याच्यापुढें उरलें. श्यामलेनें साक्षारताप्रसार वर्ग घ्यायला सुरवात करून त्याची ती जबाबदारी हलकी केली होतीच.

चन्द्रकान्ताच्या इतर सहकाऱ्यांतहि उत्साह संचरला. प्रत्येकजण हातीं घेतलेलें कार्य तडीस नेण्यासाठीं जिवापाड झटूं लागला.

कामगार संघाचा हा उत्साह, ही तयारी पाहिल्यावर कंपनी स्वस्थ बसणें शक्य नव्हतें. चन्द्रकान्त हा या संघाच्या प्रमुखपदीं असून त्याच्या चिथावणीनेंच सारे मजूर संपास तयार झाले आहेत, अशी बातमी थोरल्या साहेबांच्या कानांवर गेली होतीच. त्यांनीं चन्द्रकान्ताला बोलावून घेऊन त्याच्या सारख्यानें असल्या फंदांत पडावें याबद्दल प्रथम खेद व्यक्त केला व नंतर त्याबद्दल सहन कराव्या लागणाऱ्या गंभीर परिणामाची इशारतहि त्याला दिली पण चन्द्रकान्तानें त्या गोष्टीची दखल घेतली नाहीं. तो परिणामास सिद्ध झाला होताच.

पुन्हा चार पांच दिवसांनीं संघाच्या कार्यकारी मंडळाला कंपनीनें पाचारण केलें. ते तेथें गेल्यावर थोरल्या साहेबांनीं त्यांच्यापुढें जमा-खर्चांचे, कामगारांना आतापर्यंत दिलेल्या बोनसचे व त्यांच्या हितासाठीं केलेल्या मोफत दवाखान्यासारख्या खर्चाच्या बाबींचे टाईप केलेले तक्ते टाकले. व सद्यःस्थितींत कंपनीला इच्छा असली तरी अधिक कांहीं करतां येणें कसें अशक्य आहे हें आंकडेवारीनें पटवून देण्याचा प्रयत्न केला. चन्द्रकान्ताला तें आंकड्यांचें गारुड उलगडणें कठीण नव्हतें. त्यामुळें त्याचें समाधान झालें नाहीं. अर्थात् त्याचें नाहीं म्हणजे कोणाचेंच नाहीं.

नंतर त्यानें आपल्या लोकांपुढें या गोष्टींतील रहस्य उघड करून कंपनीचे असले प्रयत्न आपणांत केवळ बुद्धिभेद करण्यासाठींच आहेत तेव्हां त्यांना कोणीहि न फसण्याविषयीं विनंति केली.

पुन्हा सारे कार्यकर्ते दुप्पट वेगानें आपल्या कार्याला लागले.

संप आतां आठ दिवसांवर आला. कामगारांची तयारी व उत्साह पाहून संघाला आपल्या यशाची खात्री वाटूं लागली.

आणि एके दिवशीं आकस्मिकपणें चन्द्रकान्तावर चोवीस तासांचे आंत कलापूर जिल्ह्यांतून बाहेर निघून जाण्याबद्दल हुकूम जारी करण्यांत आला.



# १९

# हेमा अमेरिकेला जाणार ?

सकाळची वेळ. दिवाणखान्यांत बाबासाहेब व हेमलता अशीं दोघेंच चहा घेत बसलीं होतीं. चहा घेऊन झाल्यावर हेमलतेकडे पाहात बाबासाहेब एकदम म्हणाले, ' हेमाला अमेरिकेला जायचा योग आलाय् खरा. पाहूं आतां. '

बाबासाहेबांचे हे उद्गार ऐकून हेमलता त्यांच्याकडे आश्चर्यानें पाहूं लागली तिला त्याचा कांहींच उलगडा झाला नाहीं. तशा गोंधळलेल्या मनःस्थितींतच ती म्हणाली, ' म्हणजे काय बाबा ! तुम्ही काय म्हणतां ? माझा न् अमेरिकेला जाण्याचा काय संबंध ! '

आणि त्यानंतर त्यांनीं जें सांगितलें त्यामुळें तर तिच्या आश्चर्याला पारावारच राहिला नाहीं. चार दिवसांपूर्वी त्यांचें व सुरेशचें बोलणें चाललें असतां सुरेशच्या विवाहाचा प्रश्न कसा निघाला व त्याच वेळीं त्याची हेमलतेबरोबर विवाह करण्यास संमति कशी दिसून आली, इत्यादि हकीकत त्यांनीं हेमलतेला सांगितली.

त्याचें असें झालें. चार दिवसांपूर्वी तिसऱ्या प्रहरीं चार वाजण्याचा सुमार. कारखान्यांत जातांना अलीकडे सुरेश नेहमीं बाबासाहेबांच्या

बरोबर असे. किंबहुना सुरेश आला की बाबासाहेबांनीं गड्याबरोबर चहाची वर्दी आंत द्यायची व स्वतः कपडे चढवायला लागायचें हें जवळ जवळ ठरून गेल्यासारखेंच होतें. त्या दिवशींहि सुरेश आल्याबरोबर ह्या दोन्ही गोष्टी घडल्या. बाबासाहेब आरशांत बघून टायची गांठ बांधीत असतां सुरेश म्हणाला, ' झालं, आमचा अमेरिकेला जाण्याचा दिवस एकेक दिवसानं जवळ येऊं लागला, तसतसा इथला मुक्कामहि एकेक दिवसानं कमी होत चालला. '

' हं. कधीं जूनच्या पहिल्या आठवड्यांत निघणार नाहीं का तुम्ही ?' गांठ बांधून झाल्यावर ती बोटांनीं चांचपीत बाबासाहेबांनीं विचारलें.

' होय. पण पासपोर्ट, कपडे अशा पूर्व तयारीला आतांपासून लागायला हव, म्हणजे ऐनवेळीं धांदल नाहीं उडायची. '

' बाकी थोरले साहेब असल्यावर तुमची धांदल उडायचं कांहीं कारण नाहीं म्हणा. '

' तेंहि एका दृष्टीन खरंच. तरीपण आमच्या घरांतली गंमत पाहा. माझं जाणं एकेक दिवसानं जवळ यायला लागलंय् तसा आईचा माझ्यामागं एक लकडा जास्तजास्तच लागायला लागलाय्. तिचं म्हणणं कीं, मी अमेरिकेला जाण्यापूर्वी लग्न करून घ्यावं. अलीकडच्या तिच्या पत्रांतून दुसरं तिसरं कांहीं नसतं–तर लग्नाचा आग्रह. तिची आपली समजूत झालीय् कीं, परदेशांत मुलं शिकायला गेलीं कीं येतांना तिकडली एखादी मुलगी घेऊन येतातच. तेव्हां निदान आपल्या मुलानं तरी तसं करूं नये, म्हणून अशा रीतीनं तिनं माझी पाठ पुरवलीय्, मग लग्न करून माझ्या बायकोला बरोबर अमेरिकेला नेलं तरी तिची हरकत नाहीं.'

' मला तरी त्यांच्या ह्या म्हणण्यांत कांहीं विशेषसं वावगं दिसत नाहीं ' आपला पोषाख उतरून खुर्चीवर बसतां बसतां बाबासाहेब उत्तरले.

इतक्यांत चहाहि आला. घोटाघोटानें चहा घेत असतांना एकवार सुरेशकडे सूक्ष्मपणानें पाहून बाबासाहेब बोलूं लागले.

' बरेच दिवस एक गोष्ट तुम्हांला विचारीन, विचारीन म्हणतोंय्. आज अनायासें विषय निघाला आहेच. तर विचारूं का तुम्हांला ?'

' काय ? ' सुरेशच्या आवाजांतून अधीरता व्यक्त झाल्याशिवाय राहिली नाहीं.

' आमच्या हेमाबद्दलच. आमची हेमा तुम्हांला पसंत असल्यास—' बाबासाहेबांनीं तें वाक्य अपुरेंच ठेवलें. तरी त्यांच्या बोलण्याचा आशय लक्षांत येऊन आपली आतुरता शक्य तेवढी छपवीत सुरेश म्हणाला, ' आपल्या हेमाताईबद्दल म्हणतां ना ? त्यांना नापसंत ठरविणारा माणूस वेडाच म्हणायला हवा. '

सुरेशच्या दृष्टीनें हा प्रसंग म्हणजे आकाशाच्या भेटीला गंगा येण्याइतका अवचित किंवा आकस्मिक नसला तरी पर्जन्यापेक्षेनें तोंड उघडून बसलेल्या चातक पक्षाच्या मुखांत पर्जन्यबिंदु पडण्यासारखा होता खास. साहजिकच त्याच्या मुखावर समाधानाचें पाणी चमकलें.

' मग आपली संमति आहे असं धरून चालूं तर मी ? '

' हो काय हरकत आहे ? '

ही सारी हकीकत बाबासाहेबांच्या तोंडून ऐकतांना हेमलतेच्या चर्येवर उत्सुकतेचा तर मागमूस नव्हताच, पण ती कांहींशी उदास व विचारी दिसूं लागली.

आणि बाबासाहेबांच्या प्रश्नाला निश्चित असें कांहीं उत्तर न मिळतां तो विषय तेवढ्यावरच संपला व बाबासाहेबहि कारखान्यांत निघून गेले.

नंतर मात्र हेमलतेला आपलें मन आवरणें कठीण गेलें. ती तेथून उठून आपल्या खोलींतील बिछान्यावर पडून राहिली.

चन्द्रकान्त अखेरचा भेटून निघून गेल्यावर ती बिछान्यावर अशीच तळमळत पडली होती. तो प्रसंग तिला आठवला. त्यावेळचें विचारभ्रमण तिला आठवलें. चन्द्रकान्त आपल्याला कायमचा अंतरला ह्या कल्पनेनें त्यावेळीं तिला प्रथम अतिशय दुःख झालें होतें. पण त्याचा भावनावश स्वभाव लक्षांत घेऊन तो आपली प्रीति स्मरून आपणाकडे परत येईल अशा प्रकारचें कांहींसें समाधान तिनें अखेर करून घेतलें होतें. पण जसजसे दिवस लोटूं लागले व चन्द्रकान्त परत येण्याचें चिन्ह दिसेना,

तसतसें ती एक आपल्या मनाच्या समाधानासाठीं केलेली फसवणूक होती असें तिला वाटूं लागलें. चन्द्रकान्त परत तर आला नव्हताच, पण तो आपल्या कार्यात अधिकाधिक गुरफटून चालल्याचें तिच्या कानांवर येत होतें. कामगार संघातर्फे तो संप घडवून आणणार असल्याचें समजल्यावर तर त्याचें भवितव्य तिच्या पूर्णपणें ध्यानांत येऊन चुकलें. संपाच्या दिशेनें पडणारें एकेक पाऊल म्हणजे तो एकेक पावलानें आपल्यापासून दूर चालल्याचें तें एक चिन्हच होय असें तिचें मन तिला सांगूं लागलें.

आणि तो जसजसा दूर चालला तसतशी तिच्या मनाची तळमळ, तगमग जास्त जास्तच वाढत चालली. त्याची मनोहर मूर्ति तिच्या मनश्चक्षूंपमोर वारंवार उभी राही, त्याच्या चर्येवरील गोड स्मित तिला आठवे. त्याचें आवेशयुक्त भाषण तिच्या कानांत घुमूं लागे. त्याच्या पाणीदार डोळ्यांतील आर्तता तिचें हृदय भेदून टाकी. त्याच्या सह-वासांतील सारे प्रसंग तिच्या नजरेसमोर उभे राहत. जणूं काय ते नुक-तेच घडले आहेत, नव्हे अजून घडत आहेत, असा तिच्या मनाला भास होई.

पण ती जेव्हां त्या स्वप्नांतून बाहेर येई, तेव्हां तिच्या दृष्टीसमोरचें तें इंद्रजाल नाहींसें झालेलें असे व तिचे डोळे आसवांनीं डबडबलेले असत !

एखाद्या वेळीं—अगदीं एखाद्याच वेळीं—तिच्या मनांत येई—आपणा दोघांमध्यें वाढत जाणारें हें अंतर आपल्याला कमी नाहीं का करतां यायचें ? आपल्याला नाहीं का चन्द्रकान्ताच्या विचारांशीं समरस होतां यायचें ? आपल्याला नाहीं का त्याच्याशीं सहकार्य करतां येणार ? श्यामला म्हणून कुणी तिच्यासारखी एक तरुणीच चन्द्रकान्ताचा साक्षरता प्रसार वर्ग चालवीत असते असें तिला कळल्यापासून तिच्या मनांत हा विचार वरचेवर डोकावूं लागला. तिनें त्या तरुणीविषयींची माहिती मिळविली. इंग्रजी पांच—सहा इयत्ता शिकून नर्सिंगचा कोर्स घेतलेली ती एक सामान्य मुलगी आहे असें तिला समजल्यावर तिच्या मनांत आलें—

तिच्यासारख्या सामान्य मुलीला जें जमतें तें आपल्याला जमणार नाहीं काय ? कां जमूं नये ?

बिचारी हेमलता ! तिला काय माहीत कीं, ती तशी एक सामान्य स्थितींतील मुलगी असल्यामुळेंच तिला तें जमतें व हेमलता ही तशी नसल्यामुळेंच तिला तें अशक्य आहे !

आणि चन्द्रकान्ताशीं सहकार्य करायचें म्हणजे त्याच्या कामगार चळवळीशीं समरस व्हायचें. पण कामगार चळवळीचा तरी तिला कुठें नीट अर्थ समजला होता ? राबणारांची गिरणी म्हटल्यावर तिला अचंबा वाटे. मोठमोठे भांडवलवाले आपल्या जवळची पिढ्यान् पिढ्या सांचत आलेली पुंजी मोठमोठ्या धंद्यांत गुंतवतात, कारखाने उभारतात, गिरण्या काढतात. धडाडीनें धंदे वाढवतात. उद्योगपति बनतात. त्या उद्योग धंद्यांतून हजारों लोकांना काम देऊन त्यांचें पोषण करतात. अशा परिस्थितींत त्यांना आपल्या कामाचा योग्य तो मोबदला दिला जात असतांना, जे आज आहेत तर उद्यां नाहींत अशा कामगारांनीं त्या गिरण्यांवर आपला हक्क सांगणें म्हणजे तिला तो अत्याचारच वाटे ! बरें, मजुरी तरी काय— ज्याला त्याला आपल्या लायकीप्रमाणें मिळणार. ज्याला इंजिन पुसण्यापेक्षां किंवा ठराविक कालानंतर त्याला तेल वगैरे घालण्यापेक्षां अधिक ज्ञान नाहीं, त्याला बारा–पंधरापेक्षां अधिक तो काय पगार मिळायचा ? बरें, ज्यांना अधिक ज्ञान असतें किंवा ज्यांच्यावर आपल्या बाबांप्रमाणें किंवा जोशी काकांप्रमाणें मोठी जबाबदारी असते त्यांना त्यांच्या लायकीप्रमाणें सहा सहाशें—सातसातशें पगार कंपनी देतेच कीं ? इतकें करूनहि जादा नफ्यांतून खूष होऊन कंपनी आपण होऊन कांहीं रकम बोनस म्हणून नोकरांना देते. तरी पुन्हां त्यांनीं कांहींतरी भरमसाट मागण्या करायच्या न् संपाचा धाक दाखवायचा याला काय म्हणावें ? सुरेशच्या किंवा बाबासाहेबांच्या बोलण्यांत ‘ नाहींतरी हे मजूर अलीकडे फारच शेफारलेत— ’ असे उद्‌गार आले म्हणजे ते तिला सार्थ वाटत. आणि चन्द्रन्कातानें अशा लोकांच्या नादाला लागावें, याचें तिला वाईट वाटे.

आणि या असल्या विचारसरणीमुळें चन्द्रकान्ताशीं सहकार्य करण्याच्या तिच्या कल्पनेचा पायाच भुसभुशीत झालेला असे.

ती मजुरांच्या चाळींकडे किंवा त्यांतून बावरणाऱ्या मजुरांकडे कुतूहलाच्या दृष्टीनें पाहायचें सुद्धां सहसा टाळीत असे. रोज मोटरींतून कॉलेजला जातांना त्यांच्या चाळींवरून गाडी चालली कीं, ती आपलें लक्ष दुसरीकडे कुठेंतरी गुंतवी. कारण चाळीबाहेर धुळींत खेळणारीं नागडीं उघडीं मुलें पाहूनच तिच्या मनांत किळस उत्पन्न होई. काय तीं त्यांचीं धुळीनें भरलेलीं घाणेरडीं अंगें! तेलाचा स्पर्श न झालेल्या व वारंवार खरखर खाजवल्या जाणाऱ्या मुलींच्या झिंज्या आणि तितकेच घाणेरडे न् फाटके तुटके (असल्यास) अंगावरले कपडे! ह्या गोष्टींनींच तिचें मन इतकें बिथरल्यावर त्या चाळींतून वाहिलेले सांडपाण्याचे ओघळ, ठिकठिकाणचे केराचे ढीग, उन्हांत बसून एकमेकींच्या डोक्ींतील उवा शोधून मारीत बसलेल्या किंवा उंसाच्या बुडख्यांच्या जाळांनीं काजळलेलीं भांडीं घासत बसलेल्या अपुऱ्या वस्त्रांच्या मजुरांच्या बायका, किंवा तेलकट, मेणचट शर्टचड्डींत वावरणारे मजूर—ह्या गोष्टी तिच्या नजरेला काय सुख देणार?

'आणि अशा मजूर चाळींत चन्द्रकान्ताबरोबर आपल्याला काम करतां येईल?'

तिच्या मनाला होकार देतां येईना.

आतां तर चन्द्रकान्तानें संपाची नोटीस देऊन एकपरी कंपनीबरोबर लढा सुरू करण्याचीच तयारी दर्शविली आहे. कांहीं झालें तरी बाबासाहेब हे फॅक्टरी मॅनेजर असल्यामुळें संप होणें हें त्यांच्या हिताचें नाहीं. मात्र चन्द्रकान्ताबद्दल त्यांना वाईट वाटत असल्याचें परवां त्यांच्या बोलण्यावरूनच तिच्या लक्षांत आलें. ते म्हणाले होते— 'संप प्रकरणांत सरकारची मदत घ्यायची आम्ही ठरविल्यावर चन्द्रकान्ताला बहुधा अटक, शिक्षा होणारच पण त्याला कांहीं इलाज नाहीं.'

चन्द्रकान्त व हेमलता यांच्यांत इतका दुरावा निर्माण झाल्याची त्यांना काय कल्पना!

'छे! चन्द्रकान्ताच्या नि आपल्यामध्यें पडलेलें अंतर कमी होणं शक्य

दिसत नाहीं! अंतर कमी होणार नाहीं म्हणजे चन्द्रकान्त आपल्याला अंतरणार...' तिच्या मनांत आलें.

बाबासाहेबांनीं सुरेशचा विषय काढल्यावर तर तिची स्थिति अतिशय चमत्कारिक झाली. ती चन्द्रकान्ताला अंतरणार काय ह्या प्रश्नाचा निर्णयच जणूं काय त्यांनीं देऊन टाकला होता!

तो निर्णय तिच्या मनाला पटायला फार जड जात होता. चंन्द्रकान्त व सुरेश ह्या तुलनेंत ज्या मनानें आपला कौल सरळ सरळ चन्द्रकान्ताच्या बाजूस दिला होता, तें मन चन्द्रकान्तास सोडून सुरेशकडे ओढ घ्यायला तयार होईना.

तिच्या मनाची ही चलबिचल सुरेशच्याहि ध्यानांत आली असावी. वरील प्रसंगानंतर एके दिवशीं चारचे सुमारास सुरेश बाबासाहेबांच्या बंगल्यावर आला असतांना तेथें त्याला बाबासाहेब दिसले नाहींत. रविवार असल्यामुळें त्या वेळीं हेमलता मात्र तिथें बसलेली त्याला आढळली.

सुरेश तिला म्हणाला, ' काय बाबासाहेब गेले वाटतं कारखान्यांत?'

' हो. आत्तांच. त्यांना बोलवायला ऑफिसचा शिपाई आला होता म्हणून लगेच गेले.'

सुरेश थोडा वेळ घुटमळल्यासारखा झाला. त्याला वाटलें—ही संधि बरी आहे, त्यानें हेमलतेकडे पाहात विचारलें, ' अलीकडे बाबासाहेबांनीं माझ्याबद्दल कांहीं प्रश्न काढला होता तुमच्यापुढं?'

हेमलता चमकली. तिनें फक्त होकारार्थी मान हालवली.

' तुम्ही काय सांगितलंत त्यांना मग?' सुरेशनेंच पुन्हा विचारलें.

' अजून कांहीं सांगितलं नाहीं. माझ्या मनाचा किनई भारी गोंधळ उडालाय्.'

' गोंधळ उडायचं वास्तविक काय कारण? मी माझी मनोगतं, महत्त्वाकांक्षा वेळोवेळीं तुम्हांला सांगितल्या आहेतच. माझं ध्येय तुम्हांला पसंत नाहीं! तुमची तयारी असली तर तुम्हांलाहि माझ्याबरोबर अमेरिकेला नेण्याचा माझा विचार आहे. तुम्ही तिथलीच पदवी घ्या. येते वेळीं आपण युरोपचीहि सफर काढूं. मी किती तरी दिवसां-

पासून मनाशीं असे बेत रचतों आहे. तुमच्या एका होकारावर सारं अवलंबून आहे. आणि बाबासाहेबांची पण तशीच इच्छा दिसते. मग–'

' तुमचं म्हणणं मला मान्य आहे. पण–खरंच माझं मन कसं गोंधळून गेलं आहे. मला थोडा अवधि द्याल ?....'

ती हें बोलत असतांनाच गणूनें चहा आणला. त्यामुळें तिचें बोलणें तेवढ्यावरच थांबलें. चहा घेते वेळीं दोघेंहि स्तब्ध होतीं.

चन्द्रकान्तामुळेंच बहुधा हा गोंधळ उडालेला असावा–सुरेशच्या मनानें तर्क केला. आणि लगेच त्याच्या डोक्यांत एक कल्पना चमकली.

' अलीकडे चन्द्रकान्त येत नाहीं वाटतं तुमच्याकडे ? ' त्यानें बोलावयास सुरुवात केली.

' त्यांनीं तें मजुरांचं युनियन् काढल्यापासून नाहींच म्हटलं तरी चालेल. त्यांना मजुरांबद्दल फार जिव्हाळा आहे.'

' जिव्हाळा ? हं. बाकी आहे खरा जिव्हाळा ! अगदीं सक्रिय जिव्हाळा ! ' किंचित् उपरोधानें सुरेश म्हणाला.

' म्हणजे ? '

' तुम्हाला सांगितलं तर विश्वास नाहीं बसायचा तुमचा त्या गोष्टीवर. माझं सुद्धां तसंच झालं ना—' अशी प्रस्तावना करून त्यानें तिला चन्द्रकान्त-पारूसंबंधाची बबनरावाकडून समजलेली हकीकत सांगून टाकली.

तें ऐकल्यावर हेमलता स्तंभितच झाली !

' काय ? हें खरं आहे ? ' तिच्या स्वरांत आर्तता होती.

' खरं म्हणजे ? बबनरावाकडे ती मंजुळा म्हणून कुणी कामाची बाई आहे. तिनं सांगितलं म्हणे. मी सुद्धां हें ऐकल्यावर थक्कच झालों ! बाकी आधीच हे कवि न् त्यांत पुन्हां मजूर चळवळीची भर ! मजुरांत वावरणारांची नीति त्यांच्याच पातळीची असायची ! बाकी कशांत समता साधली नाहीं तरी तेवढ्या बाबतींत तरी ! '

पण त्यापुढें तिला तेथें बसवेना. कांहींतरी निमित्त सांगून ती तेथून उठली व सुरेशनेंहि तिचा निरोप घेतला.

अलीकडे ती चन्द्रकान्ताकडे सुंदर पण दुष्प्राप्य चंद्राप्रमाणें पाहात आली होती. पण आताच्या सुरेशच्या बोलण्यानें तो चन्द्र सुंदर नसून कलंकित आहे हें समजल्यावर तिच्या मनांत त्याच्याबद्दल सूक्ष्म तिरस्कार निर्माण झाला. त्याचबरोबर, ज्याचा आपण मोहून ध्यास धरावा आणि दुष्प्राप्य म्हणून खेद करावा, तो वास्तविक ध्यास करण्याच्या योग्यतेचा नाहीं, कलंकित आहे, या कल्पनेनें तिच्या हृदयाला किती वेदना झाल्या असतील !

एकदां तिला वाटलें, हें खरंच कशावरून ?

पण पुन्हां तिच्या मनांत आलें–सुरेश खोटं कशाला सांगतील ? आणि त्यांनीं तरी तें पदरचं थोडंच सांगितलंय !

नंतर तिच्या मनापुढें जे प्रसंग उभे राहिले त्यांनीं त्या विधानाला पुष्टीच दिली.

चन्द्रकान्ताच्या अगदीं पहिल्याच भेटीचा प्रसंग तिला आठवला. रस्त्यानें जातांना पारू–चन्द्रकान्तांनीं परस्पराकडे पाहून केलेलें स्मित तिला आठवलें ! कितीहि ओळख असली म्हणून चन्द्रकान्तासारख्यानें रस्त्यानें जातांना मजुराच्या बायकोकडे पाहून स्मित करावें–ह्या गोष्टींतील खऱ्या रहस्याचा जणूं तिला आतां उलगडा झाल्यासारखा वाटला !

तसेंच गर्भपातानंतर चन्द्रकान्तानें पारूला आपल्या घरीं ठेवावें ह्यांतहि तिला आतां वेगळाच अर्थ दिसूं लागला.

चन्द्रकान्त–पारू ह्यांची प्रत्येक गोष्ट ती आतां ह्या संदर्भानें पाहूं लागली.

माणसाचें मन चंचल असतें. तें काय झुकवावें तसें झुकतें !

तिच्या मनाचें पारडें भराभर चन्द्रकान्ताच्या विरुद्ध बाजूला झुकूं लागलें.

आणि नंतर तिला राहून राहून एकाच गोष्टीचा खेद वाटूं लागला कीं, कलंकित म्हणून चन्द्रकान्त आपल्या मनांतून उतरण्यापेक्षां दुष्प्राप्य म्हणूनच आपल्याला त्याचा नाद सोडावा लागला असता तर किती बरें झालें असतें !



२०

# अरेरे ! यंत्रानें घात केला !

कामगार संघाला मजुरांचा मिळत असलेला पाठिंबा पाहून व संपाच्या यशस्वितेबद्दल त्याला वाटणारा विश्वास लक्षांत घेऊन त्यांत विघ्न आणण्यासाठीं कंपनीकडून कांहीं प्रयत्न केले जाणार, याबद्दल चन्द्रकान्ताची खात्री होतीच. त्याप्रमाणें कंपनीच्या आर्थिक परिस्थितीचें गाऱ्हाणें त्यांच्यापुढें गाऊन त्यांचा बुद्धिभेद करण्याचा पहिला प्रयत्न झाला. पण चन्द्रकान्ताच्या जागरूकतेमुळें तो फोल ठरला.

चन्द्रकान्तावर बजावण्यांत आलेला जिल्हाबंदीचा हुकूम मात्र कांहींसा अनपेक्षित होता. आपल्यावर कांहीं नियंत्रणें पडतील, कदाचित् आपल्याला अटकहि होईल याची अटकळ चन्द्रकान्तानें बांधली होती. पण ती पाळी इतक्यांतच येईल ही मात्र त्याची कल्पना नव्हती. त्यामुळें या हुकुमानें कांहीं वेळ तो गोंधळून गेला. संप अजून आठ दिवसांवर होता. आपणच हें ठिकाण सोडून गेल्यावर कंपनी आपल्यामागें काय काय कारवाया करून मजुरांत फूट पाडण्याचा प्रयत्न करील हें सांगता येत नाहीं. आपण स्वतःच इथें असल्यावर त्या साऱ्या कारवाया हाणून पाडणें शक्य झालें असतें, असें त्याच्या मनांत आलें. मजुरांचीं मनें चांगलीं तयार झालीं असलीं किंवा त्यांच्यांतील असंतोष ताजा व धुमसता असला तरी त्यांना वरचेवर धीर द्यायला, प्रोत्साहन द्यायला कुणीतरी हवा होताच. चन्द्रकान्ताच्या हाताखालीं शंकर आणि विश्वास गायकवाड नांवाचा एक फिटर हे दोघे तयार झालेले होते. तसेंच श्यामलेनेंहि त्याच्या साक्षरता प्रसार वर्गाची जबाबदारी चांगल्या रीतीनें पार पाडली होती. तरी त्याचें मन निःशंक होणें स्वाभाविक नव्हतेंच.

बरें, निर्बंध मोडून तरी काय फायदा होता ?

उलट त्याला लगेच अटकेंत पडावें लागलें असतें.

अखेर, त्यानें विचार करून सारी जबाबदारी त्या तिघांवर सोपवून सध्यांतरी निघून जाण्याचा बेत कायम केला. एवीतेवीं आपल्याला कुठें-तरी बाहेर जायलाच पाहिजे तर पुण्याला जाऊन साथी प्रकाशांची भेट घेऊन त्यांचाहि याबाबत आपण सल्ला घ्यावा असें त्यानें योजलें.

जाण्यापूर्वी त्यानें साक्षरता वर्गापुढें छोटेसेंच पण मोठें उद्बोधक भाषण केलें. चन्द्रकान्तावर पडलेल्या निर्बंधाची वार्ता हां हां म्हणतां साऱ्या मजुरांच्या कानांवर गेली होतीच, म्हणून तेहि अधिकांत अधिक संख्येनें त्यावेळीं हजर राहिले होते. त्या दिवशीं वर्गाला अनौपचारिक सभेचेंच स्वरूप प्राप्त झालें.

चन्द्रकान्त सांगत होता--

'...मी गेलों तरी आपलं कार्य आंखलेल्या पद्धतीनें पार पाडावं व आपली संघटना यत्किंचित्‌हि कमकुवत होऊं देऊं नये. मी एकटा म्हणजे कांहीं सबंध युनियन नव्हे, हें त्यांना आपण कृतीनं दाखवून दिलं पाहिजे आणि मी नसलों तरी माझे प्रतिनिधि--शंकर, विश्वास गायकवाड व श्यामला--हे आहेतच. लढाईत एक सेनापति पडला म्हणून लढाई संपत नाहीं. तर दुसरा त्याची जागा घेऊन लढाई चालू ठेवतो. तसंच हें समजावं. आणि हा लढा माझाच आहे न् मी माझ्याकरितांच लढतों आहे या भावनेनं वागावं...'

बाकी साऱ्या गोष्टींची निरवानिरव चन्द्रकान्तानें केली. पण आईची समजूत कशी काढायची हें त्याला समजेना. अखेर तो श्यामलेला म्हणाला ' श्यामले, ह्या परिस्थितींत आईला धीर न् आधार द्यायचं एक तुझ्याच हातांत आहे. माझ्यावरील इतर जबाबदारी हलकी करण्याची तयारी जशी तूं दाखवलीस तशी ही जबाबदारीहि तूं आपल्यावर घेशील अशी मला खात्री आहे. मी आतां महिनाभर इथून जाणार ह्या कल्पनेनं तिची कशी अवस्था झाली आहे हें तूं पाहतेसच. तूं आपल्या गोड स्वभावानं तिला आपलंसं केलेलं आहेस. तिला माझी उणीव भासणार नाहीं एवढा दिलासा तूं तिला देशील ना ?...'

' चन्द्रकान्त, तुम्ही त्याबद्दल निःशंक असा. तुम्ही माझ्यासारखीवर

जो एवढा विश्वास न् प्रेम दाखवतां त्यांतनं उतराई होण्यासाठीं एवढी जबाबदारी दिखील मी स्वीकारणार नाहीं काय ? नाहींतर आजवर माझ्या सारख्या सामान्य मुलीबद्दल कुणी एवढा जिव्हाळा न् एवढं प्रेम दाखवलं होतं ? तें तुम्ही दाखवलंत–' बोलतां बोलतां तिचा कंठ दाटून आला व डोळ्यांत आंसवें जमा झालीं.

' हं श्यामा. याच्यापुढं असले कमकुवतपणाचे उद्‌गार मुखावाटे काढायचे नाहींत. मला तुझी योग्यता माहीत आहे म्हणूनच तुझ्यावर मी ही जबाबदारी टाकतों आहे. '

चन्द्रकान्ताच्या ह्या उद्गारांनीं श्यामलेला जें आंतरिक समाधान झालें त्याचें वर्णन करणें अशक्य आहे.

× × ×

अलीकडे कामावर जायचें म्हणजे शंकरला बिलकुल उत्साह वाटत नसे. विशेषतः पार्वतीवर तो दुर्धर प्रसंग ओढवल्यापासून व तिला पिंपळगांवास पोंचवून आल्यापासून तर तो कारखाना, तें लक्ष्मीनगर– त्याला अगदीं डोळ्यासमोरदेखील नको झालें होतें. संपापर्यंतचा एकेक दिवस तो जपमाळेप्रमाणें मोजीत बसला होता. तशांतच चन्द्रकान्तावर जिल्हाबंदीचा हुकूम निघून तो काल रात्रींच्या गाडीनें येथून निघून गेल्यापासून तर त्याचें मन अजिबात ठिकाणावर नव्हतें म्हटलें' तरी चालेल.

आज त्याला दिवसपाळी होती आणि दुपारीं बाराच्या भोंग्याला त्याला कामाला जायचें होतें. तरी पावणेबाराचा पहिला भोंगा होईपर्यंत तो तसाच बसला होता. तो भोंगा ऐकल्याबरोबर कसेबसे दोन घांस पोटांत ढकलून तो घाईघाईनें कारखान्याकडे निघाला. रस्त्यानें जातांना त्याला आंत जाणारे कुणीच भेटले नाहींत, पण घराकडे परत जाणाऱ्यांच्या मात्र झुंडीच्या झुंडी दिसत होत्या. म्हणून त्यानें शंकित मनानें झपझप चालायला सुरुवात केली. आपल्याला उशीर तर झाला नाहीं– हीच ती शंका. ओळखीच्या लोकांनीं त्याला हटकल्यावर त्यांच्याशीं दोन शब्द बोलून तो पुढें चालूं लागे. तो टाईमकीपर ( हजेरी मास्तर ) च्या ऑफिसजवळ आल्यावर त्यानें त्या ऑफिसांतील घड्याळाकडे पाहिलें. तो

सव्वा बारा वाजून गेलेले ! तो पावणेबाराचा म्हणून जो भोंगा समजला होता तो होता वास्तविक बाराचाच, पण अनवधानानें त्याची अशी फसगत झाली होती. त्याला पाहिल्यावर बिल्ला देणारा कारकून म्हणालाच, 'सावंत, पंधरा मिनिटं उशीर झालाय तुला. इतक्या उशिरा येणाराला बिल्ला द्यायचा हुकूम नाहीं आम्हांला. तुझा खाडा पडला असता पण जाऊं दे एकबार म्हणून आजच्या दिवस सोडतों. पुन्हां मात्र असं चालायचं नाहीं.' आधींच विमनस्क असलेल्या शंकरच्या डोक्यांत ह्या बोलण्यानें तिडीक उठली. पण उशीर झालेला असल्यामुळें कसेंबसें मन आंवरून तो आंत निघाला. आंत फाळक्याजवळ जेथें उंसाचे ढीगचे ढीग पडलेले असायचे, तेथें आज एकहि मोळी दिसत नव्हती ! सारें आवार कसें स्वच्छ होतें ! आणि फाळक्यांचीहि खडखड बंद होती. त्यावरून त्याच्या लक्षांत आलें कीं, आज साप्ताहिक 'क्लीनिंग'–यंत्रांची साफसफाई–करण्याचा दिवस. तो मिल हौसमधील आपल्या विभागाकडे गेला. यंत्रांचे सुटे भाग जमिनीवर इतस्ततः पडले असून खोललेले भाग नटबोल्टांच्या सहाय्यानें जागच्या जागीं बसविण्याचें काम चालू होतें. प्रत्यक्ष त्या कामांत तीन–चार लोक गुंतले असून एक गोरटेला, सूटपँट घातलेला इसम उभ्या उभ्याच त्यांच्या कामावर देखरेख करीत होता. तो त्यांच्या पाळीचा इंजिनिअर. शंकरला पाहतांच तो म्हणाला, 'सावंत ही का कामाला यायची वेळ झाली ? कुणी सोडलं तुला आंत ? मला असं बिल्कुल खपायचं नाहीं. काम करायचंय तंवर वक्तशीर आलंच पाहिजे. करायचं नसलं तर खुशाल सोडून दे. तुझ्याजागीं छपन्न लोक कंपनीला मिळतील...'

इंजिनिअरच्या त्या उर्मट बोलण्यानें शंकरचा राग अनावर झाला होता पण त्याच्या साथीदारानें त्याला डोळ्यानें खुणावलें, म्हणून तो कांहीं न बोलतां त्या लोकांच्या मदतीला लागला.

कांहीं वेळानें त्यांनीं त्या यंत्राचे सर्व भाग जागच्या जागीं बसवून तें सुरू केलें. थोडावेळ तें नीट चालल्यासारखें दिसलें, पण पुन्हां कांहींतरी

खटकून तें बंद पडलें. तेव्हां त्यांनीं तें आणखी एकवार खोलून पुन्हां नीट बसवून चालू केलें. आतां तें लयबद्ध आवाज देत चालूं लागलें.

पण हें काय! तें पहा शंकरचा तोल चालला आणि पडतां पडतां त्यानें त्या चाकालाच आधारासाठीं उजवा हात टेकला! घेरी आली कीं काय त्याला! अरे तें एंजिन कुणी तरी थांबवा! लवकर थांबवा!! चू च् चू! तें पहा त्या चाकानें निर्दयपणानें त्याचा उजवा हात कापून घेऊन त्याला फेकून दिलें! तो पहा कोपरापासून हात तुटल्यामुळें रक्तबंबाळ झालेला हात घेऊन शंकर तिकडे अस्ताव्यस्त पडला आहे! शिटया न् धावपळ होऊन सारे कामगार त्याच्या भोंवतीं जमा झाले आहेत. शंकरनें डोळे मिटून घेतलेले दिसतात. तो खरोखरच बेशुद्ध आहे कीं, तें तुटलेल्या हाताचें अप्रिय दृश्य पाहायला नको म्हणून त्यानें बळेंच आपले डोळे मिटून धरले आहेत? कीं, या साऱ्या वातावरणाचा वीट आल्यामुळें ह्यांतून बाहेर पडल्याशिवाय डोळे न उघडण्याचा त्यानें निश्चय केला आहे? शंकर, डोळे उघड—पहा पहा त्या निर्दय यंत्रानें तुझ्या हाताची काय दशा केली आहे ती! कशी रे तुझी मनोराज्यें आतां सफल करणार तूं? पारूला काय सांगणार? तिला तरी काय वाटेल तुझी ही दशा पाहून?

आणि हें काय, गाडींतून कुठें चालवलें आहे त्याला? कलापूरच्या दवाखान्याकडे कीं काय? पण अजूनहि त्यानें डोळे उघडलेले नाहींत! आणि आतां पहा—त्याच्या तोंडांतून विव्हळण्याचा अस्पष्ट ध्वनि बाहेर पडला! आणि हें पहा त्यानें आपले डोळे किलकिले करून इकडे तिकडे नजर फिरवली?

'ऑं, कुटं नेताय् मला' शुद्धीवर आल्यावर शंकरनें विचारलें, व त्याच्या तोंडांतून 'अयाऽऽईऽ' असा विव्हळण्याचा स्वर बाहेर पडला.

'कलापूरच्या दवाखान्यांत. तुझा हात चक्रांत सांपडला, त्यासाठीं!' त्याच्याजवळ बसलेल्या इसमानें उत्तर दिलें.

त्याचे डोळे पाण्यानें डबडबले व ते त्यानें पुन्हां मिटून धरले.

× × ×

चारपांच दिवस तरी शंकरला दवाखान्यांतून हलवितां येणार नाहीं असें डॉक्टरांनीं सांगितलें.

श्यामलेनें पारूला पत्र लिहून तावडतोब निघून येण्याबद्दल कळविलें व पुण्यास गोदूताईंच्या पत्त्यावर चन्द्रकान्ताला दुसरें एक पत्र लिहून ही दुःखदायक घटना त्याला कळविली.

श्यामलेनें पारूला लिहिलेलें पत्र वाचून दाखविल्यावर सत्यभामाबाई म्हणाल्या, ' दैव एखाद्याच्या पाठीमागं लागलं कीं त्याचा कायमचा पिच्छा पुरवतं काय कीं ! बिचाऱ्या पारूचं तसं झाल, शंकरचं हें असं झालं ! नुकतीच कुठं गांवाला जाऊन पोंचली असेल, तोंच तिला धांवत यायला हवं. '

आणि खरोखर त्याचप्रमाणें पार्वती धांवून आली. तिची ती चोपलेली शरीरयष्टि व सुकलेलें तोंड पाहून पूर्वीची पार्वती हीच असें ओळखायला येणेंसुद्धां कठीण झालें होतें !

आल्यावर तिनें सत्यभामाबाईंच्या गळां पडून जो शोक केला तो इतका हृदयभेदक होता कीं, सांत्वन करायचें बाजूलाच राहून सत्यभामाबाई व श्यामला ह्यांच्या नेत्रांतूनहि अश्रु वाहूं लागले !



# २१

# किरणबाबू

रात्रीं आठ-साडेआठचा सुमार झालेला. हलक्या हातानें दार ठोठावल्याचा आवाज व ' मिस् कऱ्हाडकर, मिस् कऱ्हाडकर ' अशा हांका ऐकून श्यामला बाहेर आली आणि तिनें कोण आलें आहे तें पाहण्यासाठीं दार उघडलें तों दारांत एक दाढी जटाधारी इसम ! क्षणभर ती

दचकलीच. पण लगेच तो इसम आंत शिरतांच व हलक्या आवाजांत तिला कांहीं सांगतांच तिनें दार बंद करून दिव्याच्या उजेडांत पाहिलें–तो खरेंच—

तो चन्द्रकान्त होता !

तिला वाटलें, आपण स्वप्नांत तर नाहीं ना ?

ती म्हणाली, ' तुम्ही ? अन् अशा वेषांत ? '

उत्तर देण्यापूर्वी चन्द्रकान्तानें इकडे तिकडे पाहिलें व नंतर विचारलें, ' तुझे आई–दादा कुठं आहेत ? '

' ते आंत स्वैपाक-घरांत आहेत. दादा आत्तांच जेवायला बसलेत. '

' मग हरकत नाहीं. त्याचं असं झालं–' तो सांगूं लागला–' मी इथनं गेलों खरा. पण माझं चित्त कांहीं पुण्यांत लागेना. त्यांतच शंकरबाबतचं पत्र आल्यावर अगदीं राहवेना. मीं साथी प्रकाशना तसं सांगितलंसुद्धां. तेव्हां मला त्यांनीं ही कल्पना सुचवली. बरं, सारं ठीक ना ? '

' हो. अगदीं ठीक.'

' आतां माझा जीव भांड्यांत पडला. मला वाटलं, शंकरच्या अपघातामुळं लोकांवर आणखी काय परिणाम होतोय् कुणास ठाऊक ! एकदां संप यशस्वी झाला म्हणजे मग मला वाटेल तें झालं तरी हरकत नाहीं. '

' अन् आतां तर नक्कीच संप यशस्वी होणार.'

' परवांचे दिवशींच एक तारीख कीं.'

' हो ना.'

' बरं आमच्या आईकडे रोज जातेस ना ? '

' हो अन् त्याहि आतां आमच्याकडे येऊन बसतात, मला कामानिमित्त त्यांच्याकडे जायला झालं नाहीं तर.'

' आईची मूर्ति एकदां डोळे भरून पाहायला मिळाली असती म्हणजे समाधान वाटलं असतं.'

' मग आईनं बोलावलंय् म्हणून सांगून आणूं का बोलावून ? '

' नको नाहीतर. आजच नको. तिला पाहिल्यावर कदाचित् मला राहवणार नाही. अन् मग सारंच—' एवढें बोलून चन्द्रकान्त किंचित् काल स्तब्ध बसला.

नंतर चेहऱ्यावर किंचित् स्मिताची छटा आणून तो बोलूं लागला' बरं, माझी थोडक्यांत ओळखत करून देतों म्हणजे पंचाईत नको व्हायला. माझ्याबद्दल कुणाजवळ बोलतांना—माझं नांव किरणबाबू. एक बंगाली तत्त्वज्ञानी, मराठी संत वाङ्मयाचा अभ्यास करण्यासाठीं मुद्दाम महाराष्ट्रांत पुण्यास आलेला. ॲनिमियानें आजारी असतांना आपली सहून हॉस्पिटलांतील ओळख. परत बंगाल्यांत जाण्यापूर्वी इकडचा मुलुख पाहायला व तुला भेटायला आलेला. मराठी समजते पण नीट बोलतां येत नाहीं. नेहमींचं बोलण्याचं माध्यम हिंदी. संत वाङ्मयावर टिपणं करण्यांत सदा गढून गेलेला...'

' आतां हा परिचय आंवरतां घेतला तर नाहीं का चालायचं? दादांची जेवून उठावची वेळ होत आली. बाकी आव तर खूप आणलाय् अं. शोभताय् खरे किरणबाबू. '

आणि श्यामलेचें म्हणणें खोटें का होतें? त्याच्या त्या ' अरविंदबाबू—' छाप दाढी—मिशा व डोक्यावरील केस, विचारी मुद्रा, तरतरीत नाक व सोनेरी फ्रेमच्या चष्म्यांतून पाहणारी तीक्ष्ण नजर! तो एखाद्या तत्त्वज्ञान्यासारखा दिसत होता खराच.

' बरं, आतांपर्यंतच्या घडामोडींचा थोडक्यांत अहवाल मला दे. अन् याच्यापुढं रोजच्या घडामोडींचा अहवाल तूं मला सादर करायचास. नंतर मीहि तुला त्याच्यावर कांहीं लेखी सूचना देत जाईन. आपल्या युनियनचं ऑफिसच माझ्या खोलींत उघडायचं म्हणेनास. मी तिथं बसून सारं पाहात जाईन. '

' थोडक्यांत म्हणजे तुम्ही सूत्रधाराचं काम करणार म्हणा कीं. ' श्यामला विनोदानें म्हणाली.

' तसं का म्हणेनास. आणि विश्वास गायकवाडांना आपल्या ह्या मसलतींत घ्यायला हरकत नाहीं. इतर साऱ्या जणांपासून मात्र ह्या गोष्टी

अज्ञात ठेवल्या पाहिजेत. तसंच, उद्यां सकाळीं तूं जेव्हां साक्षरता प्रसार वर्गाला जाशील तेव्हां रात्री किरणबाबूंच्या प्रवचनाला सर्वांना यायला सांगून ठेव.'

दुसऱ्या दिवशीं विश्वासलाहि ही हकीकत श्यामलेकडून समजल्यावर त्याला मोठाच आधार वाटला व धीरहि आला. 'आम्हांला त्यांनीं मार्ग दाखवायचं काम केलं तरी पुष्कळ आहे. बाकीचं आमचं आम्ही पाहून घेतों,' तो म्हणाला.

रात्रीं आठ वाजतां किरणबाबूंच्या प्रवचनाला सारा मजूर-वर्ग लोटला. थोडी पोक्त कारकून मंडळीहि प्रवचन या शब्दाला भुलून आली होती. अर्थात् किरणबाबूंनींहि प्रवचनकाराची भूमिका यथास्थित वठवली. 'कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन' या चरणाच्या आधारें गीतेंतील तत्त्वज्ञानाचें विवेचन करीत होते. सर्वांना समजेल अशा सोप्या हिंदींत ते बोलत होते. विवेचनाचा ओघ सद्यःस्थितीवर आणून त्यांनीं कारखान्यांतील मजुरांचें उदाहरण घेतलें. मजुरांनीं फलाची अपेक्षा न धरतां नुसतें मर मर मरेपर्यंत कामच करीत रहावें असा अर्थ यांतून काढणाराला त्यांनीं चिमटे घेतले. किंबहुना आपल्या कामाचें फल मजुराला न मिळणें हाच अधर्म आहे असें सांगून त्यांनीं लक्ष्मीनगराला होणाऱ्या संपाचा निर्देश केला. ते म्हणाले, 'मला इथं आल्यावर श्यामलाबाईच्याकडून समजलं कीं, आपली गाऱ्हाणीं पुरीं करून घेण्यासाठीं इथले मजूर लौकरच संपावर जाणार आहेत. आतां जे मजूर रात्रंदिवस कष्ट करताहेत व त्यांच्या कष्टावर मिळालेल्या नफ्यांतून मालक लोक इस्टेटी उठवीत आहेत, त्या मजुरांना जर सांगितलं कीं, बाबांनो तुम्ही फक्त काम करीत राहा. फलाची—अर्थात् जास्त पगार वगैरेची अपेक्षा धरूं नका, तर तें बाजवी होईल काय? उलट असा उपदेश करणंच भोंदूपणाचं ठरेल. मला तर यांत अन्याय दिसतो. फसवणूक दिसते. असल्या अन्याय्य गोष्टीला गीता-वचनाचा आधार घेणं बरोबर नाहीं. पांडवांचं अन्यायानं लुबाडलेलं राज्य परत मिळविण्यासाठीं पांडव युद्धास तयार झाले असतांना अर्जुनानं ऐनवेळीं कच

खाली म्हणून उत्साह देण्यासाठीं, अन्यायाविरुद्ध लढण्यास प्रवृत्त करण्यासाठीं भगवान श्रीकृष्णांनीं गीता सांगितली–' ऊठ, लढ. अन्यायानं बळकावलेलं राज्य परत मिळव–' असा स्फूर्तिदायक संदेश त्याला दिला. आजहि सगळीकडे अन्यायाचं व असत्याचं राज्य चाललेलं दिसतं. भगवान् श्रीकृष्ण आज असते तर त्यांनीं या अन्यायाविरुद्ध लढण्यासाठीं एखाद्या अर्जुनाला खास उभं केलं असतं. तुमच्या संपाशीं मला कांहीं कर्तव्य नसलं तरी तुमचा पक्ष सत्याचा असल्यामुळं तुम्हांला जय मिळेल याची मला खात्री आहे.'

किरणबाबू हें बोलतांच टाळ्यांचा एकच कडकडाट झाला.

प्रवचन संपल्यावर घराकडे जातांना दोन कारकुनांच्यामध्यें किरणबाबूंनीं सांगितलेला अर्थ बरोबर कीं चूक याबद्दल वाद चालला होता. एकजण बरोबर म्हणत होता, तर दुसरा त्यावर आक्षेप घेत होता.

'बाकी, किरणबाबूची बोलण्याची ढब कांहींशीं आपल्या चन्द्रकान्ताप्रमाणंच आहे, नाहीं ?' एकजणानें आपला तर्क प्रगट केला.

'छे ! तूं आपली कुणाची तरी कुणाबरोबरहि तुलना करतोस झालं.' दुसऱ्यानें त्याला मोडून काढलें.

यानंतर मात्र ते मुकाट्यानें घरीं गेले.

× × ×

दुसरे दिवशींच एक एप्रिल.

बाराच्या पाळीपासून संप सुरू होणार होता.

बाराचा भोंगा झाला. पहांटे कामाला आलेले लोक भराभर बाहेर पडूं लागले. पण बाराच्या पाळीचा एकहि मजूर आंत शिरतांना दिसत नव्हता. उलट, बाराच्या पाळीचे बाहेर जमलेले व पहांटेच्या पाळीचे नुकतेच सुटून बाहेर आलेले जमावानें घोषणा करीत परत निघाले.

असाच पहिला दिवस गेला. दुसराहि गेला. तिसरा उजाडला. पण कारखान्याकडे एकहि मजूर फिरकला नाहीं. आतां कारखान्याजवळ नेहमींप्रमाणें उंसाच्या गाड्यांची रांगची रांग लागलेली दिसेनाशी झाली. छे ! रांग कुठली ? गाडी दिसणें मुष्किल होतें ! फाळक्याजवळ शिल्लक

उरलेला संपाच्या पहिल्या दिवशींचा उंसाचा ढीग सुकून आतां बॉयलर-मध्यें टाकण्याच्या लायकीचा झाला होता. हो, पण आतां बॉयलरमध्यें टाकून तरी काय उपयोग होता? म्हणूनच कीं काय, खंडीखंडी लांकडें पोटांत रिचवून लोखंडाच्या रसाप्रमाणें धगधगणाऱ्या बॉयलरच्या पाटांत आतां बर्फाच्या ढिगाप्रमाणें राखेचे ढीग साचूं लागले होते! आणि तो असा क्षीण शक्ति झाल्यामुळेंच कीं काय, त्याच्या दीर्घ किंकाळयाहि आतां बंद पडल्या होत्या! नाहींतरी त्याच्या किंकाळयांना आतां दाद कोण देणार होते म्हणा? मिल हौसमधील तें अवाढव्य राक्षसी चक्र, मस्तीनें गरगर फिरतांना असावध शंकरच्या हाताचा ग्रास करणारें तें दुसरें चक्र, सारीं चक्रें व इंजिनें कशी चूपचाप बसलीं होतीं! व त्यामुळें होणारा धडधड, खडखड आवाजहि बंद पडला होता! जणूं त्या कारखान्याच्या हृदयाची धडधडच बंद पडली होती! सळसळ रस उकळणाऱ्या वरच्या मजल्यावरील टाक्या आज भकास दिसत होत्या व शुगर हौसमधील ढिगामागून ढीग साखर ओकणारें तें नळकांडें आज फक्त अदृश्य हवेचेंच तेवढें वहन करीत होतें! जिथें रात्रंदिवस माणसांची रहदारी, गजबजाट असावा, तिथें कसा भयाण शुकशुकाट दिसत होता!

जसजसे दिवसामागून दिवस मागें पडत होते, तसतसा संप यशाचा मार्ग जोरजोरानें आक्रमत होता. कारण गळिताला योग्य झालेल्या उंसाची तोड जसजशी लांबणीवर पडेल, तसतसा मालकांच्या नफ्यावर अनिष्ट परिणाम होणार होता! त्यामुळें ज्या प्रमाणांत मजुरांचा नेट वाढत होता, त्या प्रमाणांत मालकांचें धैर्य ढासळत चाललें होतें!

× × ×

संपाच्या दुसऱ्या किंवा तिसऱ्या दिवशीं रात्रींची गोष्ट. बबनराव सुरेशच्या खोलींतून बाहेर पडून घराकडे निघाला असतांना त्याला चन्द्रकान्ताच्या घरांतून किरणबाबू एकटेच बाहेर पडत असलेले दिसले. व त्याचक्षणीं ऑफिसांत बोलतां बोलतां एका कारकुनानें किरणबाबूंच्या बोलण्याच्या ढबीची चन्द्रकान्ताबरोबर केलेली तुलना त्याला आठवली.

तो मनांत म्हणाला, 'हे किरणबाबू यावेळीं एकटे या घरांतून बाहेर पडतात याचा अर्थ काय ? मग त्या कारकुनाचा तो तर्क खरा कीं काय ?'

दुसऱ्या दिवशीं पांचचा सुमार. कऱ्हाडकरांच्या घरांत पोलिस शिरले, व त्यांनीं किरणबाबूंना—किंवा आतां आपल्या चन्द्रकान्तालाच म्हणूं—अटक केली. वाऱ्याप्रमाणें ती बातमी साऱ्या लक्ष्मीनगरभर पसरली. सारे लोक, सारे मजूर तेथें गोळा झाले. किरणबाबू म्हणजे दुसरे तिसरे कोणी नसून चन्द्रकान्तच होता या कल्पनेनें त्यांना जितका आश्चर्ययुक्त आनंद झाला होता, तितकाच त्याला अटक झाल्यामुळें त्यांना खेदहि वाटला.

चन्द्रकान्तानें सर्वांना 'लढा शेवटपर्यंत चालवा' हा एकच संदेश दिला.

आईचा निरोप घेतांना मात्र त्याला गाहिंवरून आलें. पण मोठ्या संयमानें चर्येवर उसनें हास्य आणून तो बोलूं लागला, 'आई, तूं माझ्या सदान् कदा बाहेर जाण्यावरून म्हणायचीस कीं, मला सोबत आणून दे न् मग तूं कितीहि वेळ बाहेर राहात जा, म्हणून. आतां ही श्यामलेची सोबत म्हणून दिली आहे तुला तुझ्या म्हणण्याप्रमाणं. मग तरी थोडे दिवस बाहेर जायला परवानगी द्यायची नाहींस मला तूं ?'

पण ह्या बोलण्यानेंहि सत्यभामाबाईच्या डोळ्यांतून पाणी काढलें ! चन्द्रकान्तालाहि आपला मुखवटा टिकाविणें कठीण गेलें.

नंतर श्यामलेकडे वळून तो म्हणाला, 'श्यामा, तुला मागल्या खेपेसच सांगितलंय् काय सांगायचं तें. तूं धीर धर अन् आईला धीर दे.'

आणि लगेच पोलिसांच्या बरोबर हंसतमुखानें व दमदार पावलानें वाट चालूं लागला.

--- --- ---

## २२

# जीवनप्रवासांतील मुशाफिर !

शंकरला कालच दवाखान्यांतून आणलें होतें.

ह्या वेळीं तो आपल्या खोलींत पत्र्याला टेकून बसून पार्वतीच्या हालचालीकडे तटस्थपणें पाहात होता. त्याच्या उजव्या हाताला अद्याप पट्ट्या बांधलेल्या दिसत होत्या. खोलींतील सारीं भांडींकुंडीं गोळा करून पार्वतीनें तीं लांकडी पेटींत भरलीं. कपड्यांच्या घड्या करून त्यांची वळकटी केली. तिच्या हालचाली देखील अगदीं निमूटपणें चाललेल्या होत्या. तिच्या चर्येवर कमालीची उदास छटा दिसून येत होती. कुणी कुणाशीं बोलत नव्हतें. जणूं काय त्या खोलींत आपल्या खेरीज आणखी एक माणूस आहे याची त्यांना दखलच नव्हती !

त्या तुटपुंज्या संसारामुळें का होईना पण शोभून दिसणारी ती खोली सारा पसारा आंवरला गेल्यावर कशी भकास दिसूं लागली ! पार्वतीनें जेव्हां चहुंकडे नजर फिरवली तेव्हां तिच्या मुखांतून एक अस्पष्ट हुंदका बाहेर पडला.

कसेंहि झालें तरी गेलीं दोन वर्षे तिनें त्या जागेंत संसार केला होता. आणि तो मोडून ती आतां परत निघाली होती !

ती आली होती किती उमेदीनें, आशेनें ! आणि ती परत चालली होती ती किती दुःखानें अन् विचित्र परिस्थितींत !

तिनें मोठ्या प्रयासानें आपले हुंदके आंवरले. पदरानें डोळे टिपले व पेटींत भांडीं भरतांना बगळलेलें एक पातेलें हातांत घेऊन ती शंकरला म्हणाली, ‘ हें देऊन येतें मी.’

‘ कुणाचं ? ’

‘ बाबासाहेबांचं हाय. गांवाला जायच्या आधींपासनं पडलंय. ’

शंकर कांहींच बोलला नाहीं. पार्वती निघून गेली.

× × ×

बाबासाहेबांच्या बंगल्यावर भांडें ठेवून त्याच पावलीं परत फिरायचा पारूचा आधीं विचार होता. पण दिवाणखान्यांत हेमलता एकटीच बसलेली पाहून तिच्या अंगावरून तसेंच मुकाट्यानें जाणें तिला बरें वाटलें नाहीं.

'आम्ही चाललों आमच्या गांवाकडं. बळख असूं द्यात.' कांहींतरी बोलायचें म्हणून पार्वती बोलली इतकेंच !

'केव्हां जाणार ? ' हेमलतेनें रुक्षपणानें विचारलें.

' दोपारच्या न्हाईंतर सांजच्या गाडीनं. ' असें उत्तर देऊन पार्वती थोडावेळ स्तब्ध बसली. नंतर तिच्या मनांत काय आलें कुणास ठाऊक, ती म्हणाली, ' अन् तुमच्या लग्नाचं ऐकलं त्यें खरं का हो ? बोलत्यें म्हनुन राग धरूं नगासा—पन मग तुमचा चन्द्रकान्त दादावरला लोभ उगीचच होता व्हय ? '

' तुझ्यासारखी त्यांना लोभ करायला मिळाल्यावर मग माझ्या लोभाची ग त्यांना काय पर्वा ? ' हेमलतेनें खोचकपणें विचारलें.

' असं काईतरी बोलनं शोभतं का तुम्हास्नी हेमाताई ? '

' अन् तुम्हांला मात्र शोभतं नाहीं का कांहीं वाटेल तें केलं तरी ? ' हेमलतेनें पूर्वीप्रमाणेंच ठसक्यांत विचारलें. आणि त्यानंतर तिनें ज्या गोष्टींचा उल्लेख केला त्यामुळें तर आपल्या डोक्यावर वज्राघात झाल्यासारखें पार्वतीला वाटलें !

ती क्रोधानें व दुःखानें बेभान होऊन म्हणाली,

' काय, काय बोलतां तुम्ही हें ? कोन म्हनतं असं ? कुनी सांगितलं तुम्हास्नी त्यें, त्यें मला सांगा, म्हंजे मी रुजवात करत्यें. चन्द्रकान्तावानी निर्मळ मानसावर असला आळ घ्यायचा—

ताई, मला सांगा तुम्हास्नी कोन म्हनालं असं त्यें ? '

' मला सुरेशांनीं सांगितलं. '

' काय सुरेशांनीं...? ' एवढेंच बोलून पार्वतीनें विलक्षण तिरस्काराचा आविर्भाव केला व ती पुढें कांहींतरी बोलणार इतक्यांत हेमलताच म्हणाली, ' ते कशाला खोटं सांगतील ? अन् त्यांना देखील तुझ्या तिकडेच

कुणी मंजुळा राहते तिच्याकडून कळलं म्हणे. मला स्वप्नांत देखील कल्पना नव्हती.'

पण तिचें पुढचें बोलणें ऐकायलाहि पार्वती तिथें थांबली नाहीं. ती तावातावानें निघून गेली होती.

आपण कसें पुरेपूर माप पदरांत घातलें अशा आविर्भावांत हेमलता तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पाहात राहिली.

कांहीं वेळानें पार्वती मंजुळेला घेऊन हेमलतेकडे आली.

मंजुळा सांगूं लागली, ' न्हाई बाई, चन्द्रकान्तावानी गंगेच्या पान्यावानी अक्षी निर्मळ मनुक्षावर असला आळ घ्यायचं पाप कुनी करल व्हय? आपल्या हातनं असलं कंदीबी हुयाचं न्हाई.'

' मग बबनरावांनीं कसं तुझं नांव सांगितलं?' हेमलतेनें साशंक मनानें विचारलें.

' आतां काय म्हनुं त्या बबनरावास्नी तरी! अव, त्येचं असं झालं. येकदां त्येंच्याकडं कामाला गेल्यें हुते तवा सबळ्या-वबळ्यावरनं त्येंची आई मला काई म्हनाली. त्येंचं तें आक्रित सबळं बघुनशान मीं म्हनुन गेल्यें—चन्द्रकान्तावानी मानसं पारूच्या घरीं कुटंबी बसत्यात, खात्यात, पित्यात घरच्यावानी वागत्यात. त्येस्नी सारं चालतं. आन तुम्हास्नीच यवढ्या त्येवढ्यावरनं इंटाळ हुतो व्हय? त्येचा बबनरावांनीं इक्ता परताप केला जनुं. न्हाई बाई. मी अक्षी सरळ भावानं बोलल्यें. माझ्या मनांत यवढं दिखुन पाप नव्हतं, गळयाच्यान्.'

मंजुळा हें सांगत असतांना हेमलतेच्या चर्येवर हळू हळू खेद, पश्चात्ताप, संताप या भावनांची गर्दी झालेली दिसून येऊं लागली.

तेवढ्यांतच गड्यानें हेमलतेला तिच्या नांवाचें टपालांतून आलेलें एक पत्र आणून दिलें.

अक्षरावरून तें चन्द्रकान्ताचें दिसलें म्हणून तिनें तें झर्कन् फोडलें व ती वाचूं लागली—

‘ हेमा,

तुला पाठविलेलं हें माझं पहिलं न् अखेरचंच पत्र. तूं माझ्यावर प्रेम केलंस. पण तें सुद्धां माझ्यांतल्या कवि चन्द्रकान्तावर. मला मात्र माझ्यांतला कवि चन्द्रकान्त वेगळा काढणं शक्य नव्हतं. म्हणून तूं माझ्यापासून दूर राहिलीस....असो.

ज्या कवि चन्द्रकान्तावर तूं प्रेम केलंस त्याची ही अखेरची आठवण तुझ्याकडे पाठवून देत आहे.—

भेट झाली तुझी माझी दोन मुशाफरा परी
जीवनाच्या प्रवासांत अवचित मार्गावरी !
जडे अजाणतेपणें माझ्यावरी तुझा जीव
आणि माझ्या हृदयांत उपजला तोच भाव
गमलें न तुज मज दिन एक भेटीविण
स्वप्नं रम्य रेखण्याचा खेळ खेळूं लागे मन.
अकस्मात घडे परी कशी हाय ! ताटातूट
चालायाची राहियली प्रीतीची अन् अर्धी वाट !
तळमळे हुरहुरे तेणें जरी कधीं मन
विशुद्ध त्या प्रेमापायीं काय खंतीचें कारण ?
विशुद्ध तें प्रेम नाहीं कधीं कांहीं अपेक्षित
तया नाहीं अन्त केव्हां येवो घडून कल्पान्त !

—चन्द्रकान्त ’

कविता वाचीत असतां हेमलतेचे नेत्र अश्रूंनीं भरून आले व अखेरच्या चरणावर येईपर्यंत त्यांनीं त्या पत्रावर अभिषेक केला !

— समाप्त —

# शुद्धिपत्र

•••o◉o•••

| पृष्ठ क्रमांक | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ६९ | १ | रीतीनें | प्रीतीनें |
| ८९ | २२ | विशाद | विषाद |
| ९५ | २२ | आनन्दी | आननीं |
| ९७ | १२ | केलेलें | गेलेलें |
| १०२ | ११ | आतां | आज |
| १०४ | ६ | दडून | पडून |
| १०७ | १७ | आर्द्रता | आर्तता |
| १२१ | १८ | महिन्यांतच | महिन्यांच |
| १५० | २४ | अनावस्थेचा | अनास्थेचा |
| १५४ | २४ | उतरून | उरकून |
| १५५ | ८ | आकाशाच्या | आळशाच्या |